# थालिपीठ

लेखक

गणेश सदाशिव मराठे,
एम्. ए., ए. आय्. ए. (लंडन)

प्रकाशक
गणेश महादेव आणि कंपनी,
६०८ सदाशिव पेठ, पुणें शहर

१ जानेवारी १९२८

किंमत दीड रुपया



सर्वाकर्षक, सर्वव्यापी, व सर्वनियन्ता

बाळूराया !

बालोद्यान प्रेस,पुणें.

# अर्पणलेख.



कोणत्याही गोष्टीबद्दलचें अज्ञान

जिच्या पदरांत घालतां येत नाहीं

कोणत्याही सार्वभौम नृपश्रेष्ठाला

जिच्या पुढें नम्र व्हावें लागतें,

कोणत्याही कुटुंबांत पाहिलें तरी

जिचें अस्तित्व दिसून येतें,

अशी जी

सर्वज्ञ, सर्वशक्तिमान व सर्वगामी विभूति

# बाळूराया

तच्चरणीं

भीति, प्रीति व गुणकीर्तिपूर्वक

हा पदार्थ अर्पण केला असे.

# बाळूरायांना प्रसादयाचना



घंनःश्यामसुंदरा शिशुवरा द्या मज बाळेश्वरा ।
करावया कवनासि कल्पनाकौतुक करुणाकरा ॥
स्मरणें स्फूर्ती स्तवनास्तव ती स्वर्गीय स्रवतसे ।
दिव्य दर्शनें देवदानवां देहभान नुरतसे ॥
बाळूराया तुमची माया माहित व्हाया खरी ।
शिणवुनि काया जाईं वाया सर्व उपाया हरी ॥
व्यास विरमले वाल्मिकि शमले कालिदास खपले ।
मयूरपंतहि कंठ फुटोनी केकाटत आटपले ॥
तथापि प्रयत्न मी हा करी ।
करावी कृपादृष्टि मजवरी ।
अडाणी अनभ्यस्त मी जरी ।
प्रसाद होतां तुमचा पुरता संशय चिन्ता नुरे ।
कविता देवी नवता सेवी भंवतालीं संचरे ॥



# भारतभूमीची भूपाळी.*



(स्वामी विवेकानंद यांच्या ‘ To the Awakened India ’ चें रूपांतर)

उठि उठि आर्ये भारतभूमी पुनरपि जागृति वरी ।
निखिल जगांतिल जन उत्सुक बहु वाट बघति दारीं ॥ ध्रु० ॥
निद्रा तुजला होति लागली नवजीवन घ्याया ।
मृत्यु तियेला म्हणति मूर्ख ते बडबडती वांया ॥
कमलनयन तव शिणले बहु परी मिळे विसावा त्यां ।
तीव्रदृष्टिनें विशाल उज्वल ध्येय आकलाया ॥
सावध होई पुनरपि उचली पाउल तव पुढचें ।
पाउल तव जें सौम्य दुखविना क्षुद्र कीट तृणिंचे ॥
भंग शांतिचा आरामाचा न करी अल्पविध ।
राजमार्गगत धूलिकणहि ते रमती विश्रब्ध ॥
तथापि पाउल बळकट राहो दृढ प्रगतिमार्गी ।
प्रसन्न निर्भय वरुनि अकुंठित धैर्यसार अंगीं ॥
चिरजाग्रतिदायिनी भामिनी अग्रेसर होई ।
स्फूर्तिदायिके उत्तेजनपर वद वच लवलाही ॥
गेला गेला निवास तव तो कोठें वद आतां ।
पूर्वी जेथें प्रेमळ कोमल हृदयसंघ होता ॥
लालनपालन लीलाकौतुक जेथें तव झालें ।
ज्ञाननीतिबल—शिक्षणयोगें विकसित मन केलें ॥

---

*ही ता. १३।६।१९११ च्या केसरीच्या अंकांत प्रसिध्द झाली होती.

जावो; राहूं दैवबलावरि ठेवुनि विश्वास ।
शक्त न कोणी सृष्टिनियम ते उल्लंघायास ॥
सृष्टिनियम हा; भूतमात्र कीं मूलप्रकृतीसी ।
परत येइ नव बल मिळवाया आत्मजीवनासी ॥
प्रस्थानाची करी तयारी जन्मभूमिमधुनी ।
जन्मभूमि तव जलधर जेथें असति फेर धरुनी ॥
हिमकण जेथिल नवबलदायक आशीर्वच वदती ।
कृति अद्‌भुत नव करावयाला प्रोत्साहन देती ॥
अमरलोकिंचें गान मनोहर गाइ जन्हुतनया ।
आत्मसुराशीं सूर मिळवुनी शिकवि तुला गाया ॥
देवदारुसम विशाल तरुवर विविध ज्यांसि नांवें ।
शांतिसौख्य ते अखंड अर्पिति तुला प्रेमभावें ॥
सकलातीता उमा हिमालयसुता जगन्माता ।
पवित्र वत्सल वसे व्यापुनी विविध–विश्वजाता ॥
शक्तिमिषानें जीवनरूपें राहे आक्रमुनी ।
कर्तृपदीं सृष्टिच्या विराजे एक विविध करुनी ॥
करुणाभावें दार उघडिते सच्चिद्रूपाचें ।
अनेकरूपें एक वसे जें प्रगट करी साचें ॥
माता ती तुज देवो आर्ये अविश्रांत शक्ती ।
जीच्या योगें प्रेम निरंतर उपजे तव चित्तीं ॥
आशीर्वच तुज थोर महात्मे मंगलमय वदती ।
युगीं युगीं जे निर्माण जगीं मनुजवंश करिती ॥
दिक्कालात्मक मर्यादा नच जयां कधीं जडती ।
एकतत्त्व तें सत्य अबाधित नित्य धरिति चित्तीं ॥

उदारभावें मानवजातिस दिलें ज्ञान त्यांनीं ।
सौम्यपणें वा पात्र पाहुनी कठोर शब्दांनीं ॥
सेवा त्यांची करुनी भावें विनीत आचारें ।
संपादियलें तुवां रहस्या–' एक असे सारें ' ॥

प्रणयमूर्ति गे वद वच तर मग मंजुळ गंभीर ।
वच तव परिसुनि सकल कल्पनाजाल होइ दूर ॥
स्वप्नसृष्टिंतिल पटलांमागुनि पटलें मावळती ।
सत्यतत्त्व निर्विकार विलसे शोभा अद्‌भुत ती ॥

कथन करी तव सकल जगाला पावन संदेश ।
" उठा उठा हो जागृत व्हा हो त्यजा स्वप्नपाश ॥
" स्वप्नमयी ही भूमी येथें कर्मबंध निर्मी ।
" सूत्ररहित मालिका सुरभि या दुर्गंधित कुसुमीं ॥
" विचार–कुसुमें सुंदर कुत्सित मूलनाल–रहित ।
" शून्योद्भव तीं सत्यपवनलव शून्याप्रति नेत ॥
" निर्भय चित्तें सत्य गांठुनी एकरूप व्हावें ।
" विविधकल्पनातरंग मनिंचे पार लया न्यावे ॥
" शक्य नसे तरि तरंग मानसिं सत्यचि ते यावे ।
" प्रेम अखंडित परोपकारहि शुद्धसत्त्वभावें ॥ "

---

# फोरवर्ड

बाय

# हिज लॉर्डशिप
# लॉर्ड ब्रोकनहेड

[ कंपॅनियन ऑफ दि ऑर्डर आफ दि डॉल ]

इट इज वुइथ दि ग्रेटेस्ट प्लेझर दॅट आय ॲम टेकिंग अप दि पेन फॉर राइटिंग ए फोरवर्ड टु धिस अनपॅरॅलल्ड बुक रिटन बाय इट्स् ऑथर [ इफ आय ॲम नॉट रॉंग ] सो दॅट आय मे, टु सम एक्स्टेंट, रीपे हिज ऑब्लिगेशन् इन ब्रिंगिंग मी इंटु एक्झिस्टन्स आउट ऑफ हिज इमॅजिनेशन. मेनी मारव्हेल्स हॅव बीन क्रिएटेड बाय दि वन हू ब्रॉट धिस युनिव्हर्स इंटु बीइंग, बट ईव्हन ही कुड नॉट प्रोडयूस ए परसन हू कुड राइट ए फोरवड वुइदाउट रीडिंग, ऑर ॲट लीस्ट नोइंग अबाउट, दि कंटेंट्स ऑफ दि बुक. धिस फीट, हाऊएव्हर, हॅज बीन अचीव्ह्ड बाय मी अंडर दी ऑस्पिसेस ऑफ दि ऑथर, हू हॅज व्हेरि काइंडली एक्झेम्प्टेड मी फ्रॉम दि नुइसन्स, हुइच ऑल अदर रायटर्स ऑफ फोर-वर्ड्स आर सब्जेक्टेड टू, ऑफ रीडिंग ऑर नोइंग एनिथिंग अबाउट दि कंटेंटस् ऑफ दि पर्टिक्युलर बुक अंडर फोरवर्डमेंट.

आय सपोज, इट इज ए बुक; आय होप इट इज. फॉर ए फोरवर्ड, ॲज फार ॲज एनी ऑफ दि पार्टस ऑफ माय हेड् कॅन थिंक ऑफ,

अस्यूम्स दॅट इट रिलेट्स टु ए बुक. ॲट लीस्ट इफ देअर इज नॉट यट एनी बुक, देअर इज बाउंड टु बी वन्, ऑर देअर इज वन टु बी बाउंड, बीइंग दि कॉपी हुइच दि ऑथर हिमसेल्फ वुइल लीव्ह ॲज ॲन एअरलूम टु हिज पोस्टेरिटी, ईव्हन इफ ऑल दि अदर कॉपीज [ फॉर वॉट ऑफ एनी पेइंग ऑर ग्रॅटिस रीडर्स ] मे सर्व्ह दि नॅशनल पर्पज ऑफ बिकमिंग दि लाइफगार्ड्स ऑफ मार्केटेड क्वॉंटिटीज ऑफ चिवडा ॲंड अदर पेट्रिॲाटिक न्युट्रिमेंट्स. इन धिस ऑर सम अदर हायजीनिक वे, देअर इज बाउंड टु बी ए डिमान्ड फॉर इट, ॲज माय् क्रॅक्ड हेड लीड्स मी टु थिंक.

आय सपोज दि बुक कंटेन्स सम वर्ड्स ॲंड सेन्टेन्सेस ॲंड पॅरग्राफस् ॲण्ड चॅप्टर्स. आय होप इट डज. फॉर इफ इट डज नॉट, हाऊ कॅन परसन्स लाइक मी, ग्रास्प दि मीनिंग वुइथ दि व्हेरिअस फ्रॅक्शन्स आफ देअर हेड्स ? ऑफ कोर्स देअर कॅन बी ए बुक वुइदाउट चॅप्टर्स, देअर कॅन बी ए चॅप्टर वुइदाउट पॅरॅग्राफ्स, देअर कॅन बी ए पॅरॅग्राफ वुइदाउट सेन्टेन्सेस, ॲण्ड देअर कॅन बी सेंटेंसेस वुइदाउट वर्ड्स. आय नो ए न्यूली मॅरीड कपल इन ॲन ओल्ड फॅशन्ड हिंदु हाउसहोल्ड, हुइच कॅन राइट व्हाल्युम्स ऑन दि शीट्स ऑफ देअर माइंड्स ॲन्ड गेट देम म्युचुअली रेड, वुइदाउट एनी वर्ड्स् ॲट ऑल.

* ए व्हॉल्युम कंटेनिंग फोर चॅप्टर्स ऑफ थर्टीन पेजेस ईच, डीलिंग वुइथ रोमॅंटिक एपिसोडस् सच ॲज ऑफ ए क्वीन ऑफ हार्टस टेकन बाय ए नेव्ह ऑफ दि रॉयल सूट, ए किंग ऑफ डायमंडस् रेन्डर्ड हेल्पलेस बाय ए ड्यूस ऑफ क्लब्स, एट् सेटरा, इज वेल नोन टु गुड-फॉर-नथिंग ॲरि-

---

* पत्त्याचे खेळांतील ब्रिजचा डाव ज्यांस माहीत आहे त्यांसच पुढील मजकूर समजेल

स्टोक्रॅट्स. मेन हँड्लिंग धिस व्हॉल्यूम बिड अगेन्स्ट ईच अदर रीचिंग ए ग्रँड स्लॅम, अँड अचीव्ह फुलफिलमेंट बाय ट्रिक्स, सो दॅट आफ्टर ए टाइम देअर इज मेड ए बुक वुइदाउट ए चॅप्टर. दीज बुक्स नेव्हर फॉर्म ए लायब्ररी, फॉर अॅज सून अॅज वन बुक गेट्स अनादर अलाँगसाइड ऑफ इट, बोथ, वुइथ परहॅप्स ए थर्ड इफ एनी कम्स बिट्वीन देम, आर इफेस्ड बाय ए रबर.

नाऊ लेट मी कलेक्ट मायसेल्फ, फॉर दि व्हेंटिलेशन्स इन माय हेड ॲडमिट अनवेलकम रबिश, ॲलाविंग व्हॅल्युएबल सब्स्टन्स टु एस्केप. (धिस इज दि प्रिव्हिलेज ऑफ नोबिलिटी.)आय वॉज टॉकिंग ऑफ ए बुक, हुइच वॉज बीइंग सेंट टु दि प्रेस. आ! दि प्रेस! हाऊ वुइ वेस्टर्नर्स आर प्राउड ऑफ दि माइटी इन्स्ट्रुमेंट, हुइच वुइ हॅव मेड ऑफ इट! दि प्रेस कॅन मेक ऑर मार रेप्युटेशन्स. ओ प्रेस ऑफ दि मराठा कन्ट्री! वुइथ यूऽऽ लाइज दि डेस्टिनी ऑफ धिस बुक. इट्स ऑथर स्टँड्स ट्रेम्बलिंग बिफोर यू फॉर युअर जजमेंट. डू नॉट, फॉर मर्सीज सेक, पुट ऑन दि *ब्लॅक कॅप इन टोकन ऑफ कॅपिटल पनिशमेंट. इफ यू आर थर्स्टिंग फॉर ए हेड, आय ऑफर यू माइन. इट इज ट्रू इट इज ए बिट शॅटर्ड, स्टिल इट इज ए नोबल हेड. व्हॉट मोअर शुड डेमोक्रॅटस् आस्क फॉर?

ए स्प्लेंडिड पेरोरेशन, इज इट नॉट? आय शॅल नॉट स्पॉइल इट्स इफेक्ट बाय सेइंग एनिथिंग मोअर. सो गुड बाय अँड गॉड ब्लेस यू.

ब्रोकन हेड

---

* फांशीची शिक्षा देतांना न्यायाधीश काळी टोपी घालतात.

# लोणी

हाहाःकार ! खिन्नता ! उद्विग्नता ! विषण्णता ! ते वेळीं देवलोकीं सर्व देव चिंताक्रांत होऊन बसले होते. कुबेराची थैली उघडी राहून तिच्यांतून भूलोकीं द्रव्याची धार पडत होती तरी त्याला भान नव्हतें. वरुणाच्या वॉटरवर्क्स मधील ऑटोमॅटिक गेट्स नादुरुस्त होऊन पाणी वाहून जात होतें तरी तें त्याच्या ध्यानांत येईना. अग्नि आपल्या सर्पणामधील लाकडांबरोबर आलेले ॲस्बेस्टॉसचे* दगडच खाण्यासाठीं धडपडत होता. वायु तर देवांच्या नाकाऐवजीं डोळ्यांतूनच शिरत होता, व ढगांशिवाय वीज चमकूं लागली तरी इंद्र दोहोंबाजूंकडील अप्सरांच्या खांद्यावरील हात हलवीना ! ह्याचें कारण एका किन्नरमिथुनाच्या संभाषणावरून आपणांस समजेल.

चूडामिश्र किन्नर म्हणाला " हे भजनसेवे ! तूं भजीं आणि शेव तयार करून सेनापति महाराजांना कां अर्पण करीत नाहींस ? राक्षसांच्या अटी पार पाडण्याचे कामीं त्यांचा फार उपयोग होईल. "

भजनसेवा किन्नरी म्हणाली "मी तीं त्यांस अर्पण केलीं.परंतु राक्षसांकडून आलेला प्रतिनिधी चंडोदर यास तीं पटलीं नाहींत. त्यांच्या अटीप्रमाणें पदार्थ रुचकर असावा पण मधुर नसावा, खुसखुशित असावा परंतु विळविळित नसावा,कठीण असावा परंतु कडक नसावा, काळा असावा परंतु जळका नसावा. इत्यादि अटी भजीं किंवा शेव यांच्यानें पार पडल्या नाहींत. प्रिया चूडामिश्रा, तुम्ही चिवडा आणि मिसळ त्यांस कां नाहीं दाखविलीं ? "

चूडामिश्रः—माझीही तीच अवस्था झाली. पदार्थ राक्षसांना आवडला तर देवांना आवडत नाहीं. देवांना पटला तर राक्षसांना पटत नाहीं. तरी दोघांनाही पटेल असा पदार्थ कसा शोधून काढावा ?

*न जळणारा असा एक पदार्थ. ह्याचे कागद, पडदे वगैरेही करतात.

भज०—इतका अडचणीचा प्रसंग कशामुळें बरें उत्पन्न झाला ?

चूडा०—देवदैत्यांच्या लढाईंत, दैत्यांनीं देवांची रसद मारिली; म्हणजे मनुष्यलोकांकडून त्यांस मिळणारें अन्नच बंद व्हावें ह्या हेतूनें त्यांनीं श्वेतखंडीं अनीश्वरवादाचा प्रसार करून त्याचा फैलाव जगभर केला व यज्ञयाग बंद पाडले. त्यामुळें देवांनींही कोपायमान होऊन मनुष्यांवर नानातऱ्हेचे उत्पात पाठविले. परंतु त्यायोगानें मनुष्यें सावध न होतां देवांचीच अडचण झाली. ह्या कारणानें युद्धतहकुबीसाठीं देवांनीं बोलणें चालविलें आहे. राक्षसांचें म्हणणें मनुष्यांनीं देवांना नैवेद्य समर्पण करणें तो सात्त्विक पदार्थांचा करूं नये. देवांचें म्हणणें कीं अभक्ष्य म्हणून समजल्या जाणाऱ्या पदार्थांनीं त्यांचें पोषण होणार नाहीं. ह्यामुळें कोणचा पदार्थ नैवेद्याला चालेल ह्याबद्दल प्रयोग चालले आहेत व त्यांच्यासाठीं चंडोदर नांवाचा राक्षसांचा प्रतिनिधी येऊन बसला आहे. तर याला काय युक्ति करावी ?

भजनसेवाः—मी पुष्कळ प्रयोग करून पाहिले त्यांत अनेक धान्यांच्या पिठांचें मिश्रण करून त्याचा वडा करून तळून पाहिला तो उपयोगी पडेलसें वाटतें. पण अजून तो मनाजोगा साधत नाहीं.

चूडामिश्रः—तूं त्यांचें योग्य मिश्रण तयार केलें नसशील. तर चल आपण सुरेश्वरांचा बल्लवपति स्थालिप्रीत याला विचारून पाहूं.

इतकें झाल्यावर तीं दोघें बल्लवाधीशाकडे जाऊन त्याची पुढील-प्रमाणें स्तुति करतीं झालीं. " हे बल्लवेश्वरा स्थालिप्रीता ! तूं महाशक्तिमान वीर असून सर्व बुभुक्षू जनांचा पोषणकर्ता आहेस. तुझ्याच पराक्रमानें सृष्टीमध्यें मोठमोठे महानस निर्माण झाले आहेत. अबला म्हणून समजल्या जाणाऱ्या प्राण्यांच्या हातांत तुझें अमोघ शस्त्र ( ज्याला प्राकृतांत लाटणें असें म्हणतात ) तें असलें म्हणजे त्याच्यापुढें महाप्रबल सम्राट सुद्धां थरथर कापतात. तूं दिव्य आहेस, तूं भव्य आहेस. तुझ्या खांद्यावरील वस्त्र

( ज्याला शोधणें असें म्हणतात, ) त्याच्या सहाय्यानें अग्निबाधा सुद्धां निवारण करतां येते. तूं धन्य आहेस, तूं पुण्य आहेस. तूं अग्नीचा जनक आहेस, तूं जलाचा नियंता आहेस, तूं वायूचा आध्माता आहेस. एकवेळ सर्व ग्रंथकार बुडून गेले तर चालतील, एकवेळ सर्व गवई थंडगार झाले तर चालतील, एकवेळ सर्व चित्रकार भस्मसात् झाले तर चालतील, एक-वेळ सर्व कुंभारचांभार नष्ट झाले तरी चालतील, एकवेळ सैन्यांतील सर्व शिपाई देखील चरक्यावर सूत काढीत बसले तरी चालतील; परंतु तुझ्या जिवाला जर यत्किंचित् धक्का लागला तर सर्व विश्वाचे प्राण हरण होतील. हे विश्वाच्या पोशिंद्या ! तूं धष्ट आहेस, तूं पुष्ट आहेस. गांजा, भांग इत्यादि दिव्य वल्लींचा तूं चहाता आहेस. तुझ्यामुळेंच आम्हांला चहा मिळतो, काफी मिळते, लसणाची चटणी ही तुझ्याकडूनच आम्हांस प्राप्त होते. हे महिषप्राया, तुझ्या कारखान्यांत पावटे, मटार इत्यादिपासून स्फाटके दारू तयार होते.व कोल्हापुरी चिवडा, नागपुरी दहिवडा,इत्यादि ऊर्ध्ववायूनें शरीराला प्रकंपित करणारे पदार्थ निर्माण होतात. तर हे रांधकरत्ना, आमच्यावर कृपा करून आपली धूम्रभेदी दृष्टी तूं आमच्याकडे वळीव."

वरील प्रमाणें स्तोत्र श्रवण करून त्या स्थालिप्रीत बल्लवपुंगवानें आपल्या विशाल देहाचा अग्रभाग भूमीवरून उचलून काटकोनभर वर आणला आणि टिचकीच्या ठेक्यावर संगीत जांभई देत देत म्हणाला " हे किन्नरदांपत्या ! तुमचें सरळ व प्रेमळ भाषण ऐकून मी संतुष्ट झालों आहें, प्रसन्न झालों आहें, तर तुम्हांस काय अभीष्ट असेल तें मागावें. मोतीचुरादि विविध गोलाकार पदार्थ, चकल्या जिलब्या इत्यादि चक्राकार पदार्थ, पुरण-पोळ्या घिरडीं इत्यादि वर्तुळ पदार्थ, शेवयांप्रमाणें सर्पाकृति पदार्थ, रेवडी-प्रमाणें घन पदार्थ, बासुंदीप्रमाणें द्रव पदार्थ, राजगिऱ्याप्रमाणें विरळ पदार्थ, शिऱ्याप्रमाणें चुरळ पदार्थ, चटण्यांप्रमाणें व्यंजन पदार्थ, लोहपिठा-

प्रमाणें बकाणे पदार्थ, तिखट पदार्थ, आंबट पदार्थ, गोड पदार्थ, कडू पदार्थ, काळे पदार्थ, गोरे पदार्थ, पिवळे पदार्थ, हिरवे पदार्थ, लहान पदार्थ, मोठे पदार्थ, कच्चे पदार्थ, पक्के पदार्थ तुह्मांस काय इष्ट असेल तें कथन करावें."

स्थालिप्रीताचार्यांची अशी उल्लसित वृत्ति पाहून किन्नरयुग्मास मोठा संतोष झाला, हर्ष झाला. चूडामिश्र म्हणाला " हे करुणानिधे ! तुझ्या भाषणानें पोपटाला पेरू मिळावा त्याप्रमाणें मला लाभ झाल्यासारखा वाटत आहे. तर हे जठरानलदमना ! आमची एवढीच विनंति आहे कीं आपण ज्या विषयाचे प्रोफेसर आहांत त्या विषयांत आम्ही रिसर्च स्टूडंट आहोंत, करितां आमची डिफिकल्टी दूर करून आम्हांला एखादी महत्त्वाची हिंट द्यावी. थोडक्यांत म्हटलें म्हणजे आमचें चुकतें आहे कोठें तें आम्हांस सांगावें. " असें म्हणून त्यांनीं अनेक पिठांचा पदार्थ तयार करण्याची आपली कल्पना चांगलीशी जमत नसल्याचें सांगितलें.

चूडामिश्राचें वचन ऐकून स्थालिप्रीताचार्यांनीं आपला डावा हात उचलून त्यानें मस्तकाला स्पर्श करून करांगुलांच्या अग्रांनीं त्याचें मर्दन करण्यास सुरवात केली. [ह्या क्रियेला प्राकृतांत डोकें खाजविणें असें म्हणतात.] जसें जसें मर्दन अधिकाधिक होऊं लागलें तशी त्यांच्या मतीला गति मिळत चालल्याचें त्यांच्या उत्तरोत्तर विकसित होणाऱ्या नेत्रांवरून दिसूं लागलें. शेवटीं त्यांचे नयनयुगुल मोटारीच्या दिव्यांप्रमाणें प्रकाशमान होऊन त्यांनीं भाषण करण्यास सुरवात केली. " हे छात्रश्रेष्ठा ! तुझे जन्मजन्मांतरींचें महद्भाग्य उदयास आलें असें समज. कारण मला एक अद्‌भुत कल्पना सुचली आहे ती मी तुह्मांस अर्पण करितों. ती अशी कीं आधीं धान्यें भाजून मग त्यांचें पिष्ट करावें. त्यांचें मिश्रण कोणत्या प्रमाणांत करावें हें ज्ञानकोश नामक एकवीस भागांचे ग्रंथांत पहावें. तेथें नच सांपडल्यास गोंडवनांत परागंदा व्हावें म्हणजे तेथील विश्वामित्रसृष्टींत सांपडेलच

सांपडेल. मग त्याच्यावर सैंधवादि प्ररोचक पदार्थांचा निषेक करून स्नेहाग्निसंस्कार करावा. त्याच्यावर दृष्ट पडूं नये म्हणून एक किंवा अनेक रंध्रें पाडावीं. व अशा रीतीनें तयार झालेला अमावास्येच्या चंद्राप्रमाणें दिसणारा पदार्थ रसिक भक्तांस अर्पण करावा. एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवावी, ती ही कीं हा महापदार्थ आहे व सर्व महापुरुषांप्रमाणें हा स्वयंप्रतापी असला तरी त्यांच्याप्रमाणें ह्यालाही नवनीतप्रयोग फारच मानवतो. ”

हें श्रवण करून चूडामिश्र प्रमुदित झाला; परंतु भजनसेवा सचिंत मुद्रेनें म्हणाली “ हे पाकशौंडा ! अद्यापि मला एक अडचण दिसत आहेच. हा पदार्थ दैत्यांना रुचेल व देवांनाही पचेल अशी काय योजना आहे ? हे ज्ञारापाणे ! ह्या घोर चिंतेमुळें माझी निद्राही नाहींशी झाली आहे. तरी ह्या बाबतींत आपण ह्या निबिड तिमिराचा आपल्या ज्ञानसूर्यानें विध्वंस करावा. ” भजनसेवेचें संकट पाहून स्थालिप्रीताच्या नेत्रामधें अश्रु उभे राहिले. परंतु ते खांद्यावरील जलशोषकानें संग्रहित करून [ वाचकांनीं रुमालानें डोळे पुसावे ] तो दयासिंधु म्हणाला “ हे दुहितृकल्पे भजनसेवे, समाश्वसिहि ! समाश्वसिहि ! ! सर्व जगताला मोहित करणाऱ्या मदनदेवाचा भूमीवरील प्रतिनिधि तुह्मांस माहीत आहे ? ” [ चूडामिश्र भजनसेवेकडे व भजनसेवा चूडामिश्राकडे पाहून दोघेंही नासक्या दुधाप्रमाणें तोंडें करितात. ] “ मदन देवाचेंच ‘ कंदर्प ’ हें नांव धारण करणारा हिरव्या शेंडीचा एक महापराक्रमी वनस्पति भूलोकीं आहे. उभा कापल्यास शंख व आडवा कापल्यास चक्र अशीं श्रीमहाविष्णूचीं दोन आयुधें तो आपल्या उदरांत धारण करितो. ह्या पदार्थांचे योगानें दैत्यजन फारच संतुष्ट होतात व अंशमात्रेंकरून मिश्र केल्यास देवांसही त्याचा गंध आर्मिस्टिसच्या काळापुरता सहन होऊं शकेल. मदन देवाच्या परिवारांत ह्याचा दर्जा मोठा असून ह्याच्या केवळ स्मरणानेंच रसनेला पाझर फुटूं लागतात.

तरी आतां विलंब करूं नका ! ह्या कंदर्पानें युक्त असा इष्ट पदार्थ तयार करून ताबडतोब नेऊन दाखवा म्हणजे तुमचे हातून मोठें राष्ट्रकार्य होईल."

स्थालिप्रीतानें केलेल्या महदुपकारांच्या कल्पनेनें उभयतांचें अंतःकरण सद्गदित झालें ! त्यांचें शरीर रोमांचित झालें ! सद्गुरूंचे चरणीं प्रणिपात करून चूडामिश्र म्हणाला "हे भोजनरणदुंदुभे ! तुझ्या या अमूल्य उपकारांचें ऋण कसें फेडूं ? तुझ्या नांवानें विश्वविद्यालयांत स्कॉलर्शिप ठेवूं, का चर्च-गेटावर तुझा पुतळा उभारूं, का व्हाइसरॉय साहेबांचे हस्तें तुझ्या तैलचित्रा-चा अनावरणसमारंभ करूं ? हे महानसकेसरे ! तुझें नांव चिरस्मरणीय होईल ह्याला काय उपाय करूं ?" स्थालिप्रीत गहिंवरून म्हणाला "तुझ्या सारख्या परम भक्ताचें प्रेम ह्यानेंच माझ्या उपकारांची फेड झाली आहे. तथापि तुझा आग्रहच असेल तर हा जो अद्भुत पदार्थ तुझे हातून तयार होईल त्याला माझ्या नांवासारखेंच नांव देऊन त्याचा मनुष्यलोकीं प्रसार कर. जा वत्सांनो ! तुमचें कल्याण होवो."

त्या नाकराजाश्रित पाकराजास वंदन करून किन्नरयुग्म स्वगृहीं आलें. तेथें त्यांनीं आचार्यप्रणीत पाकसिद्धि करून "थालिपीठ" नांवाचा पदार्थ तयार केला. तो पदार्थ पाहूनच दैत्यांच्या प्रतिनिधीच्या जिव्हा व ओष्ठामध्यें मित्रक्रिया सुरू झाली (मिटक्या मारूं लागला इति भाषायाम्.) मदनदेवाच्या प्रेरणेनें देवांच्याही पोट-कमिटीनें तो पदार्थ पास केला व त्याची इमिटेशन मर्त्यलोकीं करण्यास मंजुरी दिली गेली. त्या अन्वयें हें थालिपीठ भाविक जनांस सादर अर्पण करण्यांत येत आहे. जो त्याचें श्रद्धापूर्वक सेवन करील त्याची जन्मोजन्मीं क्षुधा प्रदीप्त राहून सरतेशेवटीं (ज्याप्रमाणें लोणी ऊन्ह ऊन्ह थालिपिठांत जिरून जातें त्याप्रमाणें) तो परब्रह्माचे ठायीं विलीन होऊन जाईल, विलीन होऊन जाईल, विलीन होऊन जाईल !

॥ तत् सत् ब्रह्मार्पणमस्तु ॥

# अनुक्रमणिका

# थालिपीठ



## विलायतविहार

### संचार पहिला

### ब्रुसेल्स—( बेल्जम )

‘ टाळकें सडकीन जास्त बोलशील तर ’ वयस्य रागानें म्हणाला. ‘मला कां वनस्पत्याहारावर राहतां येणार नाहीं काय? अरे, आम्ही महाराष्ट्रीय नुसत्या जोंधळ्याच्या हुरड्यावर नाहींतर चणेफुटाण्यांवर शेंकडों मैलांच्या मजला मारीत होतों, ते मोठ्या शहरांत राहून सुग्रास अन्नावर राहतां येणार नाहीं काय? निदान पाव आणखी भाजी एवढी तर कोठेंही मिळेल ! ’

‘ते पूर्वींचे दिवस गेले’ मीं म्हणालों, ‘आतां लोकांचीं पोटें मांस खाऊन झालीं आहेत नाजूक. लंडनमध्यें राहून एक वेळ व्हेजिटेरियन रहाशील; पण प्रवासांत कितपत साधेल संशयच आहे.’

‘तुझा वनस्पत्याहाराचा एवढा दिमाख नको दाखवूं! प्रवासांत वनस्पत्याहारी राहून दाखवतों चल. किती दिवस?’

‘मला तीन आठवडे फुरसत आहे, पण तूं तीन दिवस माझ्याप्रमाणें राहशील तर चवथ्या दिवशीं तुझ्या मांस खाण्यापासून मला जो काय त्रास होईल तो मी सोशीन.’

'बस्स, कबूल. इतकीसुद्धां सवलत मला वास्तविक नको आहे, पण सोडवून घेऊन ठेवतों. मग कधीं निघणार?'

'आपल्याला काय पुन्हां पुन्हां जाण्यास सवड सांपडणार आहे थोडीच! शक्य तितका मोठा फेरा घेऊं व त्याकरितां उद्यां रात्रींच निघूं या. पण आणखी एक अडचण आहे बुवा! आपण थर्डक्लास प्रवास करणार. प्रवासांत आगगाडीचाच खर्च ह्या मुलखांत फार असतो. त्यांत शक्य तितकी काटकसर केली पाहिजे. आपल्या इकडे आलेल्या इतर देशबांधवां-पैकीं पुष्कळांना थर्डक्लासांत जाणें कमीपणा वाटतो, म्हणून विचारिलें.'

'तूं थर्डक्लासांत जातोस तर मी फोर्थक्लासांत जायला तयार आहें. तूं मला काय समजला आहेस? मी का राजा लुंगवासिंग आहें, का नबाब मारढल्ला आहें?'

'बस् बस्, मला ठाऊक आहे तूं अस्सल भय्या भिस्मिल्ला आहेस म्हणून; पण आपली तुझी परीक्षा पाहिली. मग जायचें ठरलें? उद्यां आतां टामस कुकाच्या ऑफिसामध्यें जाऊन कांहीं सर्क्युलर नोट्स (हुंड्या) घेऊं, आणखी टाइम-टेबल घेऊन प्रवासाचें अंदाजपत्रक तयार करूं.'

वरील संवादाचा काळ जुलई १९१२ चा होता. मी (सुहृद) व वयस्य हे लंडन येथें गेलेले दोघे प्रौढ महाराष्ट्रीय विद्यार्थी होतों. पैकीं मी जरा जुन्या चालीचा होतों.

दुसरे दिवशीं अंदाजपत्रक तयार झालें. बेल्जम, जर्मनी, आस्त्रिया, इटली व स्वित्झरलंड इतक्या देशांत जाण्याचें ठरलें. पहिला मुक्काम ब्रुसेल्स (बेल्जियमची राजधानी) येथें करावयाचा ठरला. सोमवार ता० ९ जुलई १९१२ रोजीं रात्रीं आम्हीं दोघे ९ वाजतां चेरिंगक्रास स्टेशनवर डोव्हरचे गाडींत बसलों. बरोबर एकेक हातपाकीट व छत्री इतकें सामान होतें.

वयस्य म्हणाला, 'नऊ वाजले तरी उजेड बराच आहे! वर्तमानपत्र वाचतां येईल. आपण नऊ वाजतां कधीं बाहेर जात नाहीं, त्यामुळें आपणास भासत नाहीं.'

मी म्हणालों, 'कोणी जैन इसम जर येथें रात्रीं नऊ वाजतां जेवला, तर त्याला वाळींत पडावें लागणार नाहीं.'

१० वाजण्याचे सुमारास आम्हीं डोव्हरला आलों. तेथून आगबोटींत बसून सकाळीं ३। वाजतां ऑस्टेंडला येऊन पोचलों. त्या वेळींही बरेंच उजाडलें होतें. ऑस्टेंड बंदरीं कस्टमची तपासणी! पाकिटें इन्स्पेक्टरपुढें ठेवलीं; किल्ल्या सज्ज केल्या. त्यानें विचारिलें, कोठें जाणार? वयस्य म्हणाला, 'इंडिया.' पाकिटें उघडण्यास न सांगतां त्यानें खडूनें त्यावर 'बी' हें अक्षर काढलें. वयस्य म्हणाला, 'बीच काढावयाची तर मी काढली असती.' मी म्हणालों, 'पण त्याबद्दल तुला पगार मिळाला नसता. फक्त बिनभाड्याचें घर मिळालें असतें.' ऑस्टेंडपासून ब्रुसेल्सपर्यंत बालरवीच्या सौम्यकरलालनानें निद्रासुखाला जास्तीच रुचि आली. मात्र पाय थंडीनें कुडकुडत होते. ५॥ च्या सुमारास ब्रुसेल्स मुक्कामीं आम्हीं येऊन पोचलों. आगगाडीचे डबे आपलेकडील इंटरमीजिएट वर्गासारखे होते. पण वरती बर्थ नसून सामानाला फळी होती. आम्हीं ब्रुसेल्सला पोंचलों तेव्हां सूर्य बराच वर आला होता. ब्रुसेल्सचें स्टेशन मोठें आहे. पण त्याला इमारत म्हणतां यावयाची नाहीं. साधारण भुसावळच्या स्टेशन इतकेंही डोळ्यांत भरत नाहीं. स्टेशनांतच क्लोकरूममध्यें सामान ठेवून आम्हीं बाहेर पडलों व चालतच गांवांत जाण्याचा विचार केला; कारण गांवांतले कोणी शिष्ट आम्हांला हारतुरे घेऊन सामोरे आले नव्हते! स्टेशनांतून बाहेर पडल्याबरोबर पहिला देखावा दिसला तो लहान लहान

गाड्या व त्यांना जोडलेले मोठाले कुत्रे! असे दोन तीन रिकामे श्वानशकट उभे होते; इतक्यांत पुढून एक फळांनीं भरलेला श्वानशकट चालला. त्याबरोबर उभे असलेल्या श्वानांनीं येणाऱ्या श्वानाला उच्च स्वरानें युद्धास आव्हान केलं. तें ऐकून मी जरा पलीकडूनच जाऊं लागलों. वयस्य म्हणाला, 'कां रे सुहृदा ? मीं म्हटलें '

श्वानादिप्रेमविश्वस्तो न याति सुपमां गतिम् ।
बिडालशकटस्थो हि बालः कालवशो यथा ॥ १ ॥

वयस्यानें विचारलें, 'कथमेतत्' अस्मादिक उवाच, "अस्ति कदाचित्–म्हणजे थोडक्यांत, म्हणजे अशी गोष्ट झाली कीं, एका मुलाचें व एका मांजराचें फार सख्य होतें. एक दिवस मांजर मुलाच्या आईला म्हणालें, 'ह्या मुलाला गाडींत घाला म्हणजे मी त्याला हिंडायला नेईन.' आईनें लहानशी गाडी करून आंत मुलाला घालून मांजराला त्या गाडीला जोडलें व गाडी सांभाळून परत आणण्यास सांगितलें. धीरे धीरे गाडी चालली आहे, जोराजोरानें मांजराच्या व मुलाच्या गप्पा चालल्या आहेत, इतक्यांत समोरून गेली एक घूस! मांजरानें घातली उडी; गाडीचे झाले दहा तुकडे व मुलाच्या डोक्याचे झाले वीस! म्हणून मी म्हटलें, 'श्वानादिप्रेम' इत्यादि.

श्वानशाकटिक प्रयोग पाहणें संपवून आम्हीं पुढें चाललों ते समोरच एक ऐसपैस रस्ता दिसला त्यानें निघालों. ह्या वेळीं लोक डाराडूर असल्यामुळें रस्त्याची व्यवहारसंपन्न शोभा दिसत नव्हती; तरी हा एक फायदाच झाला. कारण व्यापाराच्या जादा शोभेकडे लक्ष न वेधतां रस्त्याचीच शोभा पाहण्यास सांपडली. ही शोभा जरी अद्भुत नव्हती तरी लंडनच्या रस्त्यांना कंटाळलेल्या डोळ्यांना ती आल्हादकारक होत होती असें वयस्याचें मत पडलें. लंडनच्या रस्त्यांतील घरांची साधारण एकच एक ठेवण असते, त्यामुळें नवीन घरांत आपण राहण्यास गेलों म्हणजे आठ पंधरा दिवस नंबर

हुडकल्याशिवाय घर सांपडणें मुष्कील ! मुंबईच्या ज्याप्रमाणें चाळी त्या-प्रमाणें ते रस्ते दिसतात. आतां वेगळ्या वेगळ्या रस्त्यांत जरा तऱ्हा बदल-तात, तरीही १०।२० रस्ते हिंडावे तेव्हां डोळ्यांची ग्लानि हरण होते. येथें घरें मोठालीं असून प्रत्येकाची शिल्पपद्धति निराळी असल्यामुळें हा रस्ता पाहून बरें वाटलें. ह्या मोठ्या रस्त्यांत फर्स्टक्लास हॉटेलें बरींच आहेत. परंतु आम्हांला फर्स्टक्लास हॉटेलची जरूर नसल्यामुळें बऱ्याच अंतरावर गेल्या-नंतर आम्हीं एका आडरस्याला वळलों. येथें एका लहानशा घराला हॉटेल ही संज्ञा दिलेली पाहून दार ठोठावलें. आंतून एक दासी आली, तिला विचा-रलें जागा आहे का ? तिला इंग्रजी येत नव्हतें. ती रस्त्याच्या उजव्या हाता-ला पाहून ' मदाम, मदाम ' व आणखी कांहीं चर्पटपंजरी पुटपुटत होती. मी म्हणालों, ' वयस्या, हें बदामाचें दुकान आहे. ' वयस्य म्हणाला तिला पुन्हा विचारूं. तरी तिचें आपलें तेंच. तथापि ' मदाम आंग्ले ' व रस्त्यांत लांब पाहणें, ह्यावरून आम्हीं तर्क केला कीं हिची मालकीण आतां बाहेरून येईल तिला इंग्रजी समजतें. मग ते आंत जाऊन बसले. वयस्य म्हणाला, ' पहारे बुवा, ती दासी खांदे कशी उडवीत होती, आणखी डोळे कशी माकडासारखी करीत होती, आन् माना कशी वेळीत होती, यावरून हें लक्षण कांहीं चांगलें दिसत नाहीं. ' मी ह्मणालों "थांब जरा; भिऊं नको" [ अंगांत नसलें तरी धैर्य दाखविण्याचे प्रसंग हेच असतात. ] पुढें मदाम आल्या; मदाम ह्मणजे बाईसाहेब. मदाम साधारण तरुण वयाच्याच होत्या. त्यांचीही खांदे उडवण्याची तऱ्हा तीच ! पुढें आम्हाला असें कळलें कीं, इकडल्या बाजूला पुरुषांना व स्त्रियांना खांदे उडविण्याची फार संवय आहे. नुसतें राहणें व ब्रेकफास्टचा ठराव केला, व बाकीचीं दोन जेवणें बाहेर घेण्याचें ठरविलें. खोलींत सामानाची व्यवस्था लावल्यावर आम्हीं ब्रेकफास्टला

आलों. वाटेल तितकी कॉफी, वाटेल तितकी ब्रेड [ ह्मणजे कच्चा पाव ] व लोणी असा बेत होता.

वयस्य म्हणाला, ‘ हा कच्चा पाव आपल्याला आवडत नाहीं. ’ मी म्हणालों, ‘पैसे दिले आहेत, आवडनावडीचा प्रश्न काय ? ’ ‘ च्यां कर कीं च्युं कर, तोलमें आई ! ’ वयस्य म्हणाला, ‘ कथमेतत् ? ’ मी म्हणालों, “ एक होते मिठाईखां. त्यांनीं हलवायाच्या दुकानीं मिठाई घेतली व ती खायला बसले. आतां असें झालें कीं, पूर्वींच्या गिऱ्हाइकाला मिठाई तोलतांना तागडींत मिठाई जास्त झाली म्हणून थोडी मिठाई हलवायानें ताटांत परत टाकली, तिच्याखालीं सांपडली होती तांबडी माशी; ती खांसाहेबांच्या मिठाईंत आली होती. तोंडातली कांहीं मिठाई विरघळल्याबरोबर माशी सुटली व तोंडांतच च्यां च्यूं करूं लागली. तिला दांताखालीं रगडतांना खांसाहेब म्हणतात, ‘च्यां कर कीं च्यूं कर, तोलमे आई ! छोडेंगे नही ! तुला बाहेर सोडल्यास मिठाईचें वजन कमी होईल. ’ ”

मग आम्हीं दोघे जे बाहेर पडलों ते टामस कुकाच्या दुकानाकडे वळलों. तें दुकान ‘ रुइद्‌लामदलेन ’ मध्यें होतें. पांच चार पोलिस शिपायांना तसदी देऊन दहा पांच वळणें वळल्यावर एकदाचें आम्हांला दुकान सांपडलें. ( इकडले पोलीस शिपाई विशेष सज्जन असल्यामुळें असली माहिती त्यांनाच विचारण्याची वहिवाट आहे. ) तेथें एक सरक्युलर नोट मोडली ( हुंडी पटवली ) व कांहीं बेल्जन नाणें घेतलें. मग पार्क रॉयल-मध्यें गेलों. लंडनमधल्या पार्क ऊर्फ उद्यानांची मजा त्यांच्या बालतृणांत असते व येथील उद्यानांची शोभा उंच वृक्षांच्या सावलींत असते. पार्कमध्यें एक पुष्करिणी आहे व तिच्यामध्यें पाण्याच्या सपाटीपासून उडणारें कारंजें आहे. त्याचे फवारे फार जाडी असून मधला फवारा सुमारें २५-३० फूट उंच




" च्यां कर कीं च्यूं कर, तोलमें आई ! छोडेंगे नहीं "

उडतो ! पुष्करिणीभोंवतालीं वाटोळी वृक्षवेष्टित व आसनमंडित जागा असून समोरच लोकप्रतिनिधिसभेचें मंदिर आहे. या मंदिरांत दोन सभांचीं वर्तुलाकृति गृहें असून इतर बरींच दालनें आहेत. त्यांच्यांत राजकीय महापुरुषांचीं चित्रें आहेत. प्रतिनिधींची संख्या लहान असल्यामुळें सभागृहेंही बेताचींच आहेत. प्रवासाचा हा पहिलाच दिवस असून रात्रीचेंही जाग्रण झाल्यामुळें आम्हीं लवकरच घरीं परतलों. येथें बाईला सांगून ठेवल्याप्रमाणें तिनें तीन भाज्या—बटाटे, घेवडा, फुलावर—व कणकेचें पुडिंग करून ठेविलें होतें. तेवढ्यानें आमची तृप्ति होऊन मीं पुडिंग तर बळें बळें खाल्लें. संध्याकाळीं रेस्तोरांत जेवावयाचा विचार करून बाईला रात्रीच्या जेवणाचें सांगितलें नाहीं. मग खोलींत जाऊन जी ताणून दिली ती पांच वाजेपर्यंत !

नंतर आम्हीं बाहेर पडलों ते चहाच्या विचाराला लागलों. वयस्य मोठा चहाचा चहाता ! दिवसांतून पांच चार वेळ तरी चहा पोटांत न गेल्यास पोटाच्या राज्यकारभारांत १२४ अ, १५३, वगैरे कलमांची जरूर पडायची. चहा इंग्लंडशिवाय इकडच्या इतर देशांत फारसा प्रिय नाहीं. येथें काफी पिणारे लोक फार. काफीला कफे असें नांव आहे व चहागृहालाही कफेच म्हणतात. मोठ्या रेस्तोरांमध्यें जास्त पैसे पडतील म्हणून एका बारीक कफेमधें शिरलों. ‘तारीफ’ (जंत्री) वर पाहिलें तों चहाला १॥ आणा. त्याबरोबर आनंदित होऊन वयस्य म्हणाला, ‘लंडनमध्यें चहाच्या पेल्याला दोन आणे पडतात, त्यापेक्षां येथें स्वस्त आहे.’ अशा रीतीनें आनंदांत मग्न असतां बराच वेळ झाला. वयस्याच्या पोटांत १२४ अ कलम लावण्यासाठीं स्पेशल जज्ज नेमण्याची पाळी आली ! शेवटीं कपबशा आल्या. वयस्यानें पेल्यांतील पेयाकडे पाहिलें. मला नाटकांतील टॅब्लोची ( निश्चल प्रवेशाची ) आठवण झाली ! शाईची दौत विसळलेलें पाणी पेल्यांत ओतल्याप्रमाणें दिसत होतें ! वयस्यानें सुस्कारा टाकला व मुरलीधराप्रमाणें मान केली.

मीं म्हणालों, 'वयस्या, दिडक्या द्याव्या लागणार आहेत !' वयस्यानें डोळे मिटून साखरेचा खडा व थोडेंसें दूध पेल्यांत घालून ढवळलें. दुसरा मोठा सुस्कारा सोडून चहाचा एक घोट घेतला पण लागलीच पेला खालीं ठेवून कोणा निर्जीवाच्या किंवा सजीवाच्या नातलगांचा लोकप्रिय मराठींत उद्धार केला. मीं म्हटलें 'च्यां कर कीं च्यूं कर, दीड आणा कांहीं झाडावरून माझ्या खिशांत नाहीं पडला ?' माझा निर्धार पाहिल्याबरोबर वयस्यानें चहाचे पैसे देऊन दुकानाबाहेर पळ काढला. वयस्याचा पेला उष्टा असल्यामुळें मीं फक्त आपला पेला संपवून बाहेर पडलों. मग आम्हीं मोठा रेस्तोरा गांठला व काफी मागविली. एकाच्या काफीला साडे-तीन आणे दर होता व चहाला सहा आणे ! वयस्यानें ब्रुसेल्समध्यें पुनः चहा घेतला नाहीं ! मीं म्हटलें 'ब्रुसेल्समध्यें येऊन चहा घेणें म्हणजे सासुरवाडीस जाऊन शिळी भाकरी मागण्याप्रमाणें होय. एकंदरींत तत्त्व काय कीं,

कांटिनेंटे स्वल्पखर्ची चहाचषकं न मागयेत् ॥

इति सपीटनीति ॥

वयस्य म्हणाला, 'मार्गयेत्' असेल ! मी म्हणालों, नाहीं. 'मागयेत्'च आहे. वयस्य ह्मणाला, 'पानस्वातंत्र्याप्रमाणेंच हें उदानस्वातंत्र्य दिसतें आहे.' मी म्हणालों, 'ह्या बाबतींत माझ्या गुरूची सर मला आली नाहीं.' तो ह्मणाला, 'कथमेतत् ?' मी ह्मणालों, "मराठी शाळेंतील मुलें 'शाळांमध्यें शाळा उत्तम शाळा असेच तात्यांची' अशी एक आर्या ह्मणत असतात. त्या उत्तम शाळेंत इंग्रजी सातव्या यत्तेंत आमचे गुरु हे एक विद्यार्थी होते. त्यांना पेपरमध्यें कादंबरींतला एक तुकडा ( Piece ) भाषांतराला आला होता. त्यांत 'किमर्थमागतोसि' असें एक वाक्य होतें. पेपर तपासणारा तासभर विचार करीत होता कीं, (Why do you ask )

हें भाषांतर कशाचें आहे ! शेवटीं किमर्थं मागतोसि, अशीं पदें पाडायचें जेव्हां त्याच्या मडक्यांत आलें, तेव्हां आमच्या गुरूची योग्यता काय ती त्याला कळली. पुढें मग ' श्रुत्वा वार्ता जलद्कथितां ' ह्याचें भाषांतर (Hearing the news told hurriedly) हें पाहिल्याबरोबर ' धरावे ते पाय त्याचे आधीं ' असा प्रकार झाल्यास नवल नाहीं. " वयस्य पुटपुटला ' आणखी फरशीवर आपटावा ! '

नंतर आम्हीं ' ब्वॉद्लाक्रांब्र ' पहाण्यास गेलों. पूर्वी रान होतें त्यांत पायवाटा पाडून अरण्योद्यान केलें आहे. म्हणजे बागायती झाडें वगैरे कांहीं नाहींत. हें स्थळ जरी प्रवासीयांस प्रेक्षणीय म्हणून लिहिलें आहे, तरी आम्हांला यांत रम्य किंवा विशेष असें कांहीं दिसलें नाहीं.

एक गोष्ट सांगावयाची राहिलीच ! शक्य तितकें करून रोज स्नान हें करावयाचेंच असा माझा निश्चय होता, म्हणून बाईला विचारिलें कीं, स्नानाची सोय कोठें आहे? बाई म्हणाली, ' आमचेकडे स्नानगृह नाहीं. ' सार्वजनिक स्नानगृहाचा पत्ता तिनें सांगितला ! लंडनमध्यें लोक स्नान जरी फार लवकर म्हणजे आठवड्यांतून एकवेळ करतात तरी प्रत्येक घरांत स्नानाचा हौद असतो. येथें हॉटेल असून हौद नाहीं ! मी सार्वजनिक स्नानगृहांत गेलों व तिकिटाच्या खिडकींत एक फ्रांक ( १० आणे ) टाकून मोड काय मिळते ह्याची वाट पहात बसलों. तिकीट हातीं पडलें पण मोड मिळेना, म्हणून तिकिटाकडे पाहिलें तों एक फ्रांक किंमत ! वयस्य उवाच,

विलायते सुखं लिप्सुः स्नानं नेच्छेत् दिने दिने।

ह्याच्या पुढची ओळ वयस्याला सुचेना. मीं गेलों स्नानाला ! तेव्हां श्लोक तसाच राहिला ! येथें मला स्नानासाठीं रोज १० आणे खर्चावे लागले.

ब्वॉदलाक्रांब्रमधून घरीं येऊन भोजनार्थ आम्हीं निघालों. एका रेस्तोरामध्यें जाऊन तारीफ पाहिला तर सर्व मांस! परंतु लेग्युम्स या सदराखालीं पॉमं [ बटाटे ] व हॅरिकोज [ घेवडा ] वगैरे पदार्थ होते. वेटर येऊन विचारूं लागला प्यायला काय पाहिजे? त्याला वयस्य म्हणाला 'दलों' [पाणी]. तो ह्मणतो 'काय! पाणी!'' कोणतीच दारू न मागवितां पाणी मागविणारे हे लोक शुद्धीवर आहेत कीं नाहींत· ह्याचा त्याला संशय आला असावा. मग त्यानें पाण्याची बाटली व ग्लास आणून ठेवलें. बिलांत पहातों तों पाण्याबद्दल प्रत्येकाला अडीच आणे चोपले! त्या लोकांना मराठी समजत नव्हतें म्हणून बरें झालें! नाहीं तर वेटर वयस्याच्या वाग्बाणांनीं जर्जर झाला असता!

दुसरे दिवशीं आम्हीं प्रातरुत्थाय यथावकाश ब्रेकफास्ट् घेऊन निघालों. म्युझी[म्युझियम]द पिक्चर्स म्हणजे चित्रशाळा कांहीं वेळ पाहून पॅलेद्युजस्तिसकडे गेलों. तेथें गेल्यावर आम्हांला कळलें कीं, 'दोम' [ घुमट ] पाहणें असल्यास १।। किंवा ३ वाजतां आलें पाहिजे. तेथून मग टाऊन हॉल पाहिला. त्यांत एक गॉथिक पद्धतीचा दिवाणखाना होता, तेवढा आम्हांला प्रेक्षणीय वाटला. मग बुर्स [ शेरमार्केट ] मध्यें गेलों. तेथें एका दारांतून लोक जात येत आहेत असें पाहून आम्हीं आंत चाललों. त्याबरोबर एका शिपायानें मागें ओढलें. 'तिकेत?' टिकेट घेऊन आंत कोण जातो–विशेषतः धक्का मिळाल्यावर! ओऱ्यांग–ओटँगसारखें तोंड करून बाहेर पडलों. आमची फजिती पहाण्यास तिसरा कोणी नव्हता म्हणून बरें झालें, नाहीं तर सगळ्या महाराष्ट्रांत तोंड काढायला जागा नव्हती!

लवकर जेवण उरकून आम्हीं पॅलेद्युजस्तिसला गेलों. टॉवरची व बाजूच्या न्यायकोर्टाच्या खोल्यांची प्रवेशफी दिली असल्यामुळें दाखविणारा बरोबर होता. प्रथम आम्हांस असें वाटलें कीं, इतर इमारती तशी ही एक इमारत. परंतु आंत

गेल्याबरोबर तो ग्रह बदलला. विशेष अभिमानी लोक ह्या इमारतीला जगांतील आश्चर्योपैकीं एक ह्मणतात, त्यांत जरी अतिशयोक्ति असली तरी एवढ्या-इमारतीसाठीं ब्रुसेल्स बुद्धया पहाण्यासारखें आहे. ही इमारत जर संगमरवरी दगडाची असती तर तिला ताजमहालची उपमा दिली असती. परंतु ती साध्या स्टुक्को नांवाच्या दगडाची आहे व नकशीकामहि हिच्यांत नाहीं ह्मटलें तरी चालेल. ह्यामुळें विजापुरच्या इमारतीची उपमा देणें शोभेल. ह्याचा मुख्य गुण म्हणजे विशालत्व. मोठमोठे खांब, पुष्कळशी लांबी, रुंदी व उंची ह्यांनीं हिला विशेष गौरव आलें आहे. टॉवरवर चढून वरच्या डोम-वर चढून गेलें म्हणजे पुष्कळ दूरवरचा देखावा दिसतो. ह्या इमारतीच्या दगडाला पांढरा रंग असल्यामुळें व हे दिवस स्वच्छ हवा व प्रकाशाचे असल्यामुळें वारंवार आम्हांला मोंगली कारागिरीची आठवण होत होती.

नंतर गाइड बुकावरून केलेल्या लिस्टांत म्यूझीवीयझ म्हणून एक होता. तो पाहिल्यानंतर पुष्कळांना झोंप लागत नाहीं, एवढीच आम्हांला त्यासंबंधीं माहिती होती. पॅलेद्रुजस्तिसच्या दर्शकाला कांहीं इंग्रजी येत होतें. आम्हांला 'मेर्सी' ( म्हणजे थँक्स–आभार ) हा एक शब्द येत होता व इतरांना तितकेंही कांहीं इंग्लिश येत नव्हतें. आम्हीं विचारावें 'आंग्ले' ( म्हणजे इंग्लिश ) व त्यांनीं म्हणावें 'ना'. याचें नांव इंटरनॅशनल इंटरकोर्स ! दर्शकाला आम्हीं म्यूझीवीअझचा पत्ता विचारला. त्यानें एका ट्रामचा नंबर सांगितला. किती वाजतां बंद होतो, म्हणून विचारलें तर ५ वाजतां म्हणून सांगितलें. चार वाजण्याचे सुमारास पोचूं व एक तास पाहूं अशा बेतानें आम्हीं निघालों. पोंचलों तेव्हां ४ ला पांच मिनिटें होतीं. दारापाशींच ओरँग–ओटँग, चिंपांझी, गोरिला वगैरे चार्लस डार्विनच्या आतेभावंडांचीं पेंढा भरलेलीं शरीरें होतीं. तीं पाहतां तों घण घण घण घण घंटा होऊन प्रेक्षक बाहेर पडूं लागले! वयस्य म्हणाला

"सुहृदा, आतां काय करावें?" मीं म्हटलें "ह्या भावंडांच्या शेजारीं बसायचें असलें तर येथें रहावें, नाहीं तर बाहेर जावें; कारण म्यूझी ४ वाजतांच बंद होतो असें दिसतें." वयस्य म्हणाला 'मी तें नाहीं विचारिलें. मी शिव्या कोणाला देऊं तें सांग; ह्या म्यूझीच्या रक्षकांना कीं खोटें सांगणाऱ्या पॅलेग्रुजास्तिसच्या दर्शकाला?' सार्वजनिक वाचनालयाच्या विश्वकोशांत पाहून सांगतों अशी मीं त्याची समजूत घातली; व शेजारच्या दुकानांत एक आइस्क्रीमचें डबडें त्याच्या घशांत ओतलें तेव्हां तो मुकाट्यानें घरीं आला.

दुसरे दिवशीं सकाळीं आम्हीं म्यूझीसिंकातनेर पाहण्यास गेलों. ह्याचा उच्चार इंग्रजी पद्धतीनें सिंकाटेनेअर असा होतो. त्यामुळें, पोलिस किंवा ट्रामकंडक्टरच्या पुढें जिभेच्या कसरतीच्या दहा पांच उड्या करून दाखवाव्या लागत तेव्हां कोठें आमचें काम होई. म्यूझीसिंकातनेर ( अनुस्वार हा मेंढेंत घ्यायचा ) येथें रोमन, ग्रीक, जपानी, चिनी वगैरे प्राचीन व अर्वाचीन कारागिरीचा संग्रह एका बाजूला आहे. सर्वच वस्तु अस्सल आहेत असें नाहीं. पुष्कळशा नकला आहेत. प्लास्टर ऑफ पॅरिसच्या केलेल्या संगमरवरी कारागिरीच्या नकला वगैरे मी पहात होतों. इतक्यांत वयस्यानें नमस्कार केलेला मला दिसला! कशाला नमस्कार केला म्हणून पाहतों तों समोर गणेशाची मूर्ति! त्याजवळ शिवाची मूर्ति असून एक लहानसें खरें गोपूर व सांचीच्या टोपाचा नमुना, वगैरे तेथें होतीं. तेथें एक हरिहर म्हणून मूर्ती होती पण ती हरिहराची खरोखर नाहीं हें ती तेथें ठेवल्यापासून प्रथम आम्हालांच कळलें असेल! दुसऱ्या बाजूला युरोपांतील मध्ययुगांतील कपड्यावरील कारागिरी व लोकरीचे चित्रमय गालिचे तसेंच चिनी मातीची वगैरे कारागिरी होती. आंतील शोभेपेक्षांही ह्या इमारतीची बाहेरील शोभा फार प्रेक्षणीय आहे. ही एका मोठ्या बागेंत असून प्रवेशाचा रस्ता साधारण बडोद्याच्या मकरपुऱ्याच्या रस्त्याप्रमाणें आहे. खुद्द इमारत

बरीच उंचावर अर्धचंद्राकृति बांधली असून मध्यें जी कमान आहे तिच्या खालून प्रवेशाचा रस्ता तीराप्रमाणें पलीकडे गेला आहे. एकदर अर्धचंद्र मोठा विशाल आहे व म्युझियमवर छप्पर क्रिस्टल पॅलेस प्रमाणें तावदानाचें आहे. येथील अशा कांहीं इमारतींची लंडनच्या तद्विषयक इमारतींशीं तुलना केली असतां येथीलच श्रेष्ठ ठरतील असें वयस्याचें मत पडलें व मीं एकदम त्यास अनुमोदन दिलें. मधल्या कमानीवर दगडी चित्र आहे तें असें कीं एक मोठी बाई– हातांत भाला धरलेला असून –चार घोड्यांचा रथ हांकते आहे. हें चित्र पॅलेद्युजस्तीसच्या टॉवरवरून दिसत होतें.

येथील मोठ्या शहरांत बझार ह्मणून असतात. हे साधारण क्रॉफर्डमार्केट सारखे असतात. परंतु ह्यांत मंडई, धान्य वगैरे पदार्थ नसून स्टेशनरी ह्या सदराखालीं येणारे व इतर व्यवहारोपयोगी व घरगुती पदार्थ असतात. तसेंच दुकानें जास्त आटपशीर असतात. येथून १॥ वाजतां कलोन शहराचीं तिकिटें घेऊन आम्हीं निघालों.

---

## संचार दुसरा

# कोल्न Koln ( जर्मनी )

( इंग्रजी उच्चार कलोन )

ब्रुसेल्सहून दुपारीं १॥ वाजतां आगगाडींत बसून आम्हीं निघालों. गाडीची पोंचण्याची टाइम ७–४० होती. तास दोन तास गेल्यावर देखावा फार सुरेख दिसूं लागला. कांहींसा उंच सखल प्रदेश; मोठाले किंवा लहानही डोंगर कोठें दिसले नाहींत. झाडें वगैरे मुबलक; क्वचित् एकाद्या

'काठिणां'तून ( Cutting टेंकडी फोडून केलेला रस्ता ) गाडी जाऊं लागली म्हणजे बोरघाटाची आठवण होते असें वयस्य म्हणाला. मीं म्हटलें 'येथें चवेणीचीं झाडें नाहींत.' वयस्य म्हणतो 'असा कधीं टिपू सुलतानचा हुकूम सुटला आहे कीं बोरघाटांत चवेणीचीं झाडें असलींच पाहिजेत ? येथें बोरें नाहींत किंवा बोर लोक नाहींत असें कांहीं तूं म्हणतास तर तुझें म्हणणें मला पटलें असतें.' असें तो बोलतो आहे तों गाडी एका स्टेशनांत उभी राहिली. इतक्यांत वयस्य उठला व त्यानें कोणालासा लवून सलाम केला. मीं मनांत ह्मटलें कीं ह्या 'फ्रमथालफुर्थ' (किंवा अशाच कांहीं ) गांवीं ह्याला कोण 'हुजुर' भेटले? मोठ्या उत्सुकतेनें मीं पहाणार तोंच वयस्य म्हणतो 'अरे सुहृदा ! तो बघ जर्मनीचा बादशहा!' मीं पाहिलें तों निळा डगला पांढरी विजार व डोक्याला रोमन लोकांसारखें धातूचें शिरस्त्राण घातलेला एक मनुष्य दिसला. इतक्यांत काय गंमत झाली, किती तरी जर्मनीचे बादशहा एकदम दिसूं लागले! ते साधे जर्मन 'सोजिर' आहेत असें मीं सांगितलेलें वयस्याला खरेंच वाटेना. पण जेव्हां त्यांतील कांहीं 'बादशहा' आमच्या डब्यांत थर्डक्लासांत येऊन बसले व एक दोघे डुलक्या घेऊं लागले, तेव्हां वयस्याच्या मतांत महत्त्वाचा फेर पडला.

गाडी ७-४० वाजतां कलोन मुक्कामीं पोंचावयाची होती. ६-४० चा सुमार झालेला होता, व एक तास अवकाश होता म्हणून आम्हीं स्वस्थ होतों. इतक्यांत गाडी उभी राहिली. एका बादशहानें विचारलें, 'कलोन?' दुसरा ह्मणाला 'याः याः' ( इंग्रजींत 'यस्' म्हणतात तेथें जर्मन 'याः' yah म्हणतात. ) वयस्य घोरत होता. त्याला जागा करून मी खालीं उतरलों व विचार करूं लागलों. तेव्हां लक्षांत आलें कीं, जर्मन मुलुखापासून पुढें मिड् युरोपियन टाइम मोजण्यांत येते. ती टाइम ग्रीनिच टाइमच्या एक तास पुढें आहे. वयस्य म्हणाला, 'माझा एक तास फुकट

कीं हो गेला ! ' मीं म्हणालों ' हिंदुस्थानांतून येतांना * ५॥ तास हरामचे मिळविले होतेस तेव्हां कांहीं बोलला होतास कां ? रोज १५-२० मिनिटें घड्याळ मागें सारीत होतास ' ! वयस्य म्हणाला ' त्यामुळें तर मला उलट जेवायला उशिरां मिळत असे ! ' मीं म्हटलें ' आज एक तासभर लवकर जेव म्हणजे झालें ! '

स्टेशनवर क्लोकरूम सांपडतां सांपडतां मारामार; सगळें स्टेशन धुंडलें तेव्हां एके ठिकाणीं ती सांपडली. तेथें आम्ही सामान ठेवून बाहेर पडलों. रस्त्यांत एक पोलीस दिसला त्याला इंग्रजी येत होतें. टामस कुकाच्या गाइडबुकांत एका शाकाहारी भोजनालयाचा पत्ता होता. त्याचें नांव क्रिसिसाना व पत्ता Neu markt असा होता. आम्ही पोलिसला न्युमार्कट म्हणून विचारलें; त्याला समजेना; लिहून दाखविलें. तो ह्मणाला, ' नॉय मार्क्ट ' असें म्हणून त्यानें ट्रामचा नंबर सांगितला. वयस्य म्हणाला, ' नॉय ' असा उच्चार कसा झाला ! ' मग त्याला आठवण झाली कीं, Euler ह्मणून एक प्रसिद्ध गणिती होता. त्याचें नांव रँगलर परांजपे ' ऑयलर ' असें उच्चारीत असत. तेव्हां सिद्धांत टरला कीं, इंग्लिश ' यू ' चा जर्मन ' ऑय ' होतो ! पोलिसनें सांगितलेल्या नंबराच्या गाडींत बसणार तों आम्हांस स्मरण झालें कीं, आपणाजवळ जर्मन द्रव्य नाहीं ! आतां मग ? आसपास एक्सचेंजचीं दुकानें दिसत होतीं, पण त्या वेळेस सगळीं बंद. मग एका केमिस्टाच्या दुकानांत शिरलों व विचारलें ' इंग्लिश ? ' त्याला मोडकें तोडकें इंग्रजी येत होतें. मग इंग्रजींत विचारलें ' १ पौंड मोडून जर्मन पैसे देतोस काय ? ' तो म्हणाला

* पूर्व पश्चिम अंतरामुळें सूर्य पूर्वेकडील मुलखांत आधीं उगवतो. लंडनमधील मध्यान्ह व हिंदी स्टँडर्ड टाइम मध्यान्ह ह्यांत ५॥ तासांचा फरक आहे. युरोपमधेंच पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत सुमारें दोन तासांचा फरक पडतो.

' या या. ' वयस्य म्हणाला 'हा काय आपणास जेवावयास बोलावीत आहे ?' मीं म्हटलें, 'त्याची मुलगी लग्नाची आहे. करतोस ?' वयस्य म्हणाला 'नकोरे बोवा, माझी पहिली बायको तिला आणि मला दोघांनाही जिवंत राहूं देणार नाहीं ?' मी म्हणालों 'हें वाक्य ऐकून हिंदुस्थानच्या भविष्यकाळाविषयीं मला बरीच आशा आली आहे.' त्या शार्मण्यानें आम्हांला २० मार्क ( रुप्याचें जर्मन नाणें ) दिले. वयस्य म्हणाला, 'त्याच्या उपकाराचा मोबदला फेडला पाहिजे.' असें म्हणून त्यानें एक रोमरोहक तेलाची बाटली तेथें विकत घेतली. पुढें अनुभवाअंतीं असें कळलें कीं, तेलाचे त्यानें दुप्पट पैसे घेतले व शिवाय असें कीं एका पौंडाला २० मार्कपेक्षां जास्ती जर्मन मोड मिळते. एकंदरींत शहाणपण विकत घ्यावें तेव्हां तें खरें उपयोगी असतें.

आम्हीं ट्राममधें बसून कंडक्टरला नॉयमार्क्ट म्हणून सांगितलें व खुणेनें सुचविलें कीं नॉयमार्क्टला आम्हांला उतरून दे. त्याप्रमाणें त्यानें उतरून दिलें व तेथें किसिसानाही सांपडली. तेथें राहण्यास जागा नसल्यामुळें फक्त जेवावयाचें ठरलें. तेथें वेटर होता त्यानें हातांत याद दिली ती जर्मन; आम्हांस कांहींच समजेना! पण त्याला थोडें इंग्रजी येत होतें. ' राइस, पोटॅटोज ' वगैरेंचे जर्मन शब्द त्याला विचारून जेवण तर पोट भरून घेतलें. त्याच्या जवळून एका हॉटेलचा पत्ताही विचारून घेतला. मग त्याला जर्मनींतील दुसऱ्या कांहीं गांवांतील शाकाहारी भोजनालयांची माहिती आहे काय ह्मणून विचारिलें. तेव्हां त्यानें एका शाकाहारविषयक वर्तमानपत्रांतील जाहिरातीचें पान फाडून दिलें. त्या पानाचा उपयोग पुढील प्रवासांत ठिकठिकाणीं शाकाहारी सोय करून घेण्यांत झाला. जर्मनींतील तर सर्व गांवीं शाकाहारी भोजनालयें सांपडलींच, पण व्हिएन्ना व लुसर्न येथेंहि त्या कागदांतील माहिती उपयोगी पडली. व्हेनिस व फ्लॉरेन्स ( इटली ) येथें मात्र साधारण भोजनालयांतच सोय करून घ्यावी लागली.

याप्रमाणें हॉटेलांत राहण्याची सोय बरी जमल्यामुळें दुसरे दिवशीं सकाळीं उठून बाहेर पडल्याबरोबर टामस कुकाकडे जाऊन थोडे पैसे मोडून घेतले; व इंग्रजी, फ्रेंच, जर्मन व इटालियन ह्या भाषांतील मुख्य संभाषणांतील शब्द व वाक्यप्रयोगांचें पुस्तक ( १ शिलिंगाचें ) विकत घेतलें. हें काम झाल्यावर मग प्रथम कलोन येथील प्रसिद्ध कॅथीड्रल पाहण्यास निघालों. कॅथीड्रलचा आकार साधारणपणें क्रॉससारखा असतो. म्हणजे मधला उभा पट्टा बराच लांब असून टोंकाजवळ आडवा पट्टा असतो तो आंखूड असतो. ह्यामुळें मुख्य प्रार्थनेच्या जागीं तीन चौकोनी पाकळ्या होतात, त्यांवर घुमट असतो व त्यावर शिखर असतें. ह्या कॅथीड्रलला दोन शिखरें होतीं. लांब पट्टा ( याला आपण सभामंडप म्हणूं ) ह्याच्या लांबीभर खांबाच्या दोन रांगा असून त्यांच्यामुळें त्यांत सभामंडप व दोन पडव्या होतात. पाकळ्यांमध्यें ख्रिस्त, मेरी, स्थानिक संत वगैरेंचीं देवळें लहान लहान असतात. पाकळ्यांच्या मध्यभागीं पुराणाची जागा असते व सभामंडपांत व पडव्यांत बाकं असतात.

देवळांत शिरतेवेळीं हातांत टोप्या काढून घ्याव्या लागतात. लागतात म्हणजे तसा कांहीं कायदा नाहीं, परंतु टोपी न काढल्यास अपमान केल्यासारखें होतें. त्याप्रमाणें अवस्त्रशीर्षा होऊन आंत शिरलों. खालच्या वरच्या ओंठांमध्यें बरेंच अंतर ठेवून, मानेचा शरीराशीं जवळ जवळ काटकोन करून व कटेवरी कर ठेवून एकदां सर्व कॅथीड्रलकडे नजर टाकल्यावर गाइड बुकांत काय लिहिलें आहे तें पाहण्यासाठीं पुस्तक उघडलें. भिंतींत खिडक्या होत्या त्यांच्या झडपांना तावदानें होतीं तीं रंगीत कांचांचीं चित्रें होतीं. त्यांचें वर्णन पुस्तकांत वाचलें व पुस्तक मिटून निघालों. त्या वेळीं वयस्याला भान न राहून त्यानें डोक्यावर टोपी ठेवली. तेथें एक पाद्री होता; तो कांहीं बोलला नाहीं, पण बजरबट्टूसारखे डोळे करून त्याजकडे पाहूं लागला. मी वयस्याला म्हणालों, ‘देवळांत टोपी घातल्याबद्दल जर तुला पकडलें तर या परदेशांत तुला जामीन सुध्दां रे कोणी मिळणार नाहीं!’

वयस्य—( घाबरून ) मग आतां ?

मी— आतां तू देवापुढें जाऊन गुडघे टेंक आणि ह्या पाद्याला कांहीं चकारी पकारी अर्पण कर, तर धडगत आहे !

वयस्यानें टोपी काढलेली पाहून तो पाद्री निघून गेला. तेव्हां वयस्याच्या जिवांत जीव आला. मग आम्हीं कॅथीड्रलच्या टॉवरवर चढण्यास गेलों. येथें वर जाण्यास फी आहे. घुमटाला दोम ( Dom ) म्हणतात व त्यावरून कॅथीड्रलही दोम ह्या नांवानेंच ओळखलें जातें. टॉवर पुष्कळ उंच असून त्याच्या माथ्यावरून ऱ्हीमती ( ऱ्हाइन ) नदीप्रवाह बऱ्याच लांबवरपर्यंत दिसतो. त्याचप्रमाणें शहराचेंही इतर भागांचा विहंगमावलोक प्राप्त होतो. वयस्य म्हणालाच कीं, ‘ आपणांस पंख असते तर बरें झालें असतें, मग आपणांस ह्याप्रमाणेंच इतरही मजेदार देखावे पहाण्यास सांपडले असते. ’ टॉवर दाखविण्यास एक दाखविणारा मनुष्य देतात. इंग्रजींत त्याला गाइड ह्मणतात. मी वयस्याला ह्मटलें कीं, गाइड शब्दाला योग्य मराठी शब्द काय ?

वयस्य–कां ! वाटाड्या शब्द नाहीं कां ? शाळेंत हा शब्द पाठ केला असून विसरलों त्यामुळें हातावर छडी खाऊनच्या खाऊन पंचवीस वेळां ‘ Guide–वाटाड्या ’ हें मला लिहून काढावें लागलें ! विसरण्याची कांहीं धास्ती नाहीं.

मी—पण ह्या ठिकाणीं हा शब्द तुला योग्य वाटतो काय ?

वयस्यानें कांहीं वेळ विचार करून ठरविलें कीं, वाटाड्या हा शब्द कांहीं येथें ‘सुखी’ ( happy ) नाहीं. मग तो म्हणाला ‘ गाइडचें मराठी रूप गायडा असें करावें. ’

मी—हें मराठी रूप कसें ?

वयस्य—म्हातारडा, गोसावडा—

मी—चिवडा, घेवडा इत्यादिप्रमाणें.

वयस्यानें पिकलेल्या टोमाटोसारखे डोळे केले. मग एकमतानें ( म्हणजे दोन्ही मतांनीं ) गाइड ह्याबद्दल ‘ दाखवडा ’ हा शब्द वापरण्याचें ठरलें. दाखवड्यानें आह्मांला वरपर्यंत नेऊन खालीं येतांना तेथील घंटा दाखवल्या. त्या घंटांच्या पुढें नारोशंकरची घांट कांहींच नाहीं. सर्वांत मोठी आहे ती २७ टन वजनाची आहे व तिचा लोलक हलवून घंटा वाजविण्यास तब्बल २८ माणसें लागतात. ही फक्त वर्षांतून ७ वेळ वाजवितात. एक मनुष्य सहज आंत उभा राहील एवढी ती उंच आहे.

वयस्य म्हणाला ‘ स्त्रियांच्या जिभेला घंटेची उपमा देणारांनीं ही घंटा पाहिली नसेल ! ’ मी ह्मटलें ‘ ह्या घंटेला स्त्रीच्या जिभेची सर येणार नाहीं. ह्या घंटेकडे दुर्लक्ष्य केलें तर एकवेळ चालेल, पण स्त्रीच्या जिभेचें तसें आहे काय ? शिवाय त्या घंटेचा नाद तुमच्या मर्मस्थानीं जाऊन भिडतो.’ वयस्य ह्मणाला ‘ तसली एक घंटा तूं गळ्यांत अडकवून घेतली आहेस; ही घंटा अडकवून घेशील काय ? ’ मी म्हटलें ‘ नाहीं. ’ वयस्य म्हणाला ‘ मी कारण सांगतों. सुवर्णमंडित केली तरी ही घंटा मधुर वाजणार नाहीं. ’ मी म्हणालों ‘ किंवा प्रेमरसानें ही विरघळणार नाहीं. ’

खालीं उतरल्यानंतर स्नानाच्या उद्देशानें नदीकडे निघालों. खिशांत बेदिंग (स्नानाचा) सूट होता ( हें मांड्यांपासून गळ्यापर्यंत असें एकच वस्त्र असतें ). न्हीमती नदीच्या कांठावर कोणा अहिल्याबाई होळकरणीनें घाट बांधला आहे कीं काय हें पाहूं लागलों, परंतु घाट कोठेंच दिसेना ! इतक्यांत पैलतीरावर नदींत एक खोली असून तिच्या आसपास कांहीं लोक पोंहत आहेत असें दिसलें. मग आह्मी पूल वलांडून जाण्यास निघालों. पुलावर माणशीं २ पेनिग ( सुमारें पाव आणा ) कर द्यावा लागला. पूल फार मोठा असून रुंदही आहे. अर्ध्या पुलावर आग-

गाडीचा रस्ता आहे. वयस्य म्हणाला ‘ पुलावरून आपण आगगाडींतून आलों त्यावेळीं आपणांजवळून पैसे घेतले नाहींत हें भाग्यच ! ’ पुलापलीकडे गेल्यावर आम्ही स्नानगृहांत शिरलों. हें स्नानगृह लांकडी असून रामजी पाटलाच्या अंगणाप्रमाणें चौपडवी आहे व नदीवर अशा रीतीनें बांधलें आहे कीं, तें जरी जागचें हलत नाहीं, तरी नदी त्या खालून वहात असते. मधल्या चौकोनाला भोंवतालून आडवे उभे वासे आहेत त्यांतून पाणी जातें पण मनुष्य जात नाहीं. आह्मीं तेथील फी दिल्याबरोबर आह्मांला एकेक परीटघडींची चड्डी व टॉवेल मिळाला. ( येथून पुढें आह्मी स्वतःचा बेदिंगसूट कधीं नेला नाहीं. ) तेथें भोंवतालच्या पडव्यांत लहान लहान खोल्या होत्या व त्यांना दारांऐवजीं पडदे होते. तेथें पोषाख उतरून व चड्डी नेसून वयस्य पाण्यांत उतरला. चार पांच हात मारल्याबरोबर तो खूप लांब गेला. तेव्हां तो म्हणतो ‘ मला वाटलें माझी पोंहण्याची संवय गेली असेल परंतु नेहमींपेक्षांही मला आज जास्त पोंहतां येत आहे ’. मी म्हटलें ‘ असें कां ! तर एकदां मला परत येऊन दाखव पाहूं. ’ वयस्यानें तोंड फिरवून परत येण्याचा प्रयत्न केला. तों काय ! जागच्या जागीं स्थिर सुद्धां राहवेना ! मग परत येण्याची गोष्ट दूरच ! तेव्हां त्याच्या लक्षांत आलें कीं त्याच्या पोंहण्याच्या वेगापेक्षां पाण्याच्या प्रवाहाचा वेग जास्त आहे ! ! मग तो स्नानगृहाच्या दुसऱ्या टोंकापर्यंत गेला व तेथून वर चढून गृहांतून चालत अलीकडच्या बाजूस आला. कारण त्याशिवाय पोंहत अलीकडे येणें शक्यच नव्हतें. मनसोक्त पोंहून झाल्यावर कपडे करून आह्मी बाहेर पडलों. ऱ्हाइन नदीचें पात्र चांगलेंच रुंद असून त्याच्यांतून आगबोटी जातात येतात व नदीवर मोठा व्यापार चालतो. तेथेंच पलीकडे एक नावांचा ( होड्यांचा ) पूल होता. एकादी आगबोट आली ह्मणजे कांहीं नांवा

काढून बाजूस फिरवीत असत. " ह्या नदीचा हा सर्व देखावा पाहून मला गंगानदीची आठवण झाली. गंगानदी पाहिली त्या वेळीं मी लहान होतों त्यामुळें बरोबर सांगतां येणार नाहीं, परंतु मला स्मरतें तितक्यावरून ती ऱ्हाइन नदीपेक्षां मोठी असावी असें खास वाटतें. येथें मी ऱ्हाइन नदीचें पात्र पाहिलें तेवढें मी नर्मदा, तुंगभद्रा ह्या नद्यांचेंही पाहिलें आहे. परंतु आपलेकडील नद्यांतील पाणी वर्षांतून कांहीं महिने अगदींच कमी होतें, तसें ह्या नदीचें नाहीं. तें बहुतेक सारखेंच रहातें. असो. वयस्य स्नानगृहावर फारच संतुष्ट झाला व पुण्यास गेल्याबरोबर मुळामुठासंगमावर असलें एक स्नानगृह बांधण्याचें त्यानें ठरविलें. मी त्याला सुचविलें कीं तो संगम पुणें शहरापासून लांब असल्यामुळें गिऱ्हाइकें येणार नाहींत, सबब आंबील ओढा व नाकझरीच्या संगमावर बांधल्यास बरें ! माझ्या सूचनेचा योग्य विचार करण्याचें त्यानें अभिवचन दिलें.

पुढें गाइड बुकांत पहातां Rathaus अशीं अक्षरें दिसलीं. वयस्य म्हणाला येथें उंदीरघुशींचें प्रदर्शन दिसतें आहे, चला जाऊन पाहूं. परंतु पुढील वर्णनावरून पाहतां तो टाऊनहॉल ( नगरवाडा ) आहे असें कळलें. तो पाहण्यास आम्हीं गेलों. प्रवेश फी दिली त्यामुळें एक 'दाखवडा' मिळाला. दहा पांच दालनें, त्यांत बऱ्याचशा तसबिरा व 'टॅपेस्ट्री' ज्याला इंग्रजींत म्हणतात तसे रंगीत चित्रखचित लोंकरी गालिचेवजा पडदे भिंतीवर लावलेले दाखवण्यांत आले. त्या दिवशीं हें राटहाऊस पहाण्याचा आम्हाला पश्चात्ताप वाटला नाहीं; परंतु प्रवासांत पुढें पुढें हीं राटहाउसें पहाण्याचा कंटाळा आला. प्रत्येक मोठ्या गांवांत एक राटहाऊस असतेंच. तेथें स्थानिक ऐतिहासिक महत्त्वाचे प्रसंग दाखविणारीं चित्रें, तसबिरा वगैरे असतात. म्युनिसिपालिटीच्या सभाही येथेंच भरतात. एकंदरींच्या मानानें येथील राटहाऊस जरा कमीच प्रतीचें होतें.

येथपर्यंत आह्मीं स्टेशनच्या आसपासच होतों. वयस्य म्हणाला ' हें गांव अगदींच रद्दी दिसतें आहे; घरें साधारणच असून रस्ते म्हणजे अगदींच गल्ल्याकुच्या दिसत आहेत. ' त्याच्या म्हणण्यास अनुमोदन मिळाल्यावर आह्मीं भोजनालयाकडे वळलों. भोजनोत्तर आह्मी काइसर वुइल्हेमचा डेंकमाल म्हणजे पुतळा पहाण्यास गेलों. त्यावेळीं आह्मांस शहराचा नवीन भाग दिसला. तेथील रस्ते मात्र चांगले रुंद व पॅरिसफॅशन-म्हणजे रस्त्याच्या दोन्ही बाजूंस झाडें असून शिवाय मधून पदपथ असतो त्यावरही झाडें लावलेलीं-असे होते. डेंकमाल मोठा होता पण त्यांत कांहीं विशेष गौरव नव्हतें असें वयस्याचें मत पडलें. तेथून मग आह्मी 'फोक गार्टन' पहाण्यास गेलों. हें एक सार्वजनिक उद्यान आहे. उद्यानांत कांहीं विशेष नाहीं, परंतु मध्यें एक जलाशय आहे त्यांत विहार करण्यासाठीं बोटी भाड्यानें मिळतात. असली एक बोट भाड्यानें एक तासभर घेऊन संचार करण्यास आह्मी निघालों. संचार करतां करतां एकदम एक देखावा दिसूं लागला. जलाशयाच्या मध्यें एक बेटासारखी लहान जागा होती तेथून मोठें थोरलें कारंजें उडूं लागलें. २०।२५ फूट तरी हें उंच जात असेल. ह्या वेळेस वारा जरी अगदीं थोडा होता तरी कारंजाच्या एका बाजूकडील बराच भाग तुषारमय झाला होता व त्यांत इंद्रधनुष्य दिसत होतें. ह्या तुषारखचित जागेंतून होडी नेतांना आमच्या ग्रीष्मतप्त देहाला फारच आल्हाद वाटत होता. वयस्य ह्मणाला ' मी आतां कविता करतों ! ' मी घाबरलों ! त्याच्या पुष्कळ हातापायां पडलों, जलदेवतांची व स्थलदेवतांची करुणा भाकली. परंतु तेथील देवतांस मराठी समजत नव्हतें असें सिद्ध झालें ! हताश होऊन मीं संकटाला तोंड देण्याचें ठरविलें. ( वयस्य माझ्या अभिमुखच होता ). मी शेवटला उपाय म्हणून त्याला म्हटलें कीं, तुला कविताच हवी असेल तर कालिदासाचा एखादा श्लोक मीं म्हणून दाख-

वितों. कालिदास किंवा जगन्नाथ पंडित तुला पटत नसल्यास, मूकनायक किंवा तुझ्या आवडत्या लीलावती नाटकांतील पद म्हणून दाखवितों किंवा फार तर तूं स्वतः म्हण (लोक धोंडे मारीपर्यंत) पण हा अनर्थ नको ! परंतु त्याचा निश्चय अढळ राहिला व पुढील अद्‌भुतकाव्य भूतलावर निर्माण झालें.

चालः— ( अजि म्या ब्रह्म पाहिलें. )

कसें हें पाणी ऊडतें । सर सर, भर भर, वर वर चढतें ।
खालीं पऽडतें ॥ ध्रु० ॥ तुर तुर येथें तरंग तरती । दुर
दुर धावुनि तुषार फिरती । स्थिरचर मोहें भासे भारिती ।
हर हर हें मम हृदयहि चोरिती । क्षुद् तृट हारते ॥ १ ॥

मी एव्हांना घोरूं लागलों होतों. मला वयस्यानें हांक मारली. मी संगीतांत उत्तर दिलें 'श्रोते सर्वहि जोरें घोरति ॥' मग मी त्याला विचारलें 'पद संपलें काय ?' तो म्हणाला 'संपलें !' मी म्हटलें 'मी आणखी अंतरा रचतों.' तो म्हणाला 'उत्तम !' मग मी पुढीलप्रमाणें अंतरा म्हटला.

दर दर धारा अंगा स्फुरती । कर कर कोरा जोडा मारति ।
चर चर वाटे मस्तक चिरती । घर घर कंठा लागे थोर ति ॥
खत्रुड् फार तें ॥ २ ॥

वयस्यानें होडी किनाऱ्याला लाविली व बागेंतील एका बांकावर बसून दीनवाणी मुद्रा करून त्यानें बांकावर मान टाकली. मी त्याची नाडी पाहिली व ती पूर्ण जोरांत चालली आहे असें पाहून मुकाट्यानें त्याच्या शेजारीं बसलों. सुमारें पाव तासानें तो म्हणाला—

अरसिकेषु कवित्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख ।

मीं म्हटलें—

'सुरसिकेषु कुकाव्यनिरोदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख ।

वयस्य—खरा रसिक असेल तर माझ्या काव्याला कुकाव्य कधींच




व्हिएन्ना (ऑस्त्रिया) येथील एक कारंजांचा गुच्छ.

म्हणणार नाहीं. त्या काव्यांत विशेषोक्ति, परिकर इत्यादि कठिण कठिण अर्थालंकार असून, रकारांचा प्रास साधल्यामुळें शब्दालंकारांचीही किती बहार झाली आहे.

मी——मग माझ्या अंतऱ्यांत तरी तीच बहार झाली आहे.

वयस्यः——झालेंच म्हटलें तर, 'उ' आणखी 'प' चा दीर्घ उच्चार केल्यानें व्याकरणाची समृद्धि झाली असून विषयनिवृत्तिमुळें भारहारन्यायानें समाधिही सुलभ झाली आहे.

अलंकारशास्त्रानंतर न्याय, व्याकरण, वेदान्त, मीमांसा इत्यादि शास्त्रोपशास्त्रांचें आलोडन वयस्य करणार असा रंग दिसूं लागल्यामुळें मी जागचा उठून, शेजारीं एका यंत्रावर कांहीं कागद लावला असून त्यावर कांहीं नागमोडीसारख्या रेषा होत्या, त्या काय आहेत तें पाहूं चल, असें म्हणून त्याला तिकडे घेऊन गेलों. हवेचें उष्णतामान कोणत्या वेळेस काय होतें हें दाखविणारें तें यंत्र असून त्यावर आठवड्याच्या सुरवातीपासूनचें उष्णतामान दिसत होतें. मोजण्याचें प्रमाण फारेनहाइट नसून सेंटिग्रेड होतें. आठवड्याच्या सुरवातीपासून उष्णतामान वाढलेलें होतें व चालू दिवसाच्या उष्णतामानाची नुकतीच १२ वाजतां परमावधि होऊन गेलेली होती. त्यावेळचें उष्णतामान सेंटिग्रेड ३५ अंश म्हणजे फारेनहाइट ९५ अंश होतें. 'तरीच बरें का,' वयस्य म्हणाला, 'तुषार इतके सुखदायक होत होते. 'तरीच बरें का', मी म्हणालों, 'काव्यस्फूर्ति इतक्या जोरानें झाली!'

दुसरे दिवशीं आह्मी डुसलदार्फ ह्या गांवीं जाऊन आलों. हें गांवही ऱ्हाइन नदीवर असून एक तासाच्या रस्त्यावर आहे व तें नवीन पद्धतीवर बांधलेलें आहे. काइसरचें उन्हाळ्यांतील हवा खाण्याच्या ठिकाणांपैकीं हें एक आहे. आह्मांस वाटलें कीं रस्ते सरळ असतील. परंतु तसें कांहीं नव्हतें. रस्त्यांची रुंदी मात्र पद्धतशीर होती. परंतु रस्ते मधून मधून 'वळणदार' होते.

काइसरच्या वाड्याजवळ नवीन बाग केलेली आहे पण ती अजून बाल्यावस्थेंत होती. नदीच्या प्रवाहाचा जोर कलोनपेक्षां कमी होता असें स्नानाच्या वेळीं आढळून आलें. बझार बरा असून शहर टुमदार होतें. कलोनला परत जाऊन दुसरे दिवशीं सकाळीं नदीमार्गानें फ्रांकफुर्टला निघालों.

## संचार तिसरा

# ऱ्हाइन नदी ( जर्मनी )

कलोनपासून माइन्झ ( Mainz–इंग्रज पद्धतीनें Mayence ) पर्यंतचा प्रवास ऱ्हाइन नदींतील आगबोटींतून करण्याचें आह्मीं ठरविलें. हा प्रवास सुमारें १२-१२॥ तासांचा आहे. माइन्झपासून फ्रांकफुर्तपर्यंतचा थोडा प्रवास आगगाडीनें करावा असें ठरलें. त्याप्रमाणें रविवार ता. १४ जुलई १९१२ रोजीं सकाळीं ८ वाजतां आह्मां बोटीवर येऊन दाखल झालों. बोटीला दोन क्लास होते. आह्मां सेकंड क्लासाचे लोकांसाठीं डेकवर जागा होती. तेथें अशी व्यवस्था होतीः—कठड्याला लागून एक सलग बांक होतें व त्याच्यापुढें मधून मधून टेबलें होतीं व त्यांवर शुभ्र वस्त्राच्छादनें होतीं. त्या टेबलांभोंवतालींही खुर्च्या होत्या. शिवाय मध्यें जागा असे तेथेंहि टेबलें व खुर्च्या मांडलेल्या होत्या. ह्या डेकवर ताडपत्र्यांचें झांकण होतें. परंतु बाजूस पडदे मात्र नसत; त्यामुळें सूर्य तिरपा झाला कीं आंत जरा त्रास होत असे. तथापि वारा सारखा शीतल चालू असल्यामुळें ऊन विशेष भासत नसे. आमच्या बोटीला नांव जर्मन बादशाहिणीचें ठेवलें होतें. वयस्याला अशीं नांवें ठेवण्याची पद्धत पसंत नाहीं. तो म्हणतो ‘ ह्या नांवाच्या योगानें बोटीला मोठेपणा न येतां असल्या क्षुद्र पदार्थांच्या योगानें त्या नांवांना मात्र कमीपणा येतो. उदा-

हरणार्थ, एखाद्या आगबोटीचें नांव गायत्री असावें व तिच्यावर लोक खुशाल गोमांसभक्षण करीत असावेत. चाळीचें नांव ‘ सीता ’ व आंत वेश्यांचीं दुकानें ! दिल्लीदरबारानंतर लवकरच वर्तमानपत्रांतील एका आगबोटीसंबंधानें ‘ दिल्ली बुडत आहे ’ ‘ दिल्ली बुडाली ’ इत्यादि मथळे वाचून माझ्या तर काळजांत धस्स होत असे ! त्यापेक्षां ‘ सुंदर ’ ‘ गोड ’ ‘ सरळ ’ ‘ चपळ ’ ‘ गुलजार ’ अशीं नांवें दिलीं व आंतील माल नांवाच्या उलट जरी असला तरी मनोवृत्तीला धक्का बसत नाहीं. मी ह्मटलें ‘नांव देतांना प्रेमानें व सदिच्छेनें देण्यांत येतें. त्या बाबतींत कांहीं निर्बंध घालणें शक्य नाहीं व इष्टही नाहीं. तुला तो श्लोक माहीत नाहीं काय ?

लक्ष्मी तो गवऱ्या वेचे । भीक मागत धनपाळ ॥
अमरनाथ तो मरगये । भले बिचारे ठण्ठण्पाळ ॥ १ ॥

( सुभाषित वहार )

तेव्हां तुझ्या म्हणण्याप्रमाणें ‘ ठणठणपाळ ’ सारखीं नांवें सगळ्यांना ठेवण्यांत आलीं तर फारच उत्तम !

वयस्य कांहीं उत्तर देणार तों तेथें गर्दी जमूं लागली. उतारूंच्या पोषाखावरून व भाषेवरून ते पुष्कळसे अमेरिकन असावेत असें वाटलें. अमेरिकन लोकांना प्रवास करण्याचा फार नाद. त्यांची तऱ्हा म्हणजे अशी कीं, प्रवास करायचा झाला म्हणजे टामस कुक किंवा अशाच एक कंपनीकडे जायचें. त्यांच्याकडे प्लॅन, पत्रकें वगैरे पुष्कळ पडलेलीं असून ऑफिसांतील लोकही माहिती देण्यास तयार असतात. त्यांच्या मार्फत कांहीं तरी एक कार्यक्रम ठरवून एकदम सबंध तिकिटें घ्यावयाचीं. टामस कुकाकडे बहुतकरून थर्ड क्लास तिकिटें मिळतच नाहींत. सेकंडक्लास तरी निदान घेतलीं पाहिजेत. तशीच हॉटेलांची व्यवस्थाही टामस कुकाकडूनच होते. प्रत्येक प्रवासांतील शहरीं टामस कुकाच्या वशिल्याचीं हॉटेलें आहेत.

ह्या हॉटेलांतही फर्स्टक्लास व सेकंडक्लास असे वर्ग आहेत. ह्या हॉटेलांचींही कुपनें म्हणजे तिकिटें ठामस कुकाकडून आगाऊ पैसे भरून मिळतात. त्यांपैकीं एका हॉटेलांत कुपन दिलें म्हणजे येथें सर्व व्यवस्था होते; वाटल्यास खोलीचीं व प्रत्येक जेवणाचीं कुपनें वेगळींही मिळतात. प्रत्येक मोठ्या ठिकाणीं ठामस कुकाचें दुकान असतें. तेथून सीझनमध्यें ( म्हणजे प्रवासाच्या ऋतूंत) बहुतेक रोज एक्स्कर्शन्स निघतात. सकाळीं व तिसऱ्याप्रहरीं मोटारगाड्या आसपासच्या किंवा शहरांतल्या प्रसिद्ध अशा ठराविक ठिकाणीं जाण्यासाठीं सज्ज असतात व त्यांच्याबरोबर एक दाखवडा असतो. तो सर्व स्थळें दाखवून आणतो. हीं एक्स्कर्शन्स इच्छेप्रमाणें व आपल्या सवडीप्रमाणें घ्यावीं. प्रश्न काय तो तत्त्वमसीचा आहे. छदाम मोजायला तयार असाल तर सर्व कांहीं सोयी उत्तम प्रकारें होतात. आम्हां गरीबांना अर्थात् हें कांहीं शक्य नव्हतें. वयस्य म्हणाला ‘ ह्यांच्याप्रमाणें आपणांस मिजासी रीतीनें जातां आलें असतें तर फार बरें झालें असतें. ’

मीः—अशा रीतीनें प्रवास करणें चांगलें म्हणतोस ?

वयस्यः—अलबत ! कां नाहीं ? हॉटेल शोधा, जेवणाची व्यवस्था करा, गाइडबुक वाचा, आणखी करपल्लवीवर काम भागवा; नाहीं तर लँग्वेजेस–गाइडमधील आपणास हवें तें वाक्य इंग्रजींत शोधून त्याचें भाषांतर लोकांस दाखवीत बसा, ही दगदग तरी वांचेल !

मीः—ह्या दगदगीमुळें कधीं कधीं प्रवासांत अडचण पडते खरी, पण प्रवासाचा हेतु काय ?

वयस्यः—करमणूक, चैन.

मीः—करमणूक, चैन घरीं बसल्यानेंही होते. फर्स्टक्लासप्रवास तरी चैनींत थोडाबहुत व्यत्यय आल्याखेरीज होत नाहीं. तूं काय केवळ चैनी-करतां प्रवास करतो आहेस ?

वयस्यः—नाहीं, ज्ञानसंपन्न व्हावें हा हेतु.

मीः—ज्ञानसंपन्न हा मोघम शब्द आहे. ज्ञान कोणतें ?

वयस्यः—रस्ते, इमारती वगैरे स्थलवैचित्र्य, देशाचार इत्यादि.

मीः—रस्ते–इमारतींच्या ज्ञानानें तुझा काय मोठा फायदा होणार आहे तो दिसतोच आहे. आपण का इंजिनिअर म्हणून हिंडतों आहों ? एक हेतु म्हणजे देश, वेष, आचार, लोकस्थिति वगैरेंची माहिती मिळावी हा तर खरा. पण मुख्य हेतु मी समजतों तो हा कीं, त्यानें आत्मविश्वास उत्पन्न होतो, कष्ट, दगदग वगैरेंची कार्यसिद्धीचे प्रसंगीं विशेष पर्वा न करण्याची संवय होते व एकंदरींत भावी संकटांबद्दल बाऊ वाटेनासा होतो. तुला कसें वाटतें ?

वयस्यः—तुझें म्हणणें खरें आहे. म्हटलेंच आहे

“ केल्यानें देशाटन पंडितमैत्री सभेंत संचार ।
शास्त्रग्रंथविलोकन, मनुजा चातुर्य येतसे फार ॥ १ ॥ ”

मेजर टी. कँडी.

‘ शास्त्रग्रंथविलोकन ’ जारीनें चाललेंच आहे, ‘ सभेंत संचार ’ देशकालवर्तमानाप्रमाणें होतच आहे, ‘ पंडितमैत्री ’ संबंधानें तर कॉलेजमध्यें जो जो भेटतो तो पंडितच असतो. आतां उरलें ‘ देशाटन ’ ! एवढ्यावर आजपर्यंत चातुर्य अडून राहिलें होतें. एवढा प्रवास संपला कीं—’

मीः—चातुर्य पूर येऊन वाहून जाईल; कारण तें सामावायला जागा तर हवी !

वयस्यः—वाहून जाण्यावरून आठवण झाली ! कायरे सुहृदा, ‘ कोलनवाटर ’ म्हणून म्हणतात तें गांव आपण आतां सोडलें हेंच का ?

मीः—गाइडबुकांत लिहिलें आहे खरें कीं हेंच तें गांव म्हणून.

वयस्यः—पण कोठें वास आला नाहीं कीं कांहीं कळलेंही नाहीं !

मीः—कळायचें कसें ? तुझ्या मतानें का कलोनमधल्या सर्व पण्याला वास यावा कीं काय ? मग अजून आपण कलोनच्या हद्दींत आहोंत. या बोटीखालीं जें पाणी तें सगळें कोलनवाटरच ! असेल एखादी रिकामी बाटली तर घे भरून, पाहतोस काय ! अगदीं वाहून जाईपर्यंत भरून घे !

वयस्यः—नाहींरे सुहृदा ! मजजवळ बाटलीच नाहीं. काय करूं !

हें बोलणें होतें आहे तों सर्व लोक नदीच्या कडेला एका ठिकाणीं पाहूं लागले. आमचेही चक्षू तिकडे लागले; तों पुष्कळ लोक स्नान करीत आहेत असें दिसलें. त्यांपैकीं बहुतेकांनीं फक्त चड्डी घातली होती. पलीकडच्या बाजूस बायका स्नान करीत होत्या. त्यांचाही स्नानाचा पोषाख—एकच वस्त्र—मांड्यांपासून गळ्यापर्यंत आणि दंडापासून हात खुले असा होता. कलोनला नदीचें पात्र जितकें रुंद होतें तितकें पुढें राहिलें नाहीं. किंचित् कमी झालें. कांठावर थोड्या थोड्या अंतरावर गांवें होतीं. प्रथम कांहीं वेळ नदीचे कांठीं साधारणपणें सपाट जमिनी दिसत होत्या. कांहीं कांहीं गांवांत मधून मधून किल्ल्यासारखीं घरें आहेत. बहुतेक गांवीं प्रवाशांसाठीं हॉटेल असतें व त्याची जाहिरात नदींतील लोकांस दिसावी अशा बेतानें ठळक अक्षरांनीं लावलेली असते.

जेवणाची सोय तेथेंच बोटीवर. "स्नानाची सोयही येथेंच असेल" वयस्य म्हणाला. बोटीवर स्नानाची जागा आहे का म्हणून वेटरला विचारलें तर तो नाहीं म्हणाला. त्यामुळें प्रत्यक्ष पाण्यांतून जात असतांही आम्हीं कोरडेच राहिलों !

तीरावरील वृक्षराजीवरून येत असलेला थंड वारा व वरील छतापलीकडून तापत असलेला चंडकिरण ह्यांच्या मिलाफानें जिवाला आनंद वाटत होता; तरी दुपारची बारा वाजायची वेळ झाल्याबरोबर जीव कासावीस झाला. नेहमीं-

प्रमाणें एक वाजतां जेवण घेऊं असा आमचा बेत होता, पण तो लटपटला. शेवटीं वेटरला बोलावून जेवण तर मागविलें. जेवण चालू असतांना वयस्य म्हणाला 'अरे सुहृदा ! ती पाहिलीस सौभाग्यकांक्षिणी तरुणी ! अगदीं बालगंधर्वांप्रमाणें दिसत आहे.'

मी म्हटलें, "कांहीं साम्य दिसत आहे खरें. मग तिला जाऊन विचार, शारदा नाटक कां करीत नाहींस म्हणून !"

वयस्यः—नाहीं करणार कशावरून ? अरे, हिला तर कांचनभट सुद्धां नको, आपण होऊन लेडी भुजंगनाथ व्हायला कमी करायची नाहीं ! एखादा कोदंड मध्यें आला तर त्याला म्हणेल 'माइंड युअर ओन बिझिनेस आम्ही सगोत्र असलों तर तुझ्या बापाचें काय जातें ?'

हळूहळू वयस्यावर निद्रादेवीचा अम्मल चढूं लागला. पण झोंप घ्यावी कशी ? तो बसल्याबसल्याच झोंप घेऊं लागला. त्या वेळीं त्याच्याकडे पहाण्याची मोठी मजा होती. समुद्राकिनाऱ्यावर ज्याप्रमाणें लाट हळूहळू येऊन किनाऱ्याजवळ मोठी होते व एकदम आपटून फुटते, त्याप्रमाणें त्याचें डोकें हळूहळू खालीं येई व मग एकदम हिसका घेऊन वर जाई त्यावेळीं डोळे उघडून वयस्य सभोंवार पाही. कोणी पहात नाहीं असें वाटलें म्हणजे दुसरी लाट येई. अशा रीतीनें कुंभकर्णप्रिया कुंभसुतरिपूची लीला त्याच्याकडून करवीत होती. क्षणभर ही मजा पाहिल्यावर मला असें आढळून आलें कीं, इतरही त्या मजेंत सामील होत आहेत ! तिकिट लावल्याशिवाय फुकट ह्या सोकाजींन्ना मजा कां दाखवा असा पोक्त विचार करून वयस्याला हलकेंच जागा केला व पलीकडे मोकळी जागा होती तेथें खांबाशीं खुर्ची ठेऊन डोकें टेंकून निजावयास सांगितलें. इतर कित्येकांची हीच मजा मला पाहण्यास सांपडली. पण लवकरच माझें दुसरीकडे लक्ष गेलें.

बोटीचा वेग कमी झाला व बोट थोड्या वेळांत थांबली. ह्या ठिकाणीं बॉन स्टेशन आलें. बॉन हें मोठें व्यापारी शहर आहे व तेथें एक

युनिव्हर्सिटीही आहे. आगबोट स्टेशनवर फार थोडा वेळ थांबते, त्यामुळें उतरणाऱ्या उतारूंची उतरण्यासाठीं मोठी लगबग असते.उतरणारे व नवीन येणारे उतारू आमचे पुढून जातांना कित्येक गमती पहाण्यास मिळाल्या. त्यांत ज्या स्त्रिया असतात त्यांच्यांत तर नाना तऱ्हा असतात. आधीं पोषाखांत वैचित्र्य फार असतें व त्याशिवाय त्यांच्या वर्तनांतही खुबी असते. प्रौढ व विस्तृत स्त्रिया असतात त्या आपल्या गंभीरपणानें तोल संभाळून चाललेल्या असतात. मध्यम वयाच्या स्त्रियांपैकीं ज्यांना मुलें असतात त्यांना वारंवार मुलांना प्रेमळ हुकूम सोडण्याची मोठी हौस असते. मुलें नसल्यास बरोबरच्या कोणा शिष्ट पुरुषाशीं त्या उथळचातुर्यदर्शक संभाषण करीत असतात. परंतु सर्वांत गम्मत म्हणजे नवयौवनप्रवेशानें तेजस्वी दिसणाऱ्या युवतींच्या लीलांची होय. नवमंजरीसंपन्न आम्रवृक्षाची ज्याप्रमाणें वारा आला असतांना मनोहर गडबड उडते, त्याप्रमाणें या तरुणींची गडबड उडून राहिली होती. त्यांचे ते चंचल नेत्र, आपल्या पारिधानांत कोठें बिघाड झाला कीं काय म्हणून पहातांना वारंवार अंगयष्टीची होणारी वक्रता, भाषणप्रसंगीं विशेष परिश्रम घेऊन मुद्दाम काढलेला कोकिलास्वर, किंचित् कारण झालें असतां स्वच्छंद दिसणारें—पण खरोखर बुद्धया केलेलें—तरंगमय मुक्तहास्य, आपल्या मोहक तनूकडे चोरून लक्ष ठेवून दुसऱ्या कोणाचें तिकडे लक्ष जात आहे कीं काय ह्याकडे असलेली बारीक नजर, इत्यादि विलास व्यक्तिभेदाप्रमाणें कमी जास्त प्रमाणानें दृग्गोचर होऊन चित्तास रमवीत होते.

येणाऱ्या जाणाऱ्या उतारूंची गडबड संपल्यावर पुनः बोट सुरू झाली. कांहीं काळानें किनाऱ्यावर जो सपाट प्रदेश होता तो जाऊन आतां टेकड्या दिसावयास लागल्या. ह्या किनाऱ्यास लागून असत किंवा कुत्रचित् थोड्या अंतरावर असत. ह्या टेकड्यांत मध्यावरच किंवा माथ्यावर ठिकठिकाणीं जुन्या तऱ्हेचे किल्ले दिसत होते. धारातीर्थें रद्द होऊन स्फोटगुलिकातीर्थें

स्थापन होण्यापूर्वीचा ह्या प्रदेशाचा इतिहास ज्यानें वाचला असेल त्याला हे किल्ले पहाण्याचें मोठें कुतूहल वाटेल. हे किल्ले पाहून माझ्या मनांत पुढीलप्रमाणें विचारवीचि उद्भवली. “ तरवारीच्या जोरावर ज्या वेळीं राज्यें संपादन केलीं जात त्या वेळीं हा मुलूख अनेक लहान मोठ्या भूपतींच्या स्वाधीन होता व हे किल्ले त्या वेळीं वीर, रौद्र, अद्भुत इत्यादि रसांच्या कथांनीं वेष्टित असत. ‘ सर्वे यस्य वशादगात् स्मृतिपथं कालाय तस्मै नमः ’ असे विचार येथें मनांत आल्यावांचून रहात नाहींत. त्या वेळच्या कालावधीला आतांचे लोक मिड्ल एजेस ( मध्ययुग ) म्हणतात. आतांच्या काळाला १०००, १५०० वर्षांनंतरचे लोक काय ह्मणतील ? मला वाटतें हा काल सुद्धां मिड्ल एजेसमध्येंच जाईल. कारण प्राणघातक शस्त्रांची भयंकर वाढ ह्याखेरीज ह्यांत विशेष काय फरक आहे ? एका देशाच्या लोकांनीं आपल्याहून अगदीं भिन्न संस्कृति असलेल्या दुसऱ्या लोकांवर तरवारीच्या ( तोफांच्या म्हणा ) जोरावर स्वारी करण्याची कल्पना जोंपर्यंत नष्ट झाली नाहीं तोंपर्यंत ऱ्हाइन नदीकांठच्या किल्ल्यांतील एखादा बलाढ्य व शेजारच्या किल्ल्यावर नजर ठेवणारा सरदार व हल्लींचें एखादें मोठें राष्ट्र ह्यांत तत्त्वाचा फरक नसून फक्त प्रमाणाचा फरक आहे. आज ज्याप्रमाणें मानवी व्यक्तिस्वातंत्र्याची कल्पना वाढली असतां पूर्वींचे लोक अडाणी भासतात, त्याप्रमाणें समानसंस्कृति-घटित समाजरूपी व्यक्तीचे स्वातंत्र्याची कल्पना परिपक्व झाली असतां हल्लींचा काळ भविष्यत्कालीन लोकांना रानटीपणाचा—”

धडाड धप्प ! पलीकडे एकदम मोठा आवाज होऊन माझी विचार-लहरी फुटून जिरून गेली. पहातों तों वयस्याची पाठ तक्तपोशीवर असून उताणा पिंगूळ ज्याप्रमाणें आपले पाय हालवीत असतो त्याप्रमाणें वयस्य आपले हातपाय हालवीत आहे ! इतक्यांत तो उठून उभा राहिला. चौकशी करतां अशी हकीकत कळली कीं, एक लावण्यलतिका वयस्याच्या शेजारून जात

असतांना डोंगरावरील किल्ल्याकडे मान वर करून पहात होती. तिच्या डोक्यावर एक भलें मोठें शिरोभूषण होतें, व हातांत एक कुत्रें होतें. तितक्यांत तिकडून आलें वारें; त्यानें बाईच्या शिरोभूषणांतील फूल पडलें कुत्र्याच्या अंगावर, आणि कुत्रें पडलें वयस्याच्या अंगावर, आणि वयस्य पडला जमिनीवर, आणि खुर्ची पडली वयस्याच्या छातीवर! बाई ओरडूं लागली, कुत्रें भोकूं लागलें; वयस्य शिव्या देऊं लागला; बाजूचे लोक स्मितूं लागले; आणि ज्या वाऱ्यानें एवढा अनर्थ केला तें डोंगराच्या दरींत शिरून विकट हास्य करूं लागलें! एकंदरींत जर्मनीचें वारें मोठें वाईट, असा वयस्यानें सिद्धांत काढला; कारण ती बाई त्याच्या वाऱ्याला उभी राहिली म्हणून एवढा अनर्थ झाला! सगळी समजूत पडल्यावर मग त्या चकितहरिणीप्रेक्षणाबाईनें झालेल्या गोष्टीबद्दल आपला शोक प्रदर्शित केला व वयस्याच्या देहाच्या शाबुदीविषयीं ती तन्वी गौरा आस्थापूर्वक प्रश्न विचारती झाली. वयस्यानेंही तोंडाला शक्य तितक्या सुरकुत्या पाडून, झालेल्या प्रकारानें आपल्याला यत्किंचितही तसदी न पडल्याचें सांगितलें व तिचे भरपूर आभार मानले.

वयस्याच्या झोंपेचा जो कांहीं अंश शिल्लक राहिला होता तो चहानें पार घालविल्यावर मग आम्ही आजूबाजूच्या देखाव्याकडे नजर दिली. नदीच्या दोन्ही बाजूंस आतां डोंगर असून त्या डोंगरांवरून शेतें दिसत होतीं. जवळ जवळ अर्धा काटकोनाइतक्या किंवा क्वचित् जास्त निमुळत्या डोंगरांवर हीं शेतें लावलीं कशीं व यांपासून उत्पन्न काय होत असेल असा आम्ही विचार करीत होतों. इतक्यांत शेजारचा एक युवक आपल्या वल्लभेला सांगत होता कीं, हीं व्हाइनचीं म्हणजे द्राक्षाचीं शेतें आहेत, तें वयस्यानें ऐकिलें. त्यावरून तो म्हणाला, "सर्व प्रकारच्या जमिनींपासून शक्य तितका फायदा काढण्याचे कामांत शार्मण्य लोक कसे कुशल आहेत, हें पाहून घे." नदीच्या कांठाकडे पाहिलें तरी एखादा कालवा ज्याप्रमाणें बांधून काढावा त्याप्रमाणें पुष्कळ भाग बांधून काढलेला दिसत होता.

काब्लेंझ मुक्कामानंतर बोपार्ड मुक्कामापाशीं नदीला एक मोठी नाग-मोड आहे. तेथील देखावा फारच मनोहर दिसत होता. पर्वतक–वेष्टित एखादें सरोवर असावें त्याप्रमाणें तो देखावा दिसत होता. हा देखावा ज्या वेळेस संपला त्या वेळेस वयस्याला फार वाईट वाटलें. तो म्हणाला, "सुहृदा! हा देखावा पहात असतांना मला असें वाटलें कीं, मी कालिदास किंवा भवभूति नसल्यामुळें मराठी भाषेचें केवढें नुकसान झालें आहे!" मी म्हटलें, "कवीच्या अभावामुळें हा देखावा जसा वायां जात आहे तसे हिंदुस्थानांत काय थोडे देखावे वायां जात आहेत? अशा तऱ्हेचीं सृष्टिसौंदर्योत्कर्षयुक्त निसर्गरमणीय स्थळें नर्मदातीरीं, गोदावरी, कृष्णा इत्यादि नदीतटाकीं पुष्कळ आहेत आणि थोडी फार प्रतिभा असलेले कवि ब्रह्मदेवाच्या इच्छेनुसार त्यांचें चीजही करीत आहेत. पण त्यांना महाराष्ट्र वाचकवर्गाकडून पुरेसें उत्तेजनच मिळत नाहीं." वयस्य म्हणाला, "आपल्यांत जे चांगले कवि आहेत त्यांना वाचक चाहतातच. उज्ज्वल प्रतिभा ज्याजवळ आहे तो नाकझरी-कडून ऱ्हाइन नदीचें कार्य करून घेईल." मीं म्हटलें, "नुसतें तोंडानें चाहून काय उपयोगी, खिशानें चाहिलें पाहिजेना? कवि कल्पनामय असला तरी त्याचें पोट सत्य असतें."

वयस्याला उमाळा आला होता तो उतरल्यावर तो खिन्न मुद्रेनें इकडे तिकडे पहात राहिला. मीं त्याला म्हटलें, "वयस्या, काव्यस्फूर्ति जिरली वाटतें? कालिदासाप्रमाणें वर्णन करतां येत नसलें म्हणून आस्वाद घ्यायला काय हरकत आहे?"

वयस्यः—( झणकाऱ्यानें ) धोबीतलाव वाढवून त्याचें तळें झालें तर असेंच दिसेल. मला यांत विशेष कांहीं दिसत नाहीं.

मीः—तळें झालें तर! पण झालेलें कोठें दिसत नाहीं इतकेंच. साधी तळ्याची शोभा आहेच; पण ही विशेष नाहीं काय?

वयस्यः—हो ! थालिपिठापेक्षां कडबोळ्यांतही कांहीं विशेष असतें.

मीः—मग तुला आणखी येथें काय पाहिजे ?

वयस्यः—मला येथें रंगीत फुलें दिसत नाहींत किंवा पक्ष्यांचे मधुर आलापही ऐकूं येत नाहींत. त्यामुळें केशरवेलदोड्यांशिवाय नुसत्या लाडू-प्रमाणें हें भासत आहे.

मीः—तुझें म्हणणें एका अर्थीं खरें आहे. भवभूतीनें वर्णन केल्याप्रमाणें

कूजत्क्लान्तकपोतकुक्कुटकुलाः कूले कुलायद्रुमाः ।
............स्वकुसुमैरर्चन्ति गोदावरीम् ॥

असें येथें दिसत नाहीं हें खरें आहे. ह्या तुझ्या शब्दांवरून तुला कांहीं थोडी काव्याभिरुचि आहे असें दिसून येतें.

वयस्य ( उत्सुकतेनें ):—मग सुहृदा ! मी कविता करूं ?

मीः—जरा थांब ! सगळी नदी पाहून झाल्यावर एकदमच कविता कर म्हणजे झालें.

शेजारची तरुणी तिच्या वल्लभास म्हणाली, ‘ माय लव्ह ! ’ वल्लभ म्हणाला ‘ यस, माय एंजल. ’

वयस्य मला म्हणाला, ‘ मी आतां कविता करतोंच. ’

बंगालच्या फाळणीप्रमाणें वयस्याचा निर्धार वज्रलेप झालेला पाहून मी रामनामाचा जप करीत बसलों ! परमेश्वराला दया आली. शेजारच्या तरुण जोडप्यांत भांडण जुंपलें. पत्नी पतीला म्हणाली, ‘ यू आर आ पिग. ’ पति पत्नीला म्हणाला, ‘ यू आर ॲन ॲस ! ’ वयस्याची स्फूर्ति मावळली व कविता डोक्यांतच जिरली.

सूर्यकिरण तापरहित होण्याचे समयास बोट ‘ बिंगेन ’ ला आली. हें नांव पाहून मला Bingen on the Rhine ह्या क्रमिक पुस्तकांत वाच-

लेल्या कवितेची आठवण झाली व ' फेअर बिंगेन ' ह्या शब्दांची सार्थता मला आतां भासली. ह्या ठिकाणचा देखावा अगदीं निराळा होता. येथें टेंकड्या वगैरे नसून येथून नदीचें पात्र पुष्कळ रुंद झालें असल्यामुळें एखाद्या सरोवराप्रमाणें दिसतें. खुद्द बिंगेन गांव एका उंचवट्याचे उतारावर असल्या-मुळें बोटींतूनही देखावा छान दिसतो. विशेषतः हा समय सूर्य अस्तास जाण्याचा असल्यामुळें देखाव्याला फारच रमणीयता आली होती. कांठावर कडुलिंबाच्या झाडांप्रमाणें झाडांची राई असून पात्राच्या मधून मधून बेटें असत त्यांवरही झुडपें होतीं. पात्र विस्तीर्ण झाल्यामुळें नदीचा वेग अगदीं थोडा होता व पाण्याचा पृष्ठभाग गुळगुळीत दिसत होता. सूर्य पश्चिमेस मावळत होता त्या वेळीं तो तप्त कांचनाच्या गोळ्याप्रमाणें दिसत असून पूर्वेकडे जाणाऱ्या आमच्या आगबोटीच्या गतीनें तरंगित झालेल्या पाण्यावर त्याचें प्रतिबिंब विकीर्ण व विशीर्ण झालें होतें. त्यामुळें ( लग्नसमारंभांतील ) सोनेरी नक्षत्रमाळाच जणुं काय पाण्यावर पसरल्या आहेत असा भास होत होता; किंवा जणूं काय एखादा भरदार मोतिया नळा कोणी पाण्याच्या पृष्ठ-भागावर सोडला आहे कीं काय असें वाटत होतें.

बिंगेन सोडल्यानंतर बराच अंधेर पडूं लागला. तरी जेव्हां आम्ही माइंझ येथें ९। वाजतां पोंचलों, त्यावेळीं थोडा उजेड होता. जेथें माइन नदी व्हाइनला येऊन मिळते, तेथें संगमावर माइंझ ( मेएन्स ) हें शहर आहे. संधिप्रकाशांत नदीकांठच्या वृक्षावलींची एक प्रकारची मौज दिसते. बोटी-वरील जेवणाचें बिल चुकतें करून आम्ही उतरलों. येथून ' फ्रांकफुर्त आ माइन ' ( फ्रॅंकफर्ट ऑन दि मेन ) १। तासाच्या रस्त्यावर आहे.

———

## संचार चवथा

# फ्रांकफुर्ट-आ-माइन

Frankfurt-a-Main

ऱ्हाइन-माइन संगमावर माइंझ शहरीं रात्रीं ९। वाजतां आम्ही उतरलों. तेथें मुक्काम करण्याचा इरादा नसल्याकारणानें १० ला निघणारी गाडी ११। वाजतां फ्रांकफुर्टला जाते त्या गाडीनें जाण्याचें ठरविलें. पण बोटीच्या धक्क्यापासून रेल्वे स्टेशन जवळ आहे कीं लांब आहे हें कोणास ठाऊक ? एक दोघांस 'बानहोफ्' विचारलें पण त्यांना समजेना ! बानहोफ म्हणजे स्टेशन, पण आम्हांला उच्चार नीट करतां येईना म्हणा किंवा कोणचें स्टेशन हें सांगतां येईना म्हणा, आम्हांला कोणी सांगू शकलें नांहीं; एकानें पोलीसकडे बोट दाखविलें. त्याला थोडें इंग्रजी येत होतें. त्यानें ट्राममध्यें बसण्यास सांगितलें, त्याप्रमाणें ट्राममध्यें बसून १० मिनिटांत स्टेशन तर गांठलें. गाडींत बसलों त्यावेळीं आम्हांला एक रिकामा कंपाट ( 'कंपार्टमेंट' 'ट्रामवे' असले बोजड शब्द न घालतां ' कंपाट ' ' टामरेळ ' असे शब्द प्रचारांत आणण्याची सुधारणा आपल्या समाजांत आणणें फार जरूरीचें आहे, असें वयस्याचें मत आहे ) सांपडला तेथें बसलों. गाडी सुरू होतां होतां एक गरीव पण भरीव बाई आंत शिरली. तिनें बहुतेक सामान रॅकवर टाकून ती बांकावर बसणार तों आमच्याकडे तिची नजर गेली. आम्हांला पाहिल्याबरोबर ती एकदम थबकली. वयस्यानें पुढील हकीकतीचें असें वर्णन केलें.

आर्या

बुजली, थिजली, खिजली, जाण्या सजली परी न ती धजली ।

येथें वयस्याच्या कवित्वाचा ओघ थांबला. मी सुचविलें कीं ' भिजली ' ' भाजली ' 'शिजली' ' सुजली ' ' माजली ' इत्यादि बरींच

क्रियापदें अजून मराठी भाषेंत राहिलीं आहेत. वयस्य म्हणाला 'क्रियापदें आहेत, पण 'बिजली' हें नाम सुद्धां राहिलें आहे!' बाई हातांत एक गांठोडें घेऊन उभी राहिली असल्यामुळें वयस्याला वाटलें कीं तिला तें वर ठेवितां येत नाहीं. तेव्हां वयस्य तिला खुणेनें म्हणूं लागला कीं तुला मदत करूं काय? वयस्याच्या मदतीची जरूर पडली नाहीं; पण मग त्या बाईला मात्र विश्वास आला कीं हे अगदींच कोणी हाटेंटाट किंवा बुशमेन नाहींत!

आम्ही रात्रीं साडे अकरा वाजतां फ्रांकफुर्टला पोंचलों. फ्रांकफुर्ट फार मोठें शहर असल्यामुळें रहदारी पुष्कळ चालू होती. मजजवळ एका वनस्पत्या-हारी भोजनवसतिगृहाचा पत्ता होता. तो रस्त्यावरील टामरेळीच्या मुका-दमास दाखविला व त्यानें दाखविलेल्या टामरेळीमध्यें बसलों. टामरेळींत बरेंचसें काम नेहमींप्रमाणें करपल्लवीवर चाललें होतें. तें पाहून शेजारचा एक मनुष्य इंग्रजींत बोलूं लागला. आम्हांला कोठें जावयाचें वगैरे त्यानें ऐकिलेंच होतें. तो म्हणाला मला तिकडेच दुसऱ्या एका हॉटेलमधें जावयाचें आहे. त्याच गाडींत गरीब वर्गापैकीं एक नवराबायको बसलीं होतीं. उतर-ण्याचें ठिकाण आलें तेव्हां आम्ही पांचीजण उतरलों. वयस्याला शंका आली कीं ह्या लोकांची आपल्यावर नजर दिसते आहे, हे पोलिस डिटेक्टिव तर नाहींत ना? नाहींतर कोणी लबाड लोक असतील! पण करतां कसें, दुसरा इला-जच नाहीं. तो जर्मन म्हणाला 'आज येथें फार मोठी मिरवणूक निघाली होती. ही धार्मिक मिरवणूक पांच वर्षांनीं एकदां निघते व एकाच गांवीं होते असेंही नाहीं. फ्रांकफुर्टला आज २५ वर्षांनीं ही आली आहे व जगांतील सर्व ठिकाणांहून लोक आले आहेत. शहरांत फार गर्दी असल्यामुळें जागा मिळण्याची पंचाईत पडेल.' आम्हीं ज्या ठिकाणीं उतरण्याचें ठरविलें होतें त्या ठिकाणीं रहाण्यास रिकामी जागा नव्हती; म्हणून मग तो जर्मन जेथें उतरणार

होता त्या हॉटेलकडे सर्व गेलों पण तेथेंही जागा नव्हती. रात्रीं बारा वाजलेले व निजायला जागा नाहीं ! तरी वयस्याला मुख्य हुरहुर लागली ती ही कीं, आपण सकाळीं आलों असतों तर मिरवणूक पहाण्यास मिळाली असती. तीं गरीब नवराबायको आमचे बरोबर होतींच, त्यांनीं आणखी दोन तीन हॉटेलें दाखविलीं पण कोठेंही जागा नाहीं ! मग तें जोडपें म्हणालें 'आमच्या घरींच तुमची सोय करतों.' वयस्य मला म्हणाला 'संभाळरे बाबा ! हे नेतील कोठें तरी. आणखी तेथून सकाळीं बाहेर पडलों नाहीं तर कोण चौकशी करणार आहे ! त्यापेक्षां आपले पोलिसाच्या खांद्यावर मान टाकून निजूं या ! ह्मटलेंच आहेः--

तुका ह्मणे माझी जमीन ही शय्या ।
पोलीस हा भय्या द्वारपाळ ॥

मी ह्मटलें 'हा अभंग कोणच्या गाथ्यांत आहे ?' वयस्य म्हणाला 'हा अभंग अजून प्रसिद्ध झाला नाहीं; कारण आमच्या शेतावरच्या तुक्या रामोशानें हा अभंग केला. पण तो तुक्या अजून तुरुंगांतून बाहेर पडला नाहीं; त्यामुळें प्रुफें तपासण्याकरितां छापखानेवाले खोळंबून राहिले आहेत !'

त्या जोडप्याचें घर साधारण बऱ्या वस्तींत होतें व बाह्य स्वरूपही बरें होतें, त्यामुळें आह्मी सर्वजण तेथें शिरलों. निजावयाची खोली साधारण सुखवस्तु होती. दोन पलंग शेजारीं शेजारीं लागून व एक कोच होतें. वयस्य व जर्मन पलंगावर निजले, मी कोचावर निजलों. निजावयास जाण्यापूर्वी वयस्य म्हणतो, 'इंग्रजींत अशी एक ह्मण आहे कीं, Calamity makes strange bedfellows (संकटावस्था कोणा कोणाला एकशय्याविभागी करते हें आश्चर्य आहे) ती ह्मण आज शब्दशः प्रत्ययाला आली.' वयस्याजवळ रात्रीचा पोषाख चांगला नव्हता त्याची आतां लाज वाटूं लागली. पण तितक्यांत असा प्रकार झाला कीं, जर्मननें आपला रात्रीचा सदरा काढला तो निघाला बायकोचा ! 'अर्रर्र !' तो म्हणाला, 'माझ्या बहिणीनें माझी पडशी भरतांना

चूक केली!' असें म्हणून जाकीट व कॉलरशिवाय दिवसाच्याच पोषाखांत तो निजला. वयस्यही डोळे, तोंड, कान, नाक सर्व गरगरित वाटोळे करून म्हणाला ' ओ ! माझी विजार कलोनला राहिली वाटतें ! आतां उद्यां नवीन विकत घेतली पाहिजे ! ' असें म्हणून त्यानेंही जर्मनचें अनुकरण केलें !

प्रातरुत्थाय त्या जोडप्याचे येथें न्याहारी करितेवेळीं त्या जर्मनपाशीं प्रश्न काढला कीं ह्या जोडप्याला दिडक्या काय द्यायच्या ! त्यानें शार्मण्य भाषेत त्यांच्याशीं त्रांगत्रुंग बोलून आम्हांला जी रक्कम सांगितली ती आम्हांला नेहमीं हॉटेलमध्यें पडे त्याहूनही कमी होती ! अशा रीतीनें वयस्याची भीति निरसन झाल्यावर आह्मी त्या तिघांचा निरोप घेतला व थेट स्टेशनवर जाऊन पडशा क्लोक-रूममधें टाकून शहर पाहाण्यास निघालों. फ्रांकफुर्ट हें माइन नदीवर आहे. आगगाडींतून माइन नदी अगदीं लहान दिसल्यामुळें व विशेष वेळही नस-ल्यामुळें गांवांतच स्नान केलें. प्रथम शहरच्या बाजार पेठेकडे वळलों. थोडेंबहुत अनिश्चित अवलोकन झाल्यावर प्रसिद्ध जर्मन कवि गएठ ( Goethe ) ह्याचा पुतळा पहाण्यास गेलों. सदरहू कवीला कालिदासाविषयीं फार आदर होता हें पुष्कळ वाचकांस माहीत आहेच. ह्या पुतळ्याचा आकार कांहीं विशेष मोठा नव्हता. वयस्य म्हणाला, ' मुंबईस चर्चगेटपाशीं कावळ्यांची पायधुणी बनून राहिलेल्या पुतळ्यांपेक्षां हा मोठा दिसत नाहीं. ' तथापि भर-वस्तींत ह्या पुतळ्यासाठीं एक वेगळी जागा तोडून दिली आहे, ह्यावरून त्याच्याविषयींचा आदरभाव व्यक्त होतो.

तेथून पुढें आम्ही रुइमेर ( Roimer ) म्हणजे टाउनहॉलप्रमाणें एक इमारत आहे ती पाहण्यास गेलों. बाहेरून दिसण्यास ही इमारत बोजड व जुनाट दिसते. आम्ही गेलों ती वेळ फुकट प्रवेशाची होती. एक दाखवडा दर अर्ध्या-पाव-तासांनीं जमलेल्या प्रेक्षकांस घेऊन वर नेत असे. वर गेल्यानंतर दोनचार दालनांतील चित्रें वगैरे पाहिल्यानंतर एक मोठें दालन

आलें. त्या दालनाच्या बाहेर जाडी जाडी लोंकरी सपाता पुष्कळ पडल्या होत्या. वयस्य म्हणाला 'हे कोणा जुन्या काळच्या लोकांचे जोडे असावे.' आह्मी आंत गेलों तेव्हां आमचे पायांकडे पाहून एकदोन इसम कुजबुजण्यास लागले. आह्मांस वाटलें, हे कोणी असभ्य लोक असले पाहिजेत ! पण थोडेच वेळांत एका माणसानें आह्मांस सुचविलें कीं सर्व लोकांनीं सपाता घातल्या आहेत तशा घालून या. तेव्हां आह्मी बाहेर जाऊन सपाता घालून आलों. त्या घालून चालणें कठीण होतें परंतु सर्व लोक पावलें घसरत टाकीत होते. वयस्य म्हणाला 'मला वाटलेंच कीं हे लोक असे घसरल्यासारखे कां चालत आहेत ! पण म्हटलें परमेश्वरानें ह्यांच्या पायांत कांहीं खोड ठेवली असेल !'

एका मोठ्या दालनांत भिंतीवर मनुष्यापेक्षां जरा लहान आकाराचीं एकाला लागून एक पुष्कळशीं चित्रें काढलेलीं होतीं. तीं ह्या प्रांतांतील अनेक काउंट, ड्यूक, प्रिन्सेस, वगैरे ऐतिहासिक योध्यांचीं होतीं. त्यांचे पोषाख पाहाण्यासारखे होते. बऱ्याच इसमांच्या अंगावर चिलखतें होतीं त्यांचीही तऱ्हा वेगळी वेगळी होती. येथील बरींचशीं चित्रें छतावर काढलेलीं होतीं. त्यांचें वर्णन दाखवडा स्वभाषेंत देत असे पण तें आह्मांस समजत नसे. ह्या दालनांतून आह्मी चाललों असतां वयस्य हलकेच मला म्हणतो " तीं पाहिलींस का नाटकांतील पात्रें पोषाख न बदलतां तशीच आलीं आहेत. " मी पाहिलें तों ' स्पीक सीफ ' च्या साबणावर जशीं चित्रें असत त्याप्रमाणें एकाच नागमोडी बंदानें आवळलेलीं साटणीचीं जाकिटें घातलेल्या बायका होत्या; आणि कांहीं पुरुष होते, त्यांचेही साटणीचे स्पॅनियर्ड फॅशन पोषाख होते; प्रत्ये- काच्या टोपीला मागें तुरा होता व तो खोंचायला एक ( कमी जास्त किंमतीची) पकड टोपीला लावलेली होती. मी ह्मटलें 'हीं नाटकांतील पात्रें नसून हे येथील एका प्रांतांतील लोक आहेत.' वयस्य म्हणाला 'हां आतां समजलें हे तुरे कशाचे ते ! हा शेंपटाचा अवशेष असावा !! ' मी ह्मटलें 'हें तूंच म्हणून

ओळखलेंस; ही कल्पना तुला कशी सुचली हें मला तर समजत नाहीं !' वयस्य म्हणतो ' अरे सीता देवीनें आपल्या वानरसेनेला वर नाहीं का दिला, कीं पुढें तुम्ही गौरकाय लोक होऊन राज्य कराल म्हणून ?' मीं विचारलें 'हें कशावरून ?' वयस्य म्हणाला 'सीता देवी वर देत होती तें मी स्वतः ऐकलें. मी वानर नसून आस्वल होतों, त्यामुळें गौरकाय झालों नाहीं. ह्यासंबंधानें श्लोक आहे तो असा:–

सीता म्हणे प्लवग हो ! इसवी सन एकुणीसशें बारा ॥

सालीं तनु बहु गौरहि––

नाहीं ! (डोकें खाजवीत) सालीं तनु-सालीं तनु-कांहीं आठवत नाहीं बोवा !' मी ह्मटलें " ती साली तनु अशीच अडवून धरायची ! जाऊं दे; फार डोकें खाजवूं नकोस, टक्कल पडेल. आस्वलाची स्मरणशक्ति तितकीच ! तुझा पुरावा मला पटला. तेच हे वानर लोक ह्यांत कांहीं संशय नाहीं !"

तेथून आह्मी बाहेर पडलों, ते पोटपूजेच्या व्यवस्थेला लागलों. तेथून पशुसंग्रहालय पहाण्यास गेलों. हें बरेंच मोठें असून लंडनच्या प्रसिद्ध ' झू ' मध्यें नसलेलीं कांहीं जनावरें येथें दिसलीं. थोडें पुढें गेल्यावर वयस्य म्हणतो ' अरे तिनें तुला ओळखलें रे ओळखलें ! ती बघ तुझ्याकडे कशी टक लावून पहात आहे ! ' मी पाहिलें तों हिंदुस्थानी म्हैस ! मी त्यास म्हटलें ' ती तुझ्यावर रागावून मजकडे पहात आहे. तूं प्रिया लंबाननेच्या भेटीला इतक्या दिवसांनीं आलास, तर बरोबर तिसऱ्याला आणि तेंही मनुष्य प्राण्याला कां आणलेंस म्हणून पट्टमहिषी तुझ्यावर रागावली आहे ! ' हर मॅजेस्टी लंबाननेचें वयस्यानें सांत्वन केल्यावर आम्ही पुढें निघालों. वयस्य म्हणाला, " एखाद्या बार्बरीच्या बादशहानें तुला पकडून पिंजऱ्यात घातलें व ' हा कपडे घालणारा प्राणी ' म्हणून जन्मभर प्रदर्शनांत ठेवलें, तर तुला काय वाटेल ? " मी म्हटलें "त्यांत काय वाटायचें आहे ! ज्याला स्वातंत्र्य मिळ-

विण्याची अक्कल नाहीं, त्यानें पारतंत्र्यांत भूषणच मानलें पाहिजे, असें शास्त्रच आहे!"

नंतर तेथें एक निशाणबाजी प्रदर्शन पाहाण्यालायक आहे म्हणून आम्हांस कळलें तें पहाण्यास गेलों. परंतु निशाणबाजीला पुष्कळ अवकाश होता. इतर करमणुकीचे प्रकार मात्र तेथें पुष्कळ होते. घसरगुंड्या, फिरतीं आसनें वगैरे प्रकार लंडनप्रमाणेंच होते. त्याप्रमाणेंच बँडस्टॅन्ड असून काफी-गृहेंही होतीं. बँड ऐकण्यासाठीं जात असतां मध्येंच वयस्य एकाकडे बोट दाखवून म्हणाला, " ते बघ काजीसाहेब चालले आहेत. " वयस्य दाखवीत असलेल्या मनुष्याच्या डोक्यावर केंस मुळींच नसून उन्हामध्यें डोकें चक-चकीत दिसत होतें.

मीः—काजी ह्मणतोस तर त्याला दाढी कोठें आहे ?

वयस्यः— आमच्या वर्गांत मुंबईस एक काजी म्हणून विद्यार्थी होता, त्याला दाढीही नव्हती व केंसही नव्हते. कदाचित् त्याला त्या वेळीं दाढी फुटली नसेल. पण त्याच्या नांवावरून मला काजीची आठवण झाली.

मीः–असे लोक तुला पूर्वी या देशांत दिसले नाहींत ?

वयस्यः—दिसले बरेच. पण त्या वेळीं उजेड फार नसल्यामुळें मला वाटलें अगदीं थोडे केंस असतील. पण येथें टळटळीत ऊन असल्यामुळें याचें गुळगुळीत डोकें मला ढळढळीत दिसत आहे.

मीः–काय हा रानटीपणा ! हे लोक स्वराज्याला लायक नाहींत, म्हणून ह्यांना एखाद्या सुधारलेल्या साम्राज्यांत खेंचलें पाहिजे. केंसानें डोकें थंड राहतें हें सुधारलेलें शास्त्र अजून या लोकांना माहीत नसावें हें आश्चर्य आहे!

फ्रांकफुर्ट हें शहर मुंबईपेक्षांही मोठें आहे व यांत इतरही पहाण्या-जोगीं स्थळें होतीं. परंतु उन्हाळा फार कडक असल्यामुळें व राहण्याच्या

जागेची अडचण असल्यामुळें आम्ही संध्याकाळीं ४॥ वाजतांच स्टेशनवर आलों. हें स्टेशन फार मोठ्या स्टेशनांपैकीं आहे. इकडल्या स्टेशनांचीं छपरें तावदानांचीं असतात; त्यामुळें पुष्कळ उजेड आंत येतो. पुष्कळ प्लॅटफार्म असतात, त्या सगळ्यांवर एक छप्पर नसून एकाला लागून एक अशीं कमानीच्या आकाराचीं छपरें असतात.

जर्मनींत फ्रांकफुर्टें दोन आहेत; म्हणून ह्या फ्रांकफुर्टाला फ्रांकफुर्ट-आ-माइन असें म्हणतात. जर्मनीमध्यें रोमन साम्राज्याचे वेळीं अनेक रानटी जाती रहात असत. त्यांत फ्रांक म्हणून लोक होते, त्यांच्यावरून फ्रांकफुर्ट हें नांव पडलें. गॉथ लोक होते, त्यांनीं रोम शहरावर स्वारी करून तें लुटलें. गॉल लोक होते ते फ्रान्समध्यें शिरले व सध्याचे फ्रेंच लोक म्हणजे ह्या गॉल लोकांचेच वंशज आहेत. त्याचप्रमाणें अँगल्स व सॅक्सन्स हे इंग्लंडमध्यें शिरले. अँगल्सपासून इंग्लंड हें नांव आलें आहे व इंग्लिश लोक हे अँग्लो-सॅक्सन जातीचे आहेत असें म्हणण्याची वहिवाट आहे. ( वास्तविक पिक्ट, स्कॉट, नॉर्समेन, जूट, डेन, नॉर्मन इत्यादि किती तरी आणखी परकीय जातींचें मिश्रण यांच्यांत आहे. ) ब्रिटनी ह्या फ्रेंच प्रांतांतील लोक इंग्लंड-मध्यें शिरले व त्यांच्यावरून ब्रिटन हें नांव पडलें. पूर्वीं जर्मन म्हणून एक शूर जात ह्या मुलखांत होती, त्यांच्यावरून जर्मनी हें नांव इंग्लिश लोकांनीं ह्या देशाला दिलें आहे. खरें ह्मटलें तर जर्मन लोक स्वतःच्या देशाला ‘ जर्मनी ’ मुळींच म्हणत नाहींत; ‘ डॉयशलांड ’ ( Deutchland ) असें म्हणतात. या देशाचा इतिहास मोठा मनोरंजक आहे. कै० नामदार रावबहादूर ग. व्यं. जोशी यांना या देशाबद्दल फार आदर असे व या देशासंबंधीं त्यांचा वाचनव्यासंग फार असे. जर्मनीसंबंधानें त्यांचें व्याख्यानही वसंतव्याख्यानमालेंत झालेलें आहे.

५चे गाडीनें फ्रांकफुर्टहून हैडलबर्ग येथें जाण्याचें आम्हीं ठरविलें. आम्हीं फ्रांकफुर्टच्या स्टेशनवर येऊन तिकिट हपीसकडे जात होतों. ( टिकेट,

ऑफिस वगैरे शब्द मराठी उच्चारपद्धतीला तसदी देतात. म्हणून तिकिट, ऱ्हपीस असे शब्द मराठींत रूढ करावे व ह्या सुधारणेकरितां महाराष्ट्रसमाजाशीं दांडगाई करण्याचाही स्वार्थत्याग केला पाहिजे, असें वयस्याचें मत आहे. ह्या पद्धतीला तो आंग्लोव्हर्नाक्युलर पद्धत म्हणतो ). जातां जातां वयस्य एकदम थबकला व म्हणाला " तो कोणरे तो ? अगदीं आपल्या बिरबलाप्रमाणें* दिसतो. " तो मनुष्य आगगाड्यांचें वेळापत्रक वाचीत होता व त्याचा हात त्याची दाढी थोडीशी वाढली होती तिचें परिशीलन करीत होता. इतक्यांत त्यानें आमच्याकडे पाहिलें त्याबरोबर आह्मीं त्याला ओळखला.

'बिरबल !'

'हां ! जी ! खाविंद ! अरे वा ! अलभ्य लाभ ! अलभ्य लाभ ! मिजाज तो शरीफ ?'

'जी हां ? आपकी तबियत तो आराम है ?'

'हां, तबियत तो आराम है, लेकिन् एकटा हिंडतों आहें, त्यामुळें पुष्कळदां आफत्में गिरफ्त होतों ? तुमचा मोर्चा सध्यां कोणीकडे आहे? '

'आम्हीं सध्यां हैडलबर्गला चाललों आहोंत. तुम्ही ?'

'मी हैडलबर्गचीच गाडी पहात होतों.'

---

**टीप**-*ह्यापुढें बिरबल, नारद, जांगिळमामा वगैरे ज्यांचीं पात्रें येतील ते सुहृद व वयस्य यांचे महाराष्ट्रांतील सहाध्यायी असून खोडकरपणानें त्यांच्या मित्रांनीं [त्यांच्या कांहीं गुणांमुळें] त्यांच्या अंगीं वाङ्मयांत प्रसिद्ध, ऐतिहासिक किंवा काल्पनिक व्यक्तींचें वैशिष्ट्य व नांव जडवून दिलेलें (व गमतीखातर त्यांनीं स्वीकारलेलें ) आहे असें समजावें. बिरबल ह्या पात्राची खुबी बिरबल बादशहा यांच्या गोष्टींचें पुस्तक वाचल्याशिवाय नीट समजणार नाहीं.

'मग चला बरोबरच जाऊं. कां तुमचा कांहीं दुसरा बेत आहे?'

'हें पहा, मी तुला नोटीस देतों कीं, तूं मला बहुवचनानेंच हांक मारलीस तरी मी तुला एकवचनानेंच हांक मारणार. तूं माझा व्याहीच झालास तर कदाचित् आपल्या लेंकरादेखत तुला अहो जाहो म्हणेन इतकेंच. जा तर तिकिटें काढ आधीं!'

तिकिटें काढल्यानंतर प्लॅटफॉर्मच्या दारापाशीं आमचें संभाषण पुनः सुरू झालें.

वयस्य :—बिरबल! ही दाढी केव्हांपासून ठेवलीस?

बिरबल:—त्याचें असें झालें कीं अकबर बादशहा एडिंबरोला असतांना एकदां दाढी करीत होते; आणखी वस्तरा चांगला न फिरल्यामुळें थोडेंसें कापलें. तेव्हां वस्तरायुक्त हाताकडे पाहून ते म्हणतात 'तूं हात आहेस कां हजाम आहेस?' मग मला विचारतात "बिरबल"—"जी, खाविंद"—"जगांत उत्तम सुख कोणतें?" "खाविंद, उत्तम सुख म्हणजे दाढी न करितां वाढविणें हें होय." त्याबरोबर बादशहांनीं मला एक कोट रुपये देण्याचा हुकूम केला व ठरविलें कीं, प्रवासाला निघालों म्हणजे दाढी वाढवावयाची!

मी :—कोट तर तुझ्या अंगावर बादशाही दिसतोच आहे. पण रुपये विलायतेस काय करायचे! पौंडांचा हुकूम असता तर कांहीं तरी!

बिरबल:—दिले असें मी कोठें म्हटलें! हुकूम केला! तें असो, पण तुमचा पुढचा प्रोग्राम काय आहे?

मी:—आम्ही जर्मनींतून निघून ऑस्ट्रिया, इटली, स्वित्झरलंडमधून लंडनला परत जाणार आहों! तुझा काय बेत आहे?

बिरबल:—मला आतां एक दीड महिना सुट्टी आहे. मीही तुमच्या बरोबर स्वित्झरलंडपर्यंत येतों. मग तेथून पुढचा विचार पाहूं.

वयस्यः—तूं सध्यां आहेस कोठें व जातो आहेस कोठें? कारण गीतेंत म्हटलें च्च आहे ' यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।...दग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः ॥ म्हणजे सुरुवातीला जो कांहीं बेत ठरवीत नाहीं, बुध म्हणतात त्याला मोठा शहाणा म्हणावा, त्याचीं सर्व कामें जळून जातात; कांहींसुद्धां कामें होत नाहींत.'

बिरबलः—हर हर गीताबाई काय तुझे हे धिंडवडे! तूं सुद्धां सुटली नाहींसना! असो, करतां कसें? स्टेजवर आलें म्हणजे गंडेऱ्या खायला तयार असलेंच पाहिजे. मी हैडलबर्गच्या युनिव्हर्सिटींत अप्लाइड केमिस्ट्री शिकण्याकरितां म्हणून राहिलें होतों. सध्यां मला सुट्टी आहे म्हणून कोठें तरी जाण्याच्या बेतांत होतों. काल फ्रँकफुर्टची जत्रा पाहण्यास आलों होतों. आतां तुमच्यासारखे रसिक मित्र सांपडल्यावर तुमचा प्रोग्राम तो आमचा प्रोग्राम. कां वयस्या, खरें आहे कीं नाहीं?

वयस्यः—वाहवा! वाहवा!! म्हटलेंच आहे ' मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः '

बिरबलः—शाब्बास! ही कला तूं कोठें शिकलास?

वयस्यः—मी आपल्या महामुनींकडून एकदां उचलण्याचा प्रयत्न केला होता, पण तो साधला नाहीं. खरेंच नारद इकडेच कोठें होता नाहीं.

बिरबलः— तो गुदस्तां हैडलबर्गला होता. यंदां कोठें आहे कोणास ठाऊक.

इतक्यांत प्लॅटफॉर्मवर—नव्हे वयस्याच्या ॲंग्लोव्हर्नाक्युलर पद्धतीप्रमाणें " फलाटावर " म्हटलें पाहिजे—फलाटावर गाडी आल्यामुळें गाडींत शिरून आम्हीं हैडलबर्गच्या मार्गास लागलों.

---

## संचार पांचवा

# हैडेलबर्ग ( Heidelberg ) जर्मनी

फ्रांकफुर्ट–आ–माइन येथून सायंकाळीं ५ वाजतां आह्मीं निघालों ते ७ वाजण्याचे सुमारास हैडेलबर्ग येथें येऊन पोंचलों. हें गांव फार रम्य आहे अशी ह्याची कीर्ति आम्हीं ऐकली होती व त्याप्रमाणें आह्मांस अनुभवही आला. स्टेशनांत गाडी येण्यापूर्वींच आह्मांस टेंकड्या दिसूं लागल्या. ह्या टेंकड्यांवर झाडें होतीं, ते मोठाले वृक्षही नव्हते व लहानशीं झुडपेंही नव्हतीं. तसेंच हीं झाडें दाट असून साधारण सारख्याच उंचीचीं होतीं. त्यामुळें डोंगराच्या कडेवर हिरवा रुजामा पसरल्याप्रमाणें भास होत होता. दोहों बाजूंस टेंकड्या असून मधून ‘ नेकर ’ नदी जाते. त्या नदीच्या कांठीं डोंगराच्या उतारावर हें गांव वसलें आहे. “ अशा प्रसंगीं ” वयस्य म्हणतो “ गांव हा शब्द नुसता घालायचा नाहीं; त्याच्या मागें ‘ टुमदार ’ हें विशेषण लावलें पाहिजे ! कांहीं कांहीं नामांच्या पाठीमागें ठराविक विशेषणें लावलींच पाहिजेत. वक्त्याचें ‘ अस्खलित ’ व अध्यक्षाचें ‘ समयोचित ’ भाषण, मनुष्यांस आपल्यांतून ओढून नेणारा ‘ निर्घृण ’ काळ, ‘ दयाळू ’ सरकार, इत्यादि प्रसंगीं वेळेस नाम चुकलें तरी चालेल पण विशेषण चुकतां कामा नये ! ह्याला ‘ उचित–परिचित–भाव ’ असें म्हणतात.” असो. हें ‘ टुमदार ’ गांव फार मोठें नसलें तरी ऐतिहासिक आहे. नेपोलियनचे वेळेस एकदां उध्वस्त होऊन हें पुनः वसलेलें आहे. नेकर नदीचें पात्र साधारण लहानच आहे; आपल्या इंद्रायणी नदी एवढें येईल. पाणीही फार नव्हतें, कारण आम्हीं गेलों त्या वेळीं ऐन उन्हाळा होता; तथापि स्नानापुरतें पाणी होतें. स्टेशन ( वयस्याच्या आंग्लो व्हर्नाक्युलर पद्धती-प्रमाणें ‘ ठेसन’ म्हणावयाचें; परंतु ह्या शब्दाचे बाबतींत वाद पडला कीं

' टेषण ' हा शब्द विशेष चांगला की ' ठेसन ' हा चांगला; तेव्हां तड-जोड म्हणून आणखी दहा वर्षेंपर्यंत ' स्टेशन ' हाच शब्द चालू ठेवावा असें ठरलें ) मधून बाहेर पडल्यावर मग वाद पडला कीं, हॉटेलशोधार्थ कोणीकडे जावयाचें ! बिरबलचें मत पडलें कीं, नदीचे कांठीं हवाशीर असें फर्स्टक्लास हॉटेल पाहून तेथें जावें. मला हें म्हणणें पटलें नाहीं. मी म्हणालों " आपणांला गरीबांना हे ढंग कशाला हवेत ? उक्तं च

नानुकुर्यादशेषेण सामान्यस्तु महाजनम् ।
सूकरो गजभावेच्छुः शुंडाविरहितो यथा ॥ ( षष्ठतंत्र )

वयस्य उवाच ' कथमेतत् । ' अहमब्रवीत् " प्रथम ब्रह्मदेवानें सृष्टि उत्पन्न केली त्या वेळेस डुकराला हत्तीप्रमाणें सोंड होती. तेव्हां डुकराला वाटलें, मी व हत्ती एकाच जातीचे. म्हणून तो नेहमीं हत्तीच्या बरोबरीनें व तो वागेल तसा वागूं लागला. पुढें एकदां उन्हाचा फार ताप झाल्यावेळीं जवळपास मोठेंसें झाड नसल्यामुळें हत्तीनें स्वतःपेक्षां किंचित् कमी उंचीचें एक मध्यमसें झाड होतें त्याला सोंडेनें विळखा घातला व तें मोडून सावलीसाठीं आपल्या डोक्यावर ठेवलें. डुकराला बसण्याजोगें जवळ एक डबकें होतें; परंतु हत्ती त्यांत न शिरल्यामुळें डुकरानेंही त्यांत न शिरतां दुसऱ्या एका झाडाला सोंडेचा विळखा घालून हिसका मारला. पण झाड मोडण्याऐवजीं सोंडच तुटून गेली ! तेव्हांपासून डुकराची सोंड तुटकी होऊन राहिली आहे. "

बिरबल म्हणाला " अकबर बादशहा एकदां मेक्सिकोमध्यें असतांना हिंडायला निघाले. बरोबर माझ्याशिवाय दुसरें कोणी नव्हतें. हिंडतां हिंडतां एके ठिकाणीं एक मनुष्य आपल्या सर्व कुटुंबास घेऊन वनभोजनास आला. त्यांत दोन जुळे मुलगे होते. थोड्या वेळानें त्यांच्या आईनें फराळाचें सामान काढलें व त्यांतील एका मुलाला विचारलें, तुला काय पाहिजे ? तो म्हणाला

मला लाडू पाहिजे. मग दुसरा मुलगा होता त्याला विचारलें, तुला काय पाहिजे ? तो ह्मणाला मला शिळें थालिपीठ हवें. बादशहांनीं मजकडे पाहून विचारलेंः– ' क्यंव् बिरबल ! तुझ्या मनांत काय विचार आला ! ' मी ह्मटलें ' खाविंद, मला वाटतें कीं, पहिला मुलगा मोठा सरदार होईल व दुसरा मुलगा नांगऱ्या होईल ! ' हें ऐकल्याबरोबर बादशहांनीं त्या पहिल्या मुलाला एकदम दहा लाख रुपयांची नेमणूक करून दिली व मला त्याचा गार्डियन नेमलें। "

वयस्य ह्मणाला " दोघांच्याही तर्फेनें पुष्कळ बोल्तां येईल. पण मला असें वाटतें कीं, आपणांला डबक्यांत लोळायलाही नको आणखी लाख रुपयांची असामीही नको. आह्मांला आपला सोनेरी मध्य बरा. ' नात्युच्छ्रितं नातिनीचम् । ' असें भगवंतांनींच सांगितलें आहे."

सर्वांना अनुमत असें पथिकालय मिळाल्यावर त्या दिवशीं आम्ही पोटभर–किंवा पाठभर म्हणा–झोंप घेतली. दुसरे दिवशीं सकाळीं नखरा–( Neckar ) नदीस्नानाला गेलों. तेथें स्नानगृहाला भाडें नव्हतें. ( असा प्रकार दुसरीकडे कोठें नव्हता. ) फक्त चड्डी–टावेलचे १० फेनिग द्यावे लागले. ( १०० फेनिग=१ मार्क; एका पौंडास सुमारें २०$\frac{३}{१०}$ मार्क येतात. इंग्रजी पेनीप्रमाणें १० फेनिगचें नाणें समजतात. येथील ५ फेनिग व दहा फेनिगचीं नाणीं निकलचीं असतात. इंग्लंडमध्यें निकलचें नाणें नाहीं; पण इतर बहुतेक ठिकाणीं आहे. )

त्यानंतर आम्ही येथील युनिव्हर्सिटीची इमारत पहाण्यास गेलों. येथील लायब्ररी पाहण्यालायक आहे असें ऐकलें होतें. युनिव्हर्सिटीची इमारत चार इमारतींसारखी आहे. ही गांवांतच असून केमिकल लॅबोरेटरीची इमारत वेगळी दुसऱ्या रस्त्याला आहे. आह्मीं लायब्रेरियनला गांठून लायब्ररी पाहण्यास त्याजकडून एक मनुष्य तर मिळविला. त्यानें आह्मांस सर्व लायब्ररी

दाखविली. एका दालनांत कांहीं जुने लेख वगैरे होते, ते तो आम्हांस समजावून सांगूं लागला. परंतु ते बायबलच्या जुन्या प्रति वगैरे आह्मांस विशेष गोष्टी नसलेले लेख असल्यानें आह्मी लवकरच पुढें सरकलों. एके ठिकाणीं वृत्तवाचनालयासारखें होतें तेथें लोक पुस्तकें वगैरेमधून टिपणें करीत होते. पुढें मग तीन चार दालनें खूप लांबलचक असून तीं कपटांनीं भरलेलीं होतीं व ह्या कपटांवर पुस्तकें सुव्यवस्थित रीतीनें मांडलेलीं होतीं—मात्र हीं कपाटें कांचबंद नसून हवाशीर होतीं. आह्मांला ह्यांत पहाण्यालायक म्हणजे संस्कृत ग्रंथांचीं कपाटें होत. तीं आह्मी बुद्ध्या त्याच्या-कडून दाखवून घेतलीं. त्या ग्रंथांत वेदांच्या ॲनोटेटेड प्रती होत्या. मी म्हणालों " पूर्वीं आपल्यामध्यें वेद यवनांच्या हातीं पडूं नयेत म्हणून कोण कटाक्ष होता ! व आतां यवनांकडे वेद जाऊन त्यांची चिकित्सा झालेली आपण मोठ्या उत्सुकतेनें पहात आहोंत. "

बिरबलः—जाऊं द्या हो आचार्य ! असा शोक करूं लागलों तर एकदम हिमालयांत जावें लागेल ! हे पुढें ग्रंथ कसले आहेत ते पहा.

पुढें पाहतां महाभारताच्या प्रती, इंग्रजी भाषांतर वगैरे दिसल्या. त्यानंतर पुढें आह्मांस परिचित असलेलीं शाकुंतलादि नाटकें दिसलीं. शिवाय इतरही कांहीं काव्यें वगैरे होतीं. आह्मांला त्या सर्व संग्रहाची चिकित्सा करून पहाण्यास सवड नव्हती व तितकी जरूरही भासली नाहीं. एकंदर लायब्ररीची अनुक्रमणिका ३०।४० व्हॉल्यूम होती. त्यांतील एकांत संस्कृत, आरेबिक वगैरे प्राच्य भाषांतील पुस्तकांची अनुक्रमणिका होती, तिच्यावरून आह्मी एकदां नजर टाकली. तेथें एक संस्कृतचा प्रोफेसर आहे म्हणून ऐकलें होतें. त्याबद्दल वयस्य चौकशी करूं लागला. तेथें एक दोन विद्यार्थी होते. त्यांना वयस्य विचारूं लागला कीं, संस्कृतचा प्रोफेसर कोठें आहे ? त्यांना प्रथम समजेना. मग एकाला किंचित् इंग्रजी येत होतें. ( सेकंड लॅंग्वेज म्हणून

येथील युनिव्हर्सिटींत इंग्लिश भाषा कांहीं विद्यार्थी शिकतात, ) त्यानें प्रोफेसरांची एक याद काढली व तींत पाहून सांगितलें कीं, प्रोफेसर मनहैम ( Mannheim ) येथें रहातो व आठवड्यांतून एकदां येथें येतो. त्या दिवशीं कांहीं तो तेथें नव्हता. मग आह्मी पुढें निघालों. मी वयस्याला विचारलें " एवढी संस्कृतच्या प्रोफेसराची उकळी कां आली होती ? "

वयस्यः-नाहीं आपलें उगीच !

मीः-तरी पण ! सांग तर खरें ? त्याच्या हाताखालीं असिस्टंटची नोकरी मिळावयाची आहे काय ?

वयस्यः-तसें नाहीं रे सुहृदा ! पण मला कोणीं असें सांगितलें कीं, येथील संस्कृतज्ञ पंडितांना आपल्या लोकांविषयीं फार आदर असतो व कोणीं संस्कृत जाणणारा हिंदी मनुष्य दिसला कीं ते टोपी काढतात.

मीः-मग तर प्रोफेसराला जरूर भेटलें पाहिजे ! खरेंच, पण त्याला दुसरी बाजू आहे. त्यानें टोपी काढली समज; म्हणजे संस्कृतांत त्याचें शुभ चिंतून त्याशीं भाषण केलें पाहिजे. इतकें होत नसल्यास संस्कृतचे प्रोफेसरास भेटणें म्हणजे असलेला आदर नाहींसा करून घेणें होय. तूं आतां मुंबई युनिव्हर्सिटीचा ग्रॅजुएट आहेसच; आतां मला संस्कृतचा प्रोफेसर समज. ही मी टोपी काढतों. ( असें म्हणून वांकून मी टोपी काढली ).

वयस्य कांहीं बोलत नाहींसें पाहून मी म्हटलें ' कांहीं बोल कीं. '

वयस्यः-नमस्करोमि भवन्तम् । ( आह्मीं हसलों ! )

मीः-अभिवादये । अनुगृहीतोऽस्मि भवदागमनेन । ( थोडा वेळ थांबून ) पुढें काय ?

वयस्यः—( ओंठाच्या कुर्डया करून ) कांहीं सुचत नाहीं बोवा ! मी त्याला विचारीन ' डू यू स्पीक इंग्लिश ? '

मीः—( बिरबलाकडे पाहून ) वीरबल ! एनं महाजनं द्वारमार्गं दर्शय ।

बिरबलः—इत इतो महाराजः। यदि रोचते भवन्तं सज्जोऽयमर्धचन्द्रः ( हातानें अभिनय करून ) शीघ्रगतिसमुत्पादकः ।

मीः—अरे कमींत कमीं आठ वर्षें आपण संस्कृत शिकलों पण परीक्षेंत श्लोकाचे पहिले शब्द ‘ शुश्रूषस्व गुरून् ’ दिसले कीं श्लोक न वाचतां एक अर्ध्या मिनिटांत सर्व इंग्रजी भाषांतर बिनचूक कागदावर उतरण्यापलीकडे दोन वाक्यें सुद्धां आपणांला बोलतां येत नाहींत, अशा स्थितींत प्रोफेसर आपल्याला भेटला नाहीं, हीच गोष्ट फार उत्तम झाली असें मला वाटतें.

यानंतर आह्मीं केमिकल लॅबोरेटरीकडे गेलों. येथील माहिती बिरब-लला असल्यामुळें त्यानें आम्हांला सर्व खोल्या दाखविल्या. तेथील नानातऱ्हेचें सामान, भट्टया, उपकरणें, द्रव्यें वगैरे पाहून आह्मीं थक्क होऊन गेलों. नंतर त्यानें आम्हांला तेथील शिक्षणपद्धतीविषयीं माहिती सांगितली. तिचा सारांश असा—

येथें लेखी परीक्षा नाहींत. सर्व परीक्षा तोंडी होतात. मात्र शेवटच्या परीक्षेला एक निबंध लिहावा लागतो, त्याला थेसिस ( Thesis ) ह्मणतात. विषय भाराभर नसून आपणांस पाहिजे तो एकच घ्यावयाचा असतो व घेतलेल्या विषयांत ग्रंथांत न लिहिली गेलेली अशी एखादी कल्पना घेऊन तिच्यावर विचार करून शक्य तितकी पूर्णतेला आणून मग तो निबंध लिहावयाचा. म्हणजे Ph. D. ( डॉक्टर ऑफ फिलॉसफी ) अशी पदवी मिळते. अर्थात् या निबंधांत अलौकिक बुद्धिचातुर्य विद्यार्थी दाखवील अशी परीक्षकांची अपेक्षा नसते. विद्यार्थ्यानें परिश्रम करून विषय पूर्णपणें समजून घेतला आहे कीं नाहीं एवढेंच त्यांस पहाणें असतें. टर्म फक्त ३ वर्षांची असते. पण साधारण बुद्धीच्या माणसाला जास्त वर्षें लागतात. सर्वांत जरू-रीची गोष्ट म्हणजे आधीं दोन चार महिने इकडे नुसतें येऊन जर्मन भाषा

शिकत रहावें. हुशार विद्यार्थी असल्यास साधारण कामापुरतें जर्मन येण्यास इतकी मुदत सहज पुरी होते. येथें येऊन जर्मन लोकांत राहून नेहमीं जर्मन बोलत असलें म्हणजे ही गोष्ट कठीण पडणार नाहीं. येथें आल्यानंतर मग ठरवावें कीं, कोणत्या युनिव्हर्सिटींत जावयाचें? कारण तेथूनच विचार ठरवून निघाल्यास अडचण होईल. विद्यार्थ्यांच्या मगदुराप्रमाणें त्याला युनिव्हर्सिटी पहावी लागेल. कांहीं युनिव्हर्सिट्या प्रख्यात आहेत. तेथील परीक्षा जरा कठीण असतात व तेथील थेसिस जर्मन भाषेंतच लिहावी लागते. ह्या युनिव्हर्सिट्यांच्या पदवीला विशेष मान आहे. कांहीं युनिव्हर्सिट्यांत इंग्लिश भाषेंत थेसिस लिहिली तरी चालते; ह्या गौण मानल्या जातात. विद्यार्थ्यानें इकडे आल्यावर मग कोणत्या युनिव्हर्सिटींत जावयाचें तें ठरवावें हें बरें. त्याचप्रमाणें शिक्षणासंबंधीं कांहीं कमीजास्त तऱ्हा निरनिराळ्या युनिव्हर्सिट्यांत असते, तें सर्व येथें आल्यावर लक्षपूर्वक विचारांत घेतां येईल. कांहीं ठिकाणचे प्रोफेसर विशेष नामांकित असतात. खरें म्हटलें तर प्रोफेसर हे हुशार पाहूनच नेमलेले असतात. नुसतीं वशिल्याशीं तट्टें नसतात. ज्या लोकांनीं आपल्या विषयांत विशेष प्राविण्य दाखविलेलें असतें व ज्यांना थोडें-बहुत खासगी चरितार्थाचें साधन असतें, अशा लोकांनाच प्रोफेसर नेमतात. पुष्कळ प्रोफेसरांना पगार नसतो पण विद्यार्थ्यांचे संख्येचे प्रमाणांत कांहीं रकम मिळते. विद्यार्थ्यांना फी देखील उगीच नांवाला असते. त्यामुळें गरीब विद्यार्थ्यांना सुद्धां युनिव्हर्सिटीचा फायदा घ्यायला सांपडतो. युनिव्हर्सिटींत गरीब विद्यार्थी असतात तसे श्रीमंत विद्यार्थीही असतात. हे म्हणजे बडे बापके बेटे! केवळ स्वतंत्रपणानें रहाण्यास सांपडावें म्हणून वर्षांची वर्षें युनिव्हर्सिटींत काढतात. नुसते रिकामपणांत दिवस काढते तरी बरें होतें; पण दुसरे उद्योग करीत बसतात. ते उद्योग म्हणजे आपापसांत मारामाऱ्या करतात! एकंदर विद्यार्थ्यांचे ४।५ भेद आहेत. ते बहुतेक स्थलविशेषानें होतात. ह्या भेदांपैकीं प्रत्येक प्रकाराला वेगळ्या रंगाची टोपी

असते. पैकीं पांढरा व तांबडा ह्या रंगांत मोठी चुरस असते. वरील दोन रंगांचे लोक पैसेवाले असतात त्यामुळें त्यांना इतर धंदे करावयास सुचतात. आपापसांत मारामाऱ्या करतात म्हणून मघांशीं म्हटलें, त्यावरून कोणाला असें वाटेल कीं, काठ्या घेऊन ऐकमेकांला बडवीत असतील. पण ते मारामाऱ्या करतात त्या नुसत्या काठ्यांनीं नाहीं, तर तरवारींनीं करितात ! ज्याच्या चेहऱ्यावर किंवा हातावर जखमेचा वण असेल त्याचें तें मोठें भूषण समजतात; त्यामुळें ८।१५ दिवसांनीं तरी एखादें द्वंद्व युद्ध होतेंच; ह्यांत मनुष्य मरूं नये येवढी मात्र खबरदारी घेतात. तेवढ्यासाठीं पोट, हात वगैरे कांहीं भाग फडक्यांनीं खूप गुंडाळतात, इतकें कीं त्याचें अतिशय ओझें होऊन, युद्ध सुरूं होईपर्यंत दुसऱ्यांनीं हात उचलून धरावे लागतात. कुरापती काढणें व लढणें हीं कामें कांहीं ठरीव गुत्ते आहेत तेथें जाऊन होतात. असले उडाणटप्पु विद्यार्थी परीक्षा पास न झाल्यामुळें वर्षेंचीं वर्षें पुनः पुनः कॉलेजांत येतात. द्वंद्वयुद्धाचे वेळीं डॉक्टर, निर्णायक ( अंपायर ) व दुकले ( सेकंड्स ) जवळ असतात.

ही हकीकत ऐकून आम्हीं बाहेर आलों व क्निसिसानामध्यें जेवण घेण्यासाठीं निघालों. वाटेंत एका उद्यानांतून जात असतां कांहीं युनिव्ह-र्सिटीचे विद्यार्थी आमच्या शेजारून गेले. त्यांच्यापैकीं कांहींच्या तोंडांवर जखमांचे थोडथोडे वण होते व एकाचें तोंड तर अगदीं कुरूपच झालें होतें. हें पाहून मीं म्हटलें "असल्या शूर लोकांनींच साम्राज्यें संपादन करावीं. नाहीं तर आमचे कॉलेज-स्टूडन्ट ! दाढी करायचा वस्तरा सुद्धां हातांत भक्कम धरतां येत नाहीं." हें ऐकून वयस्याला स्फुरण चढलें ! त्यानें आपल्या पापण्या पसरल्या, डोकें मागें रेटलें, बरगड्या पुढें ढकलल्या व जिभेच्या शिरा ताठ करून म्हणाला "मीं विद्यार्थी असतों तर यांच्यांत मिसळून अंगावर शेंपन्नास तरी वार करून घेतल्याशिवाय राहिलों नसतों".



जर्मन विद्यार्थ्यांचें द्वंद्वयुद्ध.

बिरवलनें सहज मागें पाहिल्याप्रमाणें करून एकदम चेहरा विकृत केला, व ‘ अरे बापरे ! ’ असें ओरडून धूम ठोकली. त्याबरोबर वयस्यानेंही बुटांच्या तळव्यांना ऊर्ध्व दिशा दाखविली ! पण तितक्यांत मागेंही पाहण्याचा प्रयत्न केल्यामुळें त्याला स्वतःला नाहीं तरी त्याच्या पायांना द्वंद्वयुद्ध करण्याची संधि सांपडली ! मात्र पाय अशा रीतीनें इतर कामांत गुंतल्यामुळें शरीराच्या वरील भागाला संभाळण्याच्या कामाकडे त्यांचें दुर्लक्ष होऊन त्या भागाला जमिनीचा आधार घ्यावा लागला. या द्वंद्वयुद्धाचा प्रकार मात्र जरा वेगळाच झाला. म्हणजे पायांत द्वंद्वयुद्ध आणि वण पडले शरीराच्या दुसऱ्याच भागांवर !

मग आम्ही तेथून निघून, क्रिसिसानामध्यें जेवण घेऊन डोंगरावरील किल्ला पहाण्यास निघालों. सदरहू किल्ला हा डोंगराच्या माथ्यावर नसून त्याचे निम्मेपेक्षां कमीच उंचीवर आहे. साधारण फर्ग्युसन कॉलेजचे पांची पांडवांच्या टेंकडीइतकें चढावें लागतें. किल्ला सध्यां उपयोगांत नसून पडक्या स्थितींत आहे. ह्या किल्ल्यांत विशेष पाहाण्याजोगें म्हणजे दोन पिंपें ! त्यांपैकीं एक बच्चा असून दुसरें फारच मोठें आहे. हें आडवें ठेवलेलें असून त्याची पुढील तबकडी ४ पुरुष उंच दिसते. ह्याच्या शेजारीं जिना आहे त्या जिन्यानें वर जाऊन दुसऱ्या बाजूनें खालीं आलें म्हणजे पिंपांचा आकार वरून दिसतो. ह्या पिंपांत २२१७२६ लिटर ( सुमारें ४८७८० गॅलन ) दारू रहाते ! थोडे दिवसांपूर्वीं पर्यंत ह्या पिंपांत दारू होती; पण ती युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांनीं “ पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा ” संपविली असें म्हणतात ! ( युनिव्हर्सिटीच्या रिपोर्टांत ही भूषणावह गोष्ट आली आहे कीं नाहीं, तें पहावयाचें विसरलों. ) पानस्वातंत्र्याचा पूर्ण फायदा घेणाऱ्या ‘ पार्किओ ’ नामक एका पानशूर गृहस्थाचा पुतळा येथें ठेवलेला आहे. त्याचप्रमाणें ज्या कंपासानें तबकड्याच्या आकार बनविण्यांत आला तो कंपासही येथें ठेवलेला आहे.

ह्या पिंपराजाचें कौतुक करीत तेथून निघालों, ते किल्ल्याबाहेरच्या गच्चीवर येऊन दाखल झालों. कडक ऊन असल्यामुळें विशेष कोणी प्रेक्षक किल्ल्यावर आलेले नव्हते. वृक्षाच्छादित शीतलसमीरणवीजित मार्गानें चालत असतां झाडांच्या आडून हिंदुस्थानी गाण्याप्रमाणें सूर ऐकूं आले. जरा पुढें गेलों तों कोणी तरी मधुर आवाजानें व सुंदर रागदारींत पुढील पद म्हटलेलें ऐकूं आलें:–

* पावना, वामना, या जना,
दे नव भोजनीं निरंतर बेसना ॥ ध्रु० ॥
श्रीवत्सांकित कौस्तुभधारिन् । भोगिजनोदररंजना ॥ १ ॥
भो पक्वान्नपरातसमर्पा । मत्तनिशाचरकंदना ॥ २ ॥
नवतुलसीदलमालाभूषा । पुरवद्भजि भाजिभोजना ॥ ३ ॥

वयस्य म्हणाला ‘ अरे गावलारे गावला ! ’

मी:–कोण तो ?

वयस्य:–अरे हा आपला नारद !

बिरबल:–अरे हो ! हेच आपले महामुनि ! बरेच दिवस मला त्याचा पत्ता नव्हता ! त्याला जाऊन हुडकलाच पाहिजे.

मग आम्ही वृक्षांच्या आड जाऊन पाहिलें तों पुढील देखावा आम्हांस दिसला.

‘ ...तालतमालसालसरलव्यालोलवल्लीलता—
च्छन्नं सूर्यकरप्रतापरहितम्... । ’ ( गंगाष्टक )

असें एक कुंजाप्रमाणें रम्य ठिकाण असून तेथें कलशावरील नारळाप्रमाणें एका लहानशा उंचवट्यावर डोकें टेंकून, इस्पिकच्या एक्याप्रमाणें तंगड्यांचा आकार करून, एंजिनमधील गव्हर्नरप्रमाणें हात पोटावर ठेवून, व राजाभाई टावरच्या घड्याळासारखें तोंड पसरून तेथील जलस्थलदेवतांचें

---

* सौभद्र नाटकांतील “ पावना वामना ” या पदांतील कांहीं शब्दरचना बदलली आहे.

वामकुक्षिमोचन सुखकर करीत आमच्या मुनिमहाराजांची स्वारी ‘ ब्रह्मानंदीं टाळी ’ लागल्याप्रमाणें विराजत होती. आम्ही तेंथें पोंचलों तरी त्यांची समाधि उतरेना; तेव्हां समाधिभंगाचें महत्पातक करण्याचा विचार केला. बिरबल त्याच्या डोक्याला स्वरोत्पादक स्पर्श करून हात जोडून म्हणाला ‘ मुनिमहाराज ! हा दास चरणीं लीन होत आहे ! ’ वयस्यानेंही तसाच डोक्याचे दुसरे बाजूस दृढस्पर्श करून म्हटलें ‘ मुनिवर्य ! हा नम्र सेवक चरणांप्रत वंदन करीत आहे ! ’

स्पर्शानें मऊ झालेली जागा चोळीत नारद म्हणाला ‘ माझे चरण इकडे नाहींत ! ते तिकडे पलीकडे आहेत. ह्या तुमच्या वंदनसुखाकरितांच मीं त्यांवर बूट घातले आहेत ! अरे पण ह्या तुमच्या चुकीमुळें आशीर्वाद द्यायचा राहिला. असो; तुमच्या अदृष्टांत नाहीं त्याला काय करणार ? कां ! वयस्या ! खुशाल आहेसना ! आणखी हा कोण बिरबल ? ( जोरानें ) बिरबल ! राज्याचा बंदोबस्त कसा काय आहे ?

बिरबलः– ( जोरानें व सपाट्यानें ) आलबेल बराबर आहे सर्कार ! शत्रूंनीं आतांच आपल्या डोक्यावरली पगडी पळवून नेली हुजूर !

नारदः– ( घाबरून ) माझी पनामा * कुठें गेली ? साडे सहा मार्क तिला दिले होते !

मीः–जरा वाऱ्यानें पलीकडे गेली इतकेंच. ( टोपी आणून दिली ). खरें, पण मुनिमहाराज, आपली शेंडी आणि वीणा कोठें दिसत नाहींत ?

नारदः–त्याचें असें झालें कीं,

कदाचिन्नारदोयोगी । लोकानुग्रहकांक्षया ॥
पर्यटन्सकलांल्लोकान् । आल्पससानुमुपागमत् ॥ १ ॥ ( आकाशपुराण )

वयस्यः–आल्पसकडे कुणीकडे गेले होते !

---

* उन्हाळ्यांत वापरण्याची गवतापासून केलेली टोपी.

नारदः-( ‘ हा वयस्य किती उतावळा आहे ’ अशा मुद्रेनें बिरबलकडे पहातो. )

बिरबलः-वयस्याला पण जरा ऐकून तर घेशील ?

नारदः—विचारूं दे रे !

वयस्यः—नुसतें विचारलें म्हणून काय झालें ?

बिरबलः—पण तो आतां तें सांगतच होता !

नारदः— हो, मी सांगणारच होतों पण—

बिरबलः—तितका व्यत्यय आला ना !

नारदः—कांहीं विशेष नाहीं !

वयस्यः— हो, आहांत ठाऊक मोठे रसिकपणाचे कांदे आहांत ते.

नारदः—रसिक असण्यांत कांहीं लाज नाहीं.

बिरबलः आम्हीं असे गाजरपारखी लोक नाहीं !

नारदः—कांद्याच्या जोडीला गाजरें पाहिजेतच !

मीः—मुनिमहाराज ! भेटल्याबरोबर लागलांत का कलागती लावायला ! तुमचें आतां आकाशपुराण पुढें चालूं द्या. ‘आत्ससानुमुपागमत्। ’ पुढें ?

नारदः—सुहृदा ! तूं तरी लाकडाच्या भुसापेक्षां नीरस आहेस बुवा ! जरा मजा पाहिली असतीस तर काय बिघडलें असतें ? भांडण झालें असतें तर त्यांत दोघांचेंही कल्याण होतें ! विसरलेली प्राकृत भाषा उजळून ताजी झाली असती ! अरे ह्या जगांत येऊन मजा करावी, असें भगवंतांनींच गीतेंत सांगितलें आहेः

‘क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्-मजा।’—अ०४ श्लो०१२.

ह्याचा अर्थ असा कीं, ह्या मनुष्यलोकीं सिद्धि लवकर मिळते म्हणून मजा कर !

मी (थक्कपणा उतरल्यावर):—गुरुशिवाय ज्ञान व्यर्थ आहे म्हणतात तें खोटें नाहीं! मी गीता वाचली आहे व पुष्कळांनीं सांगितलेली ऐकलीही आहे. पण आज माझ्या डोक्यांत प्रकाश पडला तसा कधीं पडला नव्हता!

वयस्य:—(हंसूं आवरल्यावर) बरें आतां तुमची गोष्ट पुढें चालूं द्या!

नारद:— हो! अथातो गोष्ट—जिज्ञासा! आल्प्स पर्वताच्या शिखरावर यक्षगंधर्वकिन्नरादि जमून 'त्राटिका' नाटक करीत होते. रंभाजीराव अय्या होऊन त्राटिकेला संगीतकला शिकवायला जायचा होता. इतक्यांत हरिभजनाच्या नादांत झपाट्यानें जाऊन मी नेमका त्राटिकेपुढें उभा राहिलों. आतां माझ्या शेंडीचें व वीणेचें काय झालें, हें तुम्हांसारख्या सुज्ञांस सांगणें नकोच!

तेथून मग आम्ही डोंगराच्या शिखरावर कएनिग्जस्टुल (राजमाची) म्हणून जागा आहे ती पहाण्यास निघालों. वरतीं जाण्यास आगगाडी (टामरेळच म्हणावयाची ती!) आहे. तिला एक डबा असून रुळांची रचना वेगळी असल्यामुळें साधी आगगाडी जो चढाव चढूं शकत नाहीं त्याहून किती तरी जास्त चढाव—सुमारें एकतृतीयांश काटकोन—ही गाडी जाऊं शकते. खरें म्हटलें तर सपाट जमिनीवर हा डबा उपयोगीच नाहीं. कारण त्याचीं बसण्याचीं बाकेंच तिरपीं केलीं असल्यामुळें डबा सपाटीवर आला तर बाकांची रचना घरावरील पत्र्यांच्या धर्तीवर दिसेल. दोन रुळांच्या मधून चार बोटें उंचीच्या पाहिऱ्यांचा एक जिना होता व त्यावरून तिसरें एक चाक फिरत असे. घड्याळाच्या वगैरे यंत्रांत एकाच दिशेनें फिरूं शकणारीं चाकें (Catch wheels) पुष्कळांनीं पाहिलीं असतील तसें हें चाक होतें. त्यामुळें डबा मागें येणें शक्य नव्हतें. लिफ्ट ज्याप्रमाणें चढवतात त्याप्रमाणें जाडी लोखंडी दोरखंडानें ही गाडी चढविली जाते. हें दोरखंड माथ्यावरील एका पुलीवरून परत शेजारीं आणलेलें असतें व त्याला दुसरा डबा जोडलेला असतो. एक डबा उतरतो व दुसरा चढत असतो. त्यामुळें

पॉवर पुष्कळ कमी लागते. गाडीचा वेग कांहीं फार नव्हता. ताशीं १० मैल फार तर असेल. दोन्ही बाजूंस दाट झाडी असून आंत अंधर दिसत होता. वर पोंचल्यावर तेथें काफीगृह होतें व पलीकडे एक बुरूज होता. त्या बुरुजावरून आसमंताद्भागचा देखावा फार मनोरम दिसत असे. बोरघाटांतील रिव्हर्सिंग स्टेशनावरून ज्याप्रमाणें खालचा देखावा दिसतो, तशाच तऱ्हेचा देखावा येथून दिसत होता. ह्याची उंची सुमारें ५॥ शें मीटर म्हणजे १८०० फूट होती. येथील विशेष म्हणजे नखरा नदी नागमोडीं वळणें घेऊन जात होती. तिच्या कांठीं लहान लहान गांवें वसलेलीं आहेत, त्यांची शोभा विशेष दिसत होती. मधून मधून वृक्षांचे पुंजके दिसत होते व नदीकांठीं वेली उगवलेल्या होत्या. त्या पाहून मला पुढील श्लोकार्धांचें स्मरण झालें.

आमञ्जुवञ्जुललतानि च तान्यमूनि ।
नीरन्ध्रनीलनिचुलानि सरित्तटानि ॥

( उ. रा. चरितम् )

येथून रात्रीं आम्हीं Munchen म्युय्नशेन ( इंग्रजांच्या पद्धतीप्रमाणें Munich म्युनिच ) ह्या ठिकाणीं जाण्यास निघालों. नारदानें हें शहर पाहिलें नसल्यामुळें त्यानेंही आमचे बरोबर तेथपर्यंत येण्याचें ठरविलें. रात्रीं १ च्या गाडीनें आम्हीं कूच केलें.

---

## संचार सहावा

# म्युय़्नशेन–जर्मनी

( Munchen )

दुसरे दिवशीं सकाळीं आम्ही बव्हेरियाची राजधानी म्युय़्नशेन (इंग्रज लोकांची वहिवाट ह्या शहराला ' म्युनिच ' म्हणण्याची आहे ) येथें पोंचलें. बव्हेरिया हें एक मोठें संस्थान असून येथील राजकर्त्या पुरुषांनीं युरोपच्या इतिहासांत नांव करून ठेवलेलें आहे. पहिल्या प्रथम म्युय़्नशेनसंबंधानें आम्हांला कांहींच माहिती नव्हती, त्यामुळें बरोबर गाइडबुक घेतलेलें नव्हतें; ह्या कारणानें थोडी अडचण भासली. मग एके ठिकाणीं तेथील देखाव्यांचीं पोस्टकार्डें होतीं त्यांवरून एक प्रोग्राम तयार केला. आधीं नदीकडे जाण्याचा विचार करून ( ईश्वरा–Iser ) नदीच्या कांठचें मॅग्झिमिलिआनियम म्हणून एक ठिकाण होतें तेथील टामरेळींचें तिकिट काढलें. टामरेळींतून उतरल्यावर जवळच नदी आहे त्या नदीपर्यंत पोंचल्याबरोबर आम्हांला फारच आल्हाद झाला. वास्तविक प्रथम आम्हांला दिसली ती नदी नसून नदीचें पाणी एका रुंद कालव्यांतून नेलेलें होतें; व नदी तेथेंच पलीकडे होती, तिच्यांत कांहींच पाणी नव्हतें ह्मटलें तरी चालेल. वयस्य म्हणाला, " सर्व पाणी कालव्याला घेऊन नदीला ' ओल्डेज पेन्शन ' दिलेलें दिसतें आहे ! " पण मुख्य आल्हाद होण्याचें कारण म्हणजे पाण्याचा रंग व वेग हीं होत. रंग मोरचुदाप्रमाणें निळसर हिरवा असून पाणी ( पर्वतीच्या पाहिऱ्यांप्रमाणें ) उतरत्या खडकावरून सोडलेलें असल्यामुळें मधून मधून चिमुकले धबधबे ( वयस्य म्हणाला धबधब्यांचीं पिलें ) झालेले होते. उतार पुष्कळ दिलेला असल्यामुळें पाण्याला वेगही खूप होता. कडेनें अरुंदशी बाग असून तटाच्या माथ्यावरच पदपथ होता व पाण्याची मौज

पाहण्यासाठीं तटांतून पुढें गेलेल्या अर्धचंद्राकृति जागा होत्या. प्रत्येक ठिकाणीं उभें राहून पाणी पाहण्याचा मोह पडत होता. थोडथोड्या अंतरा-वरून पलीकडे जाण्यास पूल होते; त्यांपैकीं कांहीं भक्कम होते व कांहीं लाकडी होते. अशा एका पुलावरून पलीकडे जात असतां वयस्य म्हणाला ' बिरबल, नदीचें पाणी हिरवें निळें कशामुळें दिसत आहे ? '

बिरबलः—हुजूर, नद्या म्हणजे देशाच्या रक्तवाहिन्या होत. ह्या रक्तवाहिनीला धरणाच्या रूपानें चिमटा घेतल्यामुळें येथील जलरक्त हिरवेंनिळें झालें आहे !

वयस्यः—शाबास ! खजिनदाराला सांगून त्याच्याकडून सतरा लक्ष मोहरा बक्षिस मागून घे !

पुढें स्नानगृह लागलें. तेथें सर्वांनीं स्नान करण्याचा विचार केला; पण नारदाला तो विचार पटेना. तो म्हणाला ' स्नान करूं नये असें भर्तृ-हरीनें सांगितलें आहे. '

वयस्यः—मीं भर्तृहरीचीं शतकें वाचलीं आहेत; पण त्यांत ' हैजीन ' वर अशा तऱ्हेचा श्लोक कोठें दिसला नाहीं. त्यांतून तुझा एखादा नवीन भर्तृहरी असला तर सांगवत नाहीं !

नारदः–नवीन नाहीं; तुझ्याच भर्तृहरीनें स्पष्ट सांगितलें आहे कीं, 'न स्नानं न विलेपनंच ।' इतकेंच नाहीं तर पुढें सांगितलें आहे ' वाणी एका समलं करोति पुरुषम् । ' म्हणून कांहीं वाणी लोकांना स्नानाचें एवढें संकट वाटतें; कारण स्नान केल्यानें मनुष्य ' समलं ' राहणार नाहीं !

मीः–(वर डोळे लावून) तो पहा ! तो पहा ! भर्तृहरी ! इतके दिवस तो पिशाच्चयोनींत अडकून राहिलेला होता, तो आतां मुक्त होऊन वर चालला आहे !

नारदाची समजूत घालून त्याला स्नानगृहांत घेऊन गेलों. आंत गेल्यावर रक्षकानें तिकिटें पाहून माडीवर नेलें व एक एकाला एक एक खोली दाखवून दिली. बाहेरच्या बाजूनें खोलींत शिरून आंत गेल्यावर दार लावून त्याच्या-पुढें उभी असलेली एक फळी पाडली म्हणजे दारास अडसरही होतो व बसा-यला बांकही होतें. समोरचा पडदा सारून बाहेर पडलें म्हणजे सज्जावर मनुष्य जातें. त्या सज्जावरून पाहिलें असतां स्नानाचा हौद दिसतो. मी स्नानाचे कपडे घालून बाहेर पडतों आहें तेवढ्यांत वयस्य बाहेर आलेला होता; तो हौदाकडे पहात कठड्यापाशीं उभा होता. त्याचे डोळे कासवाच्या पाठीसारखे झाले असून तोंड खोबऱ्याच्या वाटीसारखें झालें होतें. मला जवळ आलेला पाहून तो म्हणाला 'अहाहा ! काय हा रम्य देखावा आहे ! इतका रम्य देखावा दुसरे कोठें पहाण्यास सांपडेल असें वाटत नाहीं.' नारद हौदाकडे पाहून म्हणाला 'मी जर आंत आलों नसतों तर मोठी चूक केली असती. आतां सत्यलोकीं जाईन त्या वेळीं सावित्री मातोश्रीला सांगायला होईल कीं, तुमच्या वैडूर्यमणिखचित पुष्करिणीपेक्षांही सुंदर जलाशय भूलोकावर म्युल्नशेन येथें आहे.' बिरबल आपल्या दाढीवरून हात फिरवीत म्हणाला 'वुह्वॉ वुह्वॉ ! ! हा हौद परिस्तानांतून येथें आणलेला दिसतो. पऱ्या मात्र बादशहांच्या सेवेला गुंतल्यामुळें इकडे आलेल्या दिसत नाहींत !' ह्या हौदाकडे पाहून क्षणभर मन थक्क झाल्याशिवाय रहात नाहीं. हा हौद बाबुलनाथाच्या पुढील सभामंडपाएवढा असून भोंवतालीं दोन मजले कपडे ठेवावयाच्या खोल्या होत्या. हौद पांढऱ्या व निळ्या ग्लेझ्ड टाइल्सनीं (गुळगुळीत चिनी मातीच्या विटांनीं ) बांधलेला असून आंतमधीलच्या विटा नकशीदार बसविलेल्या होत्या; हौदाचा तळ उतरता असून गुडघ्याइतक्या पाण्यापासून तो उडी टाकतां येण्याइतक्या पाण्यापर्यंत त्याची खोली होती. सुमारें एक तृतीयांश हौद पोहतां न येणाऱ्या माणसासही आंत विहरतां येण्यासारखा असून

त्याची मर्यादा म्हणून एक दांडी पाण्याच्या वर वीत दीड वीत लावलेली होती; पोहणाऱ्या लोकांनीं तिच्या खालून पलीकडे जावें. हौदांत उतरण्याचे सुरुवातीस एका गायमुखांतून नदीचें पाणी पडत होतें, व जवळच धारास्नानाचें कारजें होतें. पाण्यांत पोहणाऱ्या लोकांचीं गोरीं गोरीं अंगें सर्व स्पष्ट दिसत होतीं. पोहणारांची लीला व पाणी हलल्यामुळें हलल्यासारखी दिसणारी तळाची नक्षी ह्यांचा मेंदूच्या कौतुकीय भागावर विलक्षण परिणाम होत होता. हौदाबाहेर कांहीं संगमरवरी दगडाच्या बैठकी असून त्यांच्यापुढें पाण्याच्या दोण्या होत्या व त्यांत पाण्याचे नळ होते. तेथें बसून कांहीं लोक स्नान करीत होते, व बाजूस धारास्नान–कारंजीं होतीं तेथें कांहीं लोक स्नान करीत होते. स्नानासाठीं धांवतच वयस्य खालीं गेला व हौदांत उतरणार तों एकानें त्याला हटकलें व दोण्या होत्या तिकडे बोट दाखविलें. वयस्य दचकला ! त्याला वाटलें कीं ‘ तिकिटें हौदाच्या स्नानाचीं नसून दोणींतल्या स्नानाचीं आहेत ’ असें तो म्हणतो आहे. आम्हीं स्विमिंगबाथ म्हणजे पोहण्याचीं तिकिटें काढलीं होतीं; म्हणून वयस्यानें हौदाकडे बोट दाखवून खुणेनें विचारलें कीं हौदांत स्नान करायचें नाहीं काय ? रक्षकानें दोणीकडे व कारंजाकडे बोट दाखवून मग हौदाकडे बोट दाखविलें. त्यावरून समजलें कीं, आधीं इकडे आंग धुवून मग हौदांत उतरणें. नंतर इतर लोक काय करीत होते त्याचा विचार करितां दिसून आलें कीं, आधीं हात व पाय त्या दोणींतील नळाखालीं धुवायचे, मग कारंजाखालीं जाऊन सर्व आंग धुवावयाचें व मग हौदांत शिरावयाचें. अशा रीतीनें सर्व अंग साबूनें स्वच्छ धुवून हौदांत शिरलों. तेथें अशी एक तजवीज दिसून आली कीं, हौदाच्या लांबीभर उंचावरून एक दांडी लाविलेली होती. तिच्यावर सरकत्या कडया होत्या, त्यांस बांधून एक

दोरी पाण्याच्या पृष्ठभागापर्यंत सोडलेली होती. तिला धरून किंवा कमरेस बांधून नवशिके पोहण्यास शिकत.

स्नानविधि आटपल्यावर जवळच मॅक्झिमिलिआनियम म्हणून ठिकाण आहे तिकडे निघालों. सदरहू जागा एका उंचवट्यावर असून त्यावर एक विशाल चौकोनी इमारत बांधली आहे. ह्या इमारतीचा पायाच आर्धा पुष्कळ उंच असून मजलेही उंच आहेत. बाहेरून सज्जा असून त्याला कमानी आहेत. इमारत फार भव्य असून उंचवट्यावर प्रामुख्यानें बांधली असल्यानें फारच उठून दिसते. ह्या इमारतींत चित्रें आहेत, व ही बुधवारीं १० ते १२ पर्यंत फुकट उघडी असते. सदरील इमारत पाहतां पाहतां वयस्याच्या डोळ्यांत अश्रुधारा उभ्या राहिल्या. कारण विचारतां तो म्हणाला " मला पर्वतीच्या गतवैभवाची आठवण झाली. पर्वतीच्या वाड्याच्या ज्या अवशिष्ट भिंती उभ्या आहेत, त्यांवरून ज्या वेळीं आपलें राष्ट्र वैभवसंपन्न होतें व शिंदे-होळकर-पटवर्धन इत्यादि वीरपुरुषांच्या लवाजम्यांनीं व वस्त्रालंकारभूषित पौरजनांनीं पर्वतीची टेंकडी ज्या वेळेस गजबजून जात असेल त्या वेळीं तिचा देखावा कसा दिसत असेल, ह्याची कल्पना माझे डोळ्यापुढें उभी राहिली. "

आंत प्रवेश केल्यावर पहिल्या थोरल्या जिन्याचे पायथ्याशीं छत्र्या रक्षकाचे हवालीं करून आम्ही वर गेलों. जिन्याच्या भिंतीवरच तीन चित्रें लाविलेलीं असून आंतील दालनांतही बरींच लाविलेलीं आहेत. बहुतेक चित्रें आकारानें मोठीं असून त्यावर उजेड पडण्याचीही व्यवस्था चांगली केली आहे. चित्रांची लांबीरुंदी १०×८ फूट किंवा जास्तच असेल, त्यामुळें भव्य ऐतिहासिक प्रसंग रेखाटण्याला त्यांत अवकाश चांगला सांपडतो. ह्या चित्रांपैकीं कांहींचे मथळे पुढीलप्रमाणें:—

१. बव्हेरियाचा राजा व पोलंडचा जॉन सोबिएस्की यांनीं तुर्कांचा बादशहा कारा मुस्ताफा यास व्हिएन्ना येथून मागें हटविलें. २. महंमदाचा मकेंत

प्रवेश. ३. इजिप्तमधील ‘ पिरामिड ’ मनोरे बांधले जात आहेत. ४. बाबिलो-नचा राजा बाल्थाझार व भविष्यवादी दानिएल. ५. सलामिसची लढाई ( ग्रीक व इराणी ) ६. ऑलिंपसवरील जोव्ह. ७. आलेक्झांडर दि ग्रेटचें इराणच्या शहाजादीशीं लग्न. ८. सिपिओ आफ्रिकानसची कार्थेजवरील स्वारी. ९. ऑग-स्टस बादशहाच्या वेळचें रोमचें वैभव. १०. शार्लमेन बादशहाच्या वकिलांचें खलीफ हरून अल्‌रशीद याच्या दरबारीं आगमन. ११. शार्लमेनचें राज्या-रोहण. १२. डाएट आफ वर्म्सपुढें लूथर आला आहे. १३. आर्मांडाचे वेळीं इलिझाबेथ राणी आरमार पाहात आहे. १४. पीटर दी ग्रेट हा सेंट पीटर्सब-र्गची स्थापना करीत आहे. १५. चौदावा लुई ( फ्रान्सचा ) हा परराष्ट्रीय वकि-लांचा सत्कार करीत आहे. १६. इंग्रजांचा सेनापति कॉर्नवालिस हा वॉशिंग्ट-नला शरण आला आहे. १७. लैप्झिगची लढाई ( नेपोलियनचा पराभव ).

चित्रें पाहून झाल्यावर वयस्य विचारतो, “ कांहो ! यांत अकबर, शहा-जहान किंवा चंगिझखान, तैमूरलंग यांचीं चित्रें कोठें दिसत नाहींत ? ”

मीः–अहो कुठले घेऊन बसलांत तुमचे खेडवळ अकबर आणखी चेंगिझखान ! त्यांनीं युरोपांत स्वारी करून आपला पराभव करून घेतला असता तर त्यांना येथें स्थान मिळालें असतें.

वयस्यः–इंग्रजी साम्राज्यास भूषणभूत अशा लंडन शहराच्या नॅशनल गॅलरींतसुद्धां हिंदी कारागिरीचें एकही चित्र नाहीं, आणि जुन्या इटालियन कारागिरांचीं भिकार चित्रेंसुद्धां शेंकडों पौंड खर्चून विकत घेऊन तेथें लाव-ण्यांत येतात. आपल्या देशांत कांहीं उत्तम चित्रें नाहींत कीं काय ? पण सर-कारी रीतीनें त्यांचा संग्रह करण्याचें कोणी मनांतसुद्धां आणल्याचें मला ठाऊक नाहीं. नॅशनल गॅलरींतील कांहीं रद्दी चित्रांपेक्षां आपलेकडे किती तरी चांगलीं चित्रें असतील.

मीः–‘गुंडो म्हणे सद्दी । तया मिळे गद्दी । इतर ते रद्दी । कलियुगीं ॥’

बिरबलः–तुमचीं चित्रें म्हणजे सगळ्या बायकांचीं पावलें उघडीं असा-यचीं ! असलीं अश्लील चित्रें तेथें ठेवून कसें चालेल ?

वयस्यः–अरे, तेथें सताड नागव्या स्त्रीपुरुषांचीं चित्रें व पुतळे आहेत कीं ?

बिरबलः–तीं केवळ शरीरसौष्टवप्रदर्शनार्थ ठेवलेलीं आहेत.

वयस्यः–तेथें मी एक ' मदिरादेवतेचा उत्सव ' म्हणूनच चित्र पाहिलें आहे, त्यांत स्त्री--पुरुष दारूनें धुंद होऊन वस्त्रांचें भान विसरले आहेत व वाटेल तो वाटेल तिला मिठी मारतो आहे, असें दाखविलें आहे.

बिरबलः—दारूनें रंग कसा चढतो तें दाखविलें आहे !

वयस्यः—मग अत्यंत अनीतीचे प्रकार दाखविणारीं पण सुंदर चित्रें कां ठेवीत नाहींत ?

मीः—पण दारू पिणें ह्याला इकडे अनीति समजतच नाहींत !

वयस्यः–वः ! दारू तर सर्व अनर्थांचें मूळ आहे. कां बिरबल! काय तुझा अनुभव आहे ?

बिरबलः–एकदां असें झालें कीं, माझ्याविरुद्ध असलेल्या मंडळींनीं बादशहांच्या मुख्य मुदपाक्याशीं संधान बांधलें. एक दिवस स्वयंपाकावर अकबर बादशहा खुष झाले असें पाहून मुदपाक्यानें हात जोडून बादशहांना विनंति केली " हुजूर ! असल्या सुग्रास अन्नाची ज्याला रुचि नाहीं, त्या बिरबल काफराला आपण मुख्य प्रधानाची जागा दिली आहे व नबाब घाबरजंग ( राजशालक संस्थानिक ) इतके दिलदार गृहस्थ आहेत पण त्यांना नुसतें माशा मारीत बसावें लागत आहे. " मुदपाकनवीसाचें हें म्हणणें बादशहांना पटलें व बादशहा मला म्हणाले " बिरबल, तूं अगदीं अरसिक मनुष्य आहेस, करितां तुला दरबार बंद ! " त्याबरोबर मी जो तेथून निघालों तो गुप्तपणें भांबुरड्यास जाऊन राहिलों. पुढें कांहीं दिवसांनीं

रूसप्रूसच्या बादशहानें आमच्या मुलखावर स्वारी करण्याचा विचार केला. पण ह्या राज्यांत कोणी शहाणे आहेत कीं नाहींत हें आधीं पहाण्याचा विचार करून, अकबर बादशहांकडे निरोप पाठविला कीं, पुढील वस्तु तीन महिन्यांचे आंत पाठवून द्याव्या, नाहीं तर युद्धास उभें रहावें ! त्या वस्तु अशा " शहाण्याचें वेडेपण; वेडयाचें शहाणपण; तरण्याचें म्हातारपण; म्हाताऱ्याचें तरुणपण; नशीबवानाचें कमनशीब व कमनशीब्याचें नशीब. " दरबारांत कोणास उत्तर सुचेना; बादशहा म्हणाले ' ह्या वेळीं बिरबलाशिवाय दुसरा कोणी उपयोगी पडणार नाहीं.' मग त्यांनीं प्रत्येक गांवच्या पाटलास हुकूम पाठविला कीं " मेलेल्या माणसाबरोबर पांढरा अंधेर आठ दिवसांचे आंत पाठवावा; नाहीं तर देहांत शिक्षा मिळेल. त्या माणसाबरोबर दुसरें कोणी असतां कामा नये." संध्याकाळीं भांबुरडयाच्या पाटलावर आलेलें संकट पाहून सर्व गांव हळहळला. तेव्हां मीं म्हटलें, मी बादशहाकडे जाऊन प्रयत्न करून पाहतों. मग मी बादशहापुढें जाऊन म्हणालों ' भांबुरडयाचे पाटील यांनीं आपणांस पांढरा अंधेर पाठविला आहे, ' असें म्हणून एक गुळगुळीत तुटका रुपया त्यांचे पुढें ठेवला. ते म्हणाले 'हा पांढरा अंधेर कसा ?' मी म्हणालों 'आपल्या राज्यांतील सर्व नाणीं खराब झाल्यामुळें, परदेशांशीं असणाऱ्या व्यापारास धक्का बसत आहे, हें कोणाच्या लक्षांत येत नाहीं, तेव्हां हा अंधेर नाहीं तर काय ?' बादशहा म्हणाले 'पण तो मेलेल्या माणसाबरोबर कोठें आला ?' मी म्हणालों 'ज्यावर बादशहांची खप्पा मर्जी झाली तो मनुष्य जिवंत असून मेल्यासारखाच आहे.' बादशहांनीं मला ओळखून रूसप्रूसच्या बादशहास उत्तर लिहिण्यास सांगितलें. मग मी एक कडक दारूची बाटली व एक शुद्ध पाण्याची बाटली अशा दोन बाटल्या भरून रूसप्रूसच्या बादशहाकडे पाठविल्या व निरोप पाठविला कीं, " एका बाटलींत ' शहाण्याचें वेडेपण, तरण्याचें म्हातारपण व नशीबवानाचें कमनशीब ' पाठविलें आहे; व दुसरींत 'वेडयाचें

शहाणपण, म्हाताऱ्याचें तरुणपण व कमनशीब्याचें नशीब ' पाठविलें आहे. सदरहू वस्तूंची किंमत दहा कोट रुपये ताबडतोब पाठवून द्यावी, नाहीं तर युद्धास उभें रहावें ! " उलट टपालानें स्पेसी बँकेवर दहा कोटांचा चेक रूस-प्रूसच्या बादशहानें पाठवून दिला ! ( वयस्य पुटपुटला ' मंगलोर चेक होता कीं सोलापुर चेक होता कोणास ठाऊक !' )

नारदः–मला वाटलें दुसऱ्या बाटलींत 'अनंगधिंगाणा गुटिका' होत्या !

मीः–परदेशच्या व्यापारावरून मला आठवण झाली. मुनिमहाराज ! स्वदेशी तत्वासंबंधानें वेदशास्त्रांत कोठें कांहीं सांगितलें आहे काय ?

नारदः– हो हो ! वेदांतच सांगितलें आहे व त्यासंबंधानें शिक्षाही सांगितली आहे. तुमच्या संध्येंत मार्जनमंत्राचे वेळीं सांगितलें आहे ' यो वः शिवत मोरसः तस्य भाजयते हनः ' म्हणजे जो जो मोरस साखरेला शिवतो त्याची हनवटी भाजण्यांत येते !

हें ऐकून वयस्य खो खो हंसूं लागला. नारद म्हणाला 'कां, तुला खोटें वाटतें कीं काय ? '

वयस्यः–छे छे ! आपण सांगितलेलें खोटें कसें वाटेल ? हा आधार पाहून मला आनंद झाला म्हणून हंसलों !

नारदः–मग हरकत नाहीं. तरी पण एवढ्या मोठ्यानें एकदम हंसूं नये ! हंसावें कसें हें तुला सांगतों, श्रवण कर.

' प्रथमं वक्रतुंडं च ' प्रथम थोडें तोंड वांकडें करावें, 'एकदंतं द्वितीयकं' मग एखादा दांत दिसूं लागावा, 'तृतीयं कृष्णपिंगाक्षं' मग डोळे जरा काळे पिंवळे व्हावे, 'चतुर्थं गजवक्त्रकं' मग नाक लांब लांब करून तोंड वासावें, 'लंबोदरं पंचमं च ' मग पोट फुगेपर्यंत हंसावें, ' षष्ठं विकटमेव च ' मग हात-पाय पसरून धरणीवर उताणें पडावें; हा पुराणोक्त मार्ग आहे. नाहीं तर तूं! लागलास एकदम मोठ्यानें हंसायला !!

मॅग्झिमिलिआनियम पाहिल्यानंतर आम्ही तेथून निघालों ते स्टेशन-जवळ परत आलों व पोटभर जेवण घेतलें. त्यानंतर जवळच एक बाग दिसली तेथें शिरून जरा विश्रांतिसाठीं म्हणून सावलींत दोन बाकें होतीं तेथें जाऊन बसलों. मी वयस्याला म्हणालों 'वयस्या, अजून आपणांस किती तरी गोष्टी पहाणें आहेत; तेव्हां राणी निद्रावतीच्या दरबारांत शिरूं नकोस!' वयस्य म्हणाला 'तें नाहीं जमायचें! कालचें सबंध रात्रीचें जाग्रण असून तीन चार दिवस मनाजोगती झोंप नाहीं. तेव्हां तेवढी गोष्ट बोलूं नकोस! राणीच्या शिपायांनीं पायांतच नव्हे तर डोळ्यांवर व सर्व अंगावर शृंखला घातल्या आहेत, आणि तुझ्यावरही पकडसमान सुटल्यासारखें दिसत आहे. तर आतां मुकाट्यानें निद्रावतीला शरण जाऊं या! म्हणजे थोडक्यांत मुक्तता झाली तर झाली. क्यौं बिरबल! तुझें काय म्हणणें आहे?"

बिरबलः—(डोळे मिटून बांकाच्या पाठीवर डोकें टेंकून) जी हुजूर, आपली वर्दी द्यायला मी आधींच पुढें गेलों आहें.

वयस्यः—काय, मुनिमहाराज, झोंप घेण्यांत कांहीं वावगें आहे काय?

नारदः—भलतेंच! श्रीमहाविष्णु क्षीरसागरांत नेहमीं निजलेलेच असतात.

मग आम्हीं तेथेंच बांकावर मान टेंकून बरीचशी झोंप ताणली. प्रथम बिरबल जागा झाला व त्यानें इतरांना हलविलें. वयस्य म्हणाला 'माझें अंग कसें अगदीं जड झालें आहे!' मी म्हणालों 'माझी सुद्धां अगदीं अपल्या जांगिळमामासारखी* अवस्था झाली आहे.' बिरबलनें विचारलें 'हे जांगिळ-मामा कोण?' मीं म्हटलें 'आमचे हे एक लंगोटीयार इकडे फॉरेस्ट्री शिकयाला आलेले आहेत. त्यांचें प्रस्थ जरा बरेंच मोठें आहे.' वयस्य म्हणाला 'त्यांचेंवर्णन

---

* जांगिळमामांचें व्यक्तिवैशिष्ट्य निवळ काल्पनिक आहे. वत्सलाहरणाचे वेळीं घटोत्कचाचे परिवारांत जांगिळमामा होते त्यांचेकडून फक्त नांव घेतलें आहे.

हवें असल्यास संगीत वीरबाळ्या* •नाटकांतील एक पद त्यांना बरोबर लागूं पडतें, तें असें:—

" आशि ही वजनखनि मूर्ती त्रिभुवनीं ।
जगिं या दिसोनी न येईल कुणिं ॥ खनि ॥ धृ० ॥
शरच्चंद्र अति निर्मल जैसे शोभवि तारागार ।
विपुल देहीं स्थूल आत्मा, तेंवि करित सुविहार ॥
निरखोनी त्वरा ही, जराही, न राहीच पाही ॥ १ ॥ "

तेथून मग आम्हीं निघालें ते होफगार्टनमध्यें गेलों. हें एक उद्यान आहे व त्याच्या भोंवतालीं दोन बाजूंनीं पडव्यांप्रमाणें जागा बांधलेली आहे• तिच्या भिंतीवर चांगलीं चांगलीं चित्रें काढलेलीं आहेत. पण तीं आतां फिकट झाल्यामुळें त्यांची शोभा राहिली नव्हती. तिसऱ्या बाजूस राजवाडा असून चौथ्या बाजूस म्यूझियम होता. राजवाड्याच्या आंत जाण्यास सोय नव्हती, पण बाहेरून मोठी थोरली इमारत दिसत होती. मात्र तिची शोभा तिच्या सौंदर्यापेक्षां विस्तारांतच जास्त होती. म्यूझियमकडे पाहून मात्र मनाला आल्हाद होत होता. एक सौधपरंपरा उतरून खालीं गेलें असतां एक उद्यान लागे व त्याच्या पलीकडल्या बाजूस पुनः एक सौधपरंपरा चढून गेलें ह्मणजे म्यूझियमची इमारत लागे. तेथील एका सौधावर मधून मधून तोफा ठेवलेल्या होत्या. आम्हीं म्यूझियमचे आंत जाण्याचा विचार केला व

* संगीत वीरतनय नाटकांत पुढील प्रमाणें पद आहे:—
अशिही सुगुणखनि देई त्यजोनि । जगिं या दिसोन न येईच
कुणि ॥ धृ० ॥
शरच्चंद्र अतिनिर्मल जैसें शोभवि तारागार ।
विमलदेहीं शुद्ध आत्मा तेंवि करित सुविहार ॥
निरखोनि । विदेही । मुनींही मतीहीन होई ॥ १ ॥

तिकिट काढावयास गेलों; तेव्हां तेथील द्वारपाळानें सांगितलें कीं, आतां फक्त पाव तासच हा उघडा राहील; तरी उद्यां या, म्हणजे स्वस्थपणानें पाहण्यास सांपडेल. आम्ही त्याचे मनापासून आभार मानले; कारण नाहीं तर ब्रुसेल्सच्या म्यूझीवीअर्झसारखा नमुना व्हावयाचा.

तेथून आम्ही निघालों ते एक राष्ट्रीय स्तंभ म्हणून होता तो पाहण्यास गेलों. सदरहू स्तंभ नदीपलीकडे एका लहानशा उद्यानांत एका चबुतऱ्यावर आहे. स्तंभाच्या माथ्यावर एक पुतळा असून त्यास सोनेरी मुलामा आहे. सदरहू स्तंभ पुष्कळ लांबून दिसतो व त्याची शोभाही चांगली दिसते. ह्याच्या समोरचा रस्ता रुंद असून त्याच्या बाजूच्या इमारतीही विशाळ होत्या. एकंदरींत आतांपर्यंत पाहिलेल्या शहरांत ह्या शहरांतील इमारतीच आम्हांला विशेष भपकेदार दिसल्या. तेथून कार्यक्रमांतील दुसऱ्या इमारती पहाण्यास निघालों. परंतु दुपारीं काढलेल्या झोपेनें येथें आमची अडचण केली. सर्व इमारती बंद झालेल्या होत्या. फक्त बाहेरून पाहण्याची सोय राहिली होती. टेक्निकल इंस्टिटयूट, पिनाकोठीक वगैरे मोठाल्या इमारती दिसत होत्या, त्यांपैकीं चित्रशाळेची इमारत होती ती तर फारच भव्य दिसत होती. तिच्या माथ्यावरही किती तरी पुतळे उभे केलेले होते. आणखी एक दिवस तरी राहून हें शहर पाहणें जरूर आहे असें आम्हांस वाटलें; परंतु म्युन्शे-नचा एक दिवसच आम्हीं कोरून काढला असल्याकारणानें नाइलाज झाला.

अंधेर पडूं लागल्यावर मग आम्ही भोजनालयांत प्रवेश केला. तेथें बिरबलला त्याच्या ओळखीचा एक मनुष्य भेटला. त्या दोघांचें संभाषण झाल्यावर बिरबलनें जाहीर केलें कीं 'मला तुमच्येबरोबर पुढें येतां येणार नाहीं, कारण मला झुरिकला कांहीं कामासाठीं दुसऱ्या दिवशीं सकाळच्या गाडीनें जाणें भाग आहे.'

ही संकटाची बातमी ऐकून आम्हीं शोकावेगांत मग्न होण्याच्या खट-पटींत होतों; इतक्यांत भोजनालयाची जमीन किंचित् हादरल्यासारखी झाली. इकडल्या बाजूस कधीं कधीं घरणकिंप होतात असें ऐकल्याचें कोणीसें सांगितल्याचें वयस्याला स्मरतेंसें भासत होतेंसें वाटत होतें. इतक्यांत भोजनालयाचें दार हळू हळू उघडतें आहे असा मला भास झाला. एका मिनिटांत दार उघडत उघडत कोणाच्याशा पोटाचा बेंबीजवळचा जाकीट-परिवृत भाग दिसूं लागला. त्यानंतर छाती व मांड्यावरील वस्त्रें दिसूं लागलीं व सरतेशेवटीं चेहरा व बूट दिसूं लागले ! चेहरा पाहिल्याबरोबर वयस्य एकदम ओरडला "कोण, जांगिळमामा !" जांगिळमामांनींही आम्हांला ओळखून ते शक्य तितक्या लवकर आमचे जवळ आले. बिरबल त्यांच्याकडे लक्ष लावून पहात आहे असें पाहून मी त्यांचा परिचय करून दिला. "बिरबल बम्मन–जांगिळमामा !" नंतर जांगिळमामा वयस्याकडे पाहून म्हणाले "वयस्या, तूं अलीकडे जेवण अगदींच सोडल्यासारखें दिसत आहे ! अरे जेवण सोडून मग जगायचें कशाला ? म्हटलेंच आहे, 'भोजनं दुर्लभं लोके, प्राणा जन्मनि जन्मनि !' तूं इतका रोड कशानें झालास ?"

वयस्यः—काय करावें ! जेवण्याजोगे पदार्थ मला म्युनिशेनमध्यें सांपडतच नाहींत !

जांगिळमामाः— शिल्लक न उरल्यामुळें सांपडत नसतील. असो; बरें झालें आतां भेटलांत म्हणून, नाहीं तर गांठ पडली नसती. कारण मी आज रात्रीं व्हिएन्नाला जाणार आहें.

मीः—मग आम्हीही आजच व्हिएन्नाला जाणार आहोंत, व तेथून व्हेनिसला.

जांगि०:—अरे वाः ! मलाही पुढें व्हेनिसलाच जायचें आहे ! देवाला मागितले एक परातभर लाडू व देवानें दिले दोन पराती, तशांतलाच हा प्रकार झाला !

रात्रीं बिरबलचा निरोप घेतांना वयस्याला फार अवघड वाटलें. वयस्य म्हणाला 'बिरबल ! आतां तुझ्यावांचून आमचें कसेंरे होईल ! जर इराण-तुराणच्या बादशहानें निरोप पाठविला कीं 'बिनशेंपटीचें चतुष्पाद पाठवून द्या, नाहींतर युद्धाला तयार व्हा' तर मग आमची गाळणच होईल !

बिरबलः—त्यांत काय कठीण आहे ? एखादी खुर्ची, नाहींतर टेबल, नाहींतर निदान बाळंतिणीचें खाटलें पाठवून दे, आणखी कळव कीं किंमत अमुक लाख मोहरा पाठवून द्या, नाहीं तर युद्धास तयार व्हा ! हें पहा, उत्तरांत कांहीं कठीण नाहीं. सगळी बिरबली कशांत आहे तें सांगतों—दुसऱ्या कोणीं आपल्यास धमकी दाखविली म्हणजे आपण सवाई धमकी दाखवावी, म्हणजे त्याला वाटतें कीं राक्षसाला ' बडा राक्षस ' कोणी तरी आहेरे आहे ! बरें आहे ! तर येतों आतां ! !

रात्रीं आम्ही येथून निघालें तों थेट व्हिएन्नाचा मार्ग धरला.

---

## संचार सातवा

# विएन Wien ( आस्त्रिया )

( इंग्रजी उच्चार व्हिएन्ना )

बिरबल बम्मनचा मोठ्या कष्टानें निरोप घेऊन आम्ही मुय्नशेन येथील आगगाडींत रात्रीं नऊ वाजतां बसलों. आगगाडींत विशेष गर्दी नव्हती. एक रिकामा कंपाट पाहून तेथील एका बांकावर जांगिळमामांनीं आपला देह मांडला. त्या बांकाच्या टोंकाला नारदमुनि टेंकले व आम्हीं दोघांनीं समोरचें

बांक मंडित केलें. असा आत्मघातकीपणा मुनिमहाराजांनीं कां केला असावा ह्याचें आम्हांस प्रथम आश्चर्य वाटलें; पण पुढें त्याचें कारण कळलें. तें असें कीं, बांकें जरी रुंद होतीं तरी त्यांच्यावर जांगिळमामांस निजतां येण्याइतकीं तीं रुंद नव्हतीं; त्यामुळें जांगिळमामा बसूनच राहिले व त्यांच्यामुळें दोन माणसांची जागा अडली. बाकीची सर्व जागा नारदास मिळून मामांची मांडीही उशाला मिळाली ! अशा रीतीनें लादलेली गाडी २।३ तास चालली, पण पुढें आम्हांस उतरावें लागलें. जर्मनीची सरहद्द संपून आस्त्रियाची लागते, त्या ठिकाणापर्यंत ही गाडी जाऊन पुढें आम्हांस वाहून नेण्याचें काम तिनें आस्त्रियन लोकांकडे दिलें. ह्या ठिकाणीं (स्ट्रासबर्ग येथें) कस्टमची तपासणी झाली. नेहमींप्रमाणें एकदां नजर टाकून तपासकानें आम्हांस सोडलें, परंतु जांगिळमामांकडे एक मिनिटभर त्यानें पाहिलें. त्याला वाटलें कीं, जकातीलायक माल कांहीं आंत भरला आहे कीं काय ? परंतु सर्व शरीराचें प्रमाण जेव्हां सारखेंच ऐसपैस त्यानें पाहिलें तेव्हां विशेष चिकित्सा न करितां त्यानें त्यांस सोडून दिलें. वयस्य म्हणाला ‘ ह्या आस्त्रियन शिपायांना पोटभर खायला घालीत नाहींत असें दिसतें. कसा गिधाडाप्रमाणें तुझ्याकडे पहात होता ! जणु काय तो महिनाभर उपाशीं आहे ! ’ बॅग नेतां नेतां धापा टाकीत जांगिळमामा म्हणाले ‘ नाहीं रे वयस्या, ह्या यूरोपांत उपाशी लोक फारसे तुला दिसावयाचे नाहींत. येथें आल्यापासून एकाचीसुद्धां मला दृष्ट लागली नाहीं ! हिंदुस्थानांत गेल्यावर इतकें ऐश्वर्य कोण पचूं देतो ! ! ’

सकाळीं ८ वाजण्याचे सुमारास गाडी व्हिएन्नास पोंचली. वाटेंत घाटांतून आमची गाडी गेली त्यावेळीं थोडीशी थंडी वाजत होती व धुकेंहि पडलें होतें. व्हिएन्ना शहरांतसुद्धां थोडीशी धुकाळ हवा होती त्यामुळें आमच्या पाहण्यांत कांहीं व्यत्यय येईल कीं काय असें वाटलें; परंतु थोड्याच वेळांत तें धुकें गेलें व पुनः त्यानें त्रास दिला नाहीं. पुढचा प्रोग्राम काय करावा ह्या विचाराला लागलों

तों मामा म्हणाले ‘ अहो विचार कसला करतां ! आधीं एखाद्या कफेमध्यें जाऊन ब्रेकफस्ट घ्या ! तुमचीं का पोटें आहेत का बोळकीं आहेत ?’ मीं म्हटलें ‘बोळकीं नाहींत, पण रांजण मात्र नाहींत.’ मग आम्ही एक कफे गांठली व ब्रेकफस्टला सुरवात केली. काफीचे पेले ठेवून ब्रोट (म्हणजे ब्रेड–पावाचे गोळे ) ची मोठी परडी ठेवली होती. मामा म्हणाले ‘ तुम्ही आपली ब्रोट वेगळी मागवा, पुनः पुनः मागविण्याच्या भानगडींत मी पडत नाहीं. एवढ्या परडींत मी काम भागवितों. दिवाळींतील नळयांत दारू भरतात त्याप्रमाणें मामांनीं पोट ठेंचून भरल्यावर आम्ही निघालों व आधीं स्टेफन्स प्लाट्झमधील ठामसकुकाच्या दुकानांत जायचें ठरलें. आम्हीं वेस्टबान ह्या स्टेशनांत उतरलों होतों. एकाला विचारलें ‘स्टेफन्स प्लाट्झ’. त्यानें एकीकडे बोट दाखवून डावीकडे वळावयास सांगितलें. आम्हांस वाटलें जवळ आहे, म्हणून आम्ही पायींच निघालों. पुढें ज्याला विचारावें तो प्रत्येक जण डावीकडे किंवा उजवीकडे वळावयास सांगे, पण वळणें संपेनात ! मामा म्हणाले ‘ मी ब्रेड अगदींच थोडी खाल्ली आहे ! ’ मग असेंच मामांना धीर देत देत आमचें लटांबर ठामसकुकाच्या आफिसांत तर पोंचलें. तेथें एक व्हिएन्ना शहराचें इंग्रजी गाइडबुक घेऊन व इतर काय माहिती विचारणें ती विचारून आम्ही वसतिस्थानाच्या चौकशीला निघालों. ह्यावेळीं ११ वाजण्याचा सुमार झालेला होता. दोन चार हॉटेलांत चौकशी केली पण भाडें फार महाग ! शेवटीं विचार करण्याकरितां रस्त्याच्या कडेच्या एका बांकावर बैठक भरविली. ठामसकुकाकडे नवीन घेतलेलें पुस्तक उघडलें त्यांत उतरण्यास लायक अशीं बरींच हॉटेलांचीं व ‘ पॉंसिऑं ’ चीं नांवें दिलीं होतीं. ( पॉंसिऑं Pension हा फ्रेंच शब्द असून हॉटेलपेक्षां कमी दर्जाच्या व जेथें एकाहून जास्त इसम एका खोलींत राहूं शकतील अशा तऱ्हेच्या वसतिस्थानास हें नांव आहे. ) लिएच्टनस्टैनस्ट्रासेमध्यें दोन तीन पॉंसिऑं होते. तिकडे जाण्याचा आम्ही विचार केला.

सदरहू रस्त्याचें नांव टामरेळवाल्याला विचारीत असतां माझा तर ‘ कारे राळे गोळे राळे ’ पैकींच प्रकार झाला. पण तो शब्द बाकींच्या तिघांनीं उच्चारून दाखवितांना जे अनेक प्रकार झाले त्यांवरून कांहीं बोध होऊन त्या टामरेळवाल्यानें आम्हांला एक टामरेळ दाखवून दिली. कंडक्टरानें एका ठिकाणीं उतरून दिल्यावर आम्ही गाईडमध्यें दिलेल्या एका पॅंसिऑंचा शोध करूं लागलों. तो कांहीं लवकर सांपडेना. पण दुसरा एक तेथेंच दिसला व तोही यादींत दिलेला दिसल्यावरून आम्ही तेथेंच चौकशी केली व दर माफक भासल्यावरून तळही तेथेंच दिला. स्नानाची व्यवस्था लागल्यावर मग वयस्य म्हणाला ‘ आपण आतां जरा विश्रांति घेऊं. ’ असें म्हणून तो कोचावर पडला. त्याबरोबर जांगिळमामा उसळून म्हणतात ‘ अहो ! मी जिवंत रहावें अशी तुमची इच्छा आहे कीं नाहीं ! ’ वयस्य म्हणाला ‘ आस्त्रियांतील कोल्ह्याकुत्र्यांची धन व्हावी अशी आमची खास इच्छा नाहीं ! ’ जांगिळमामा काकुळतीनें म्हणाले ‘मग माझे प्राण अगदीं कंठाशीं आले आहेत हो ! ’ मग आम्ही जास्त विलंब न लावतां जवळच्याच रेस्टॉरन्टमध्यें गेलों. मामांनीं ७।८ प्रकारचे पदार्थ मागविले. मी म्हटलें ‘ मामा ! हायपरेमिया ऑफ दि प्रेथोरा होईल बरें ! ’ ( हे दोन शब्द डॉक्टर पॅथॉलजे ह्यांच्या तोंडचे मी ऐकले होते ). मामा म्हणाले, ‘ हायपरेमिया झाला तरी हरकत नाहीं. पण ॲनीमिया नको ! कां वयस्या, खरें कीं नाहीं ?’

वयस्यः—मला तुमचा हायोमिया आणखी अनीमिया माहीत नाहीं. पण आमचा गणू चहाश्रमे होता त्यानें शेंडी काढली तेव्हां त्याला आम्ही गनीमिया म्हणत होतों, तो मात्र अगदीं बारीक होता.

मामाः—तोच तो ! आमच्या ॲनीमियाचा सख्खा भाऊ ! तें असो. पण माझें तत्त्व असें आहे कीं पोटाची आबाळ कधीं करूं नये. उमरखय्यमूनें

आपल्या ' रुबय्यत ' मध्यें म्हटलें आहे, ' मातीशीं माती मिळून जाण्यापूर्वी मिळतें आहे तितकें साधून घ्या ! '

मी:— मग त्याला उमरखय्यम् कशाला पाहिजे ? आमचे लंबोदर-भटजी सुद्धा हेंच म्हणत होते.

आम्ही घरीं परत आल्याबरोबर जाग्रणाचा शीण घालविण्यासाठीं बिछाना धरला. मला असें स्वप्न पडलें कीं मी जपानमध्यें गेलों असून जपानच्या बादशहावर कांहीं तरी उपकार केले आहेत, म्हणून बादशहा मला दरबारांत ' कौंट भातोशिता ' ही पदवी अर्पण करीत आहे. इतक्यांत मोठा धरणीकंप झाला व ज्वालामुखीच्या स्फोटाचे सुस्कारे ऐकूं येऊं लागले. बादशहा व सरदार मागच्या दारानें पळाले व मीहि वाट फुटेल तिकडे पळत सुटलों, इतक्यांत समोरून एक रिक्षा आली तिचा धक्का लागून पडलों व त्या दचक्यानें मी जागा झालों तों खरोखरच खोली हादरत होती व सुस्कारे ऐकूं येत होते, याचें कारण जांगिळमामांचें घोरणें होय; हें कळल्यानंतर सुद्धां तासभर माझ्या छातींतील धडकी गेली नाहीं.

झोंपेमुळें अंग जड झालें होतें व संध्याकाळही झाली होती; म्हणून आम्हीं पाय मोकळे करण्यापुरतें हिंडून येण्याचा बेत केला, व त्यांतले त्यांत आम्हीं विकत घेतलेल्या गाइडबुकांतील वनस्पत्याहारी भोजनगृह पहाण्याचें ठरविलें. सद्रहू भोजनगृह डिस्ट्रिक्ट नं. १ मध्यें आहे. व्हिएन्ना शहराचे एकंदर २१ भाग आहेत. त्यांतील मध्यवर्ती व महत्त्वाचा भाग नं. १ हा आहे. ह्या शहरांत ४० हजारांवर वाडे असून २० लाखांपेक्षां जास्त वस्ती आहे. हें शहर ख्रिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकांत वसलें व तेव्हांपासून त्याचीं अनेक स्थित्यंतरें झालीं. महंमदी धर्माचा उदय झाल्यावर त्याचे अनुयायी विजय करीत सर्व बाजूंनीं पसरले. पूर्वेकडे इराणांतून हिंदुस्थान, तार्तरी वगैरे देशांकडे ते वळले; पश्चिमेकडे आफ्रिकेचा उत्तरकिनारा व्यापून ते स्पेन देशांत शिरले

त्याचप्रमाणें उत्तरेकडून त्यांनीं युरोपखंडावर मोर्चा वळविला. रोमच्या बलाढ्य साम्राज्याची कॉन्स्टंटाइन बादशहानें स्थापलेली जी कॉन्स्टँटिनोपल राजधानी तिच्यावर तुर्कांनीं स्वारी करून मोठ्या पराक्रमानें त्यांनीं ती घेतली, व तेथून पुढें पुढें युरोपांत शिरत चालेले ते थेट व्हिएन्नापर्यंत येऊन पोंचले. सुलतान दुसरा सुलेमान ह्यानें व्हिएन्ना शहराला वेढा घातला होता, पण तो उठवून त्याला परत जावें लागलें. १६८३ मध्यें सुलतान कारामुस्ताफा ह्यानें दोन लक्ष लोकांनिशीं व्हिएन्नाला वेढा दिला; परंतु ख्रिस्तधर्मीय नामांकित वीर धांवून आल्यामुळें सुलतानास परत जावें लागलें. त्यानंतर मेरिया थरीसा ही गादीवर बसण्याचे वेळीं युरोपखंडांत मोठी यादवी माजली होती. हिच्या वेळेपासून ह्या शहराची भरभराट होत गेली. मध्यें नेपोलियनच्या ताब्यांत हें शहर गेलें होतें व येथील शयनब्रन लियनच्या राजवाड्यांत तो कांहीं दिवस रहात होता. त्याच्या पराभवानंतर कांहीं दिवस अंदाधुंदी माजली होती. पण बादशहा फ्रान्सिस जोसेफ १८४८ मध्यें गादीवर आले त्यांनीं महत्त्वाच्या सुधारणा करून व्हिएन्ना हें एक मोठें प्रेक्षणीय शहर करून ठेवलें आहे.

संध्याकाळचा चहा घेण्याची वेळ टळून गेल्यामुळें आम्ही एकदम संध्याकाळचें जेवण घेण्याचा विचार केला. चहा मिळाला नसल्याकारणानें सर्वांनाच थोडीबहुत भूक लागली होती. पण मामांनीं तर जेवणावर असा हात मारला कीं पुसूं नका! वयस्य म्हणाला ‘ लहानपणीं मीं एक चुटका पाठ केला होता तो मला खोटा वाटत असे; पण आतां तो अगदीं खरा वाटतो. भीमाला रुक्मिणीनें भाऊबिजेच्या दिवशीं जेवणास बोलाविलें, त्या वेळचें वर्णन ‘ उत्सवप्रकार ’ ग्रंथांत खालीलप्रमाणें केलें आहे.

एका पदार्थासह भेट नाहीं। अन्यास तो चाटित बोट पाही ॥
तोंडाकडे, तीप्रति पाठमोरी। जाऊं न देईच, असा अघोरी ॥

मांडे, भात, वडे, खिरीहि जिलब्या, लाडू बहू झोडिले ।
तेंवी पापड, लोणचें, चिकवड्या जे घारगे वाढिले ॥
तें सारेंच करोनि चट्ट नुकता जैसा बसे भोजना ।
त्या श्रींची कटि वाढ–वाढुनि ढिली होतां धरी वेदना ॥

जांगिळमामाः–अरे अन्नाची थोरवी तुला काय वर्णन करावी! कीट्स् कवीनें म्हटलें आहे, 'Are fruits of Paradise sweeter than those dainty pies ? ' सुग्रास अन्न पुढें आल्यावर तें कोण सोडून देईल ? कां मुनिमहाराज ! कोणा संकृत कवीचें ह्याबद्दल कांहीं वचन आहे काय ?

नारदः—हो ! हो ! ' स्थालिदास ' कवीनें जिलबी संबंधानें ' मेत-कूट ' काव्यांत म्हटलें आहे,

ज्ञातास्वादो विवृतजिलबीं को विहातुं समर्थः । *
फार कशाला ! तैत्तिरीय उपनिषदेंत म्हटलें आहे,

अन्नाद्भूतानि जायन्ते । जातान्यन्नेन वर्धन्ते ॥
...सर्वं वैतेऽन्नमाप्नुवन्ति येऽन्नंब्रह्मोपासते ॥

अन्नंहि भूतानां ज्येष्ठम् ॥ ब्रह्मानंदवल्ली, अनुवाक् दुसरा.
अन्नं ब्रह्मेति व्यजानात् । अन्नाद्धे खल्विमानि भूतानि जायन्ते ।
अन्नेन जातानि जीवन्ति ॥ भृगुवल्ली, अनुवाक् दुसरा.

जांगिळमामाः— पहा ! अन्न म्हणजे प्रत्यक्ष ब्रह्म आहे असें म्हटलें आहे ! मी तर अन्नाला पहिल्यापासूनच परमेश्वर समजत होतों.

---

* कालिदासाच्या मेघदूत काव्यांतील एका ओळींत एक शब्द बदलून ही ओळ केली आहे.

नारदः— विशेषतः भात म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वर आहे; व त्याला आधारही आहे, कारण ' परमेष्ठी वा एषः यदोदनः ' असें आपण मेजवानीच्या सुरुवातीला म्हणतोंच !

परमेश्वराशीं तादात्म्य पावून आम्ही त्या परमेश्वरालयांतून निघालें ते एका बागेंत सहल करून ठिकाणावर परत आलें.

दुसरे दिवशीं सकाळीं ब्रेकफास्ट घेतल्यानंतर आम्हीं शहर पाहण्यास निघालें. प्रथम स्टेफन्स प्लाट्झ येथें गेलों व तेथून भ्रमन्तीला सुरवात केली. येथेंच सेंट स्टीफन्स कॅथीड्रल आहे तें पाहण्यास गेलों. कलोनच्या कॅथड्रिलपेक्षां हें लहान प्रमाणावर असल्याकारणानें येथें विशेष वेळ न घालवतां तेथून बाहेर पडून ग्राबेन म्हणून रस्ता आहे तेथें आलों. हा रस्ता बराच रुंद आहे व मोठ्या व्यापाराची पेठ असल्यामुळें दुकानें वगैरे थाटाचीं आहेत. तेथून आम्ही होफमध्यें आलों. होफ म्हणजे पटांगण. येथें चारी बाजूंनीं उंच इमारती असून मधील पटांगणांत वाटोळ्या चबुतऱ्यावर पुतळे आहेत. तेथून मोठाल्या इमारती असलेले एक दोन लहान रस्ते ओलांडून आम्ही होफबुर्ग राजवाड्यानजीक आलों. या राजवाड्यांत प्रवेश होण्याबद्दल आम्ही चौकशी केली, परंतु प्रवेश होण्याचा कांहीं रंग न दिसल्यामुळें तो नाद सोडून पुढें सरकलों.पुढें एक मोठें मैदान लागलें व त्याच्यामध्यें उंचावर दोन पुतळे होते व त्यांच्याभोंवतालीं बाग होती. डाव्या उजव्या बाजूस समोरासमोर सारख्या सारख्या दोन भव्य इमारती होत्या. त्यांपैकीं एक आर्टहिस्टरी म्यूझियम होता व दुसऱ्या बाजूस नॅचरल हिस्टरी म्यूझियम होता. प्रथम आम्ही डावे बाजूस आर्टहिस्टरी म्यूझियम काय आहे तें पहाण्यास पाहिऱ्या चढून प्रवेश केला. पुढें जाण्यास प्रवेशफी देणें जरूर होतें. मी तिकिटें काढूं लागलों तेव्हां जांगिळमामा म्हणाले ' थांबरे थांब बाबा ! हा समोरचा एवढा मोठा जिना चढून जावें लागणार काय ?' मी म्हटलें ' घाबरूं नका, तीं पहा मध्यें

विश्रांतिकरतां बाकें ठेवलीं असून त्यांवर गाद्या घातलेल्या आहेत.' 'मग हरकत नाहीं' मामा म्हणाले, 'आतां धाडस करायला हरकत नाहीं. मामांच्या आश्रयानें आम्ही वरतीं गेलों व पहातों तों ती चित्रशाळा होती. चित्रें पाहतांना प्रथम मामांना मजा वाटली. कांहीं चित्रें सृष्टीचे मोहक देखावे तर कांहीं मनुष्यकृत कारागिरी. कांहीं सृष्टींतील भयानक देखावे तर कांहीं मनुष्यकृत अनर्थ, कांहीं सृष्टींतील परमेश्वरी अंश तर कांहीं मनुष्यांचीं परमभक्तिरसानिमग्न अवस्था असें वैविध्य दाखविणारीं, लहानशा चौकटीपासून तों एखाद्या चाफेखणाएवढया भिन्न भिन्न आकारांचीं कलाकुशल कारागिरांचीं चित्रें पाहून क्षणभर सर्वांचीं मनें आश्चर्यानें स्तिमित झालीं. परंतु दालनामागें दालनें जेव्हां चित्रेंच चित्रें दिसूं लागलीं ते वेळीं चित्तांत निर्वेद उत्पन्न होऊं लागला. कांहीं वेळानें जांगिळमामा म्हणाले 'ज्याप्रमाणें व्याह्यांनीं एकाच जेवणांत मोतीचूर, जिलब्या, श्रीखंड, करंज्या, अनरसे, बासुंदी, शेवया इत्यादि शंपन्नास पक्वान्नें वाढावींत त्याप्रमाणें ह्या वेळीं माझी स्थिति झाली आहे.' असें म्हणून मामांनीं शेजारच्या एका आसनावर देह टाकून डोळे मिटून घेतले. मी म्हटलें 'तर मग मामा! मध्याची वेळ झाली असली तर खालीं जाऊन आपण वस्तुसंग्रहालय पाहूं.' विश्रांति संपल्यावर मामांनीं आसनविमुक्त होऊन जिन्याचा मार्ग धरला. तळमजल्यावर वस्तुसंग्रहालय होतें त्यांत दगडी व मातीचे तसेंच धातूंचे प्राचीन व अर्वाचीन पुतळे, जुनीं शस्त्रें, चिलखतें, भांडीं व इतर धातूंचें सामान, कापडावरील कारागिरी इत्यादि विविध वस्तु प्रेक्षणीय होत्या. येथें मामांचें चित्त कांहीं वेळ रमलें, त्यामुळें वेळही बराच झाला; कारण स्टेशना-स्टेशनावर थांबणारी गाडी असून ती पुनः मालगाडी असली म्हणजे पुण्यापासूनच मुंबईला जायला ३ दिवस लागायचे! पहाणें संपत आलें तेव्हां मामांनीं घड्याळ काढलें; पहातात तों एक वाजून गेलेला! मामांचा जीव कासावीस

झाला. ‘ आतां नाहीं धीर निघत ! ’ ते म्हणाले. ‘ खरें हो खरें ’ वयस्य म्हणाला, ‘ काय यांची ही अवस्था झाली ! घड्याळ सहज खिशांतून काढतां घालतां आलें ! ’ मग मामांना सांवरून आम्ही एका रेस्टॉरंटमध्यें नेलें. भोजन सुरू झालें. हळू हळू ताटापासून मामांचें डोकें व छाती मागें मागें जाऊं लागलीं. पुढचें ताट मामांना दिसतें आहे कीं नाहीं असा संशय आम्हांस पडूं लागला. पंचत्वास जाऊं पहाणारे देहांतील मामांचे पंचप्राण पंचपक्वान्नांनीं पुनश्च स्थानापन्न झाल्यावर त्यांस विचारिलें “ मामा ! पोटावर इतकें ओझें घालण्यापूर्वी त्याचा ‘ बेंडिंग मोमेंट ’ तुम्हीं पाहिलेला आहेना ! नाहीं तर इलिप्सचा पॅरॅबोला होऊन हायपरबोला होण्याची पाळी यावयाची ! ’

नारद म्हणाला ‘ त्याची काळजी नको ! आपल्या बापजन्मीं रुद्राचीं आवर्तनेंचीं आवर्तनें करून त्यांनीं ‘ अन्नं च मे ’ च्या पाठोपाठ ‘ क्षुच्च मे ’ म्हणजे भूकही मागून घेतली आहे. त्यामुळें हायपरबोला किंवा रामबोला होण्याची भीति नाहीं.’

मग आम्ही पुनः हिंडावयास निघालों. प्रथम पार्लमेंटचें सभागृह पहाण्यास गेलों. ही इमारत जरी भव्य आहे तरी लंडनच्या पार्लमेंटहौसशीं तुलना करितां येण्याजोगी नाहीं. ह्या इमारतीच्या पुढल्या बाजूस मिनर्व्हा ह्या प्राचीन रोमन लोकांच्या देवतेचा पुतळा आहे. मिनर्व्हा बुद्धीची अधिष्ठात्री देवता असून तिचा पोषाख लढाऊ असतो. हातांत एक भाला व ढाल आणि डोक्यावर शिरस्त्राण असा सुमारें २ पुरुष उंचीचा हा पुतळा असून शिरस्त्राण सोनेरी रंगाचें होतें. आंतमध्यें समोरासमोर दोन सभास्थानें आहेत तीं मोठीं भव्य आहेत. तथापि तेथील बैठकी म्हणजे खुर्च्या आहेत त्या मोठया सुखावह आहेत असें वाटत नाहीं. वक्ता कितीही नीरस असला तरी मेंबर लोकांस झोंप येणार नाहीं. निदान घोरूं लागण्याइतकी तरी खास येणार नाहीं. हाउस ऑफ लॉर्ड्समधील खुर्च्या आहेत त्या कांहीं बऱ्या आहेत.

आम्ही हाउस ऑफ डेप्युटीजमध्यें असतांना वयस्याला भाषण करण्याची स्फूर्ति झाली !

‘ नामदार सभासदहो !—’

जांगिळमामाः—‘ हां जरा थांबा ! भोक्ते पाटावर बसल्याखेरीज भात वाढूं नये आणि श्रोते आसनस्थ झाल्याखेरीज भाषणास सुरुवात करूं नये !’ असें म्हणून मामांनीं एका खुर्चीत ढुंगण खोंचलें. ‘ हं, आतां सुरुवात होऊं द्या. ’ ते म्हणाले. वयस्य सुरुवात करणार तों मामा बसलेल्या खुर्चीतून कर्रर्र असा आवाज आला. त्याबरोबर वयस्याच्या जिभेपुढें पडदा आला व मामा उठूं लागले. तों काय चमत्कार ! त्या खुर्चीला प्रेमाचा उमाळा आल्यामुळें कीं काय कोण जाणे, ती मामांना सोडीना ! आह्मी तिघेजण व दाखवडा मिळून कोणी हात धरले, कोणी पाय धरले, कोणी मागून ढकललें तरी खुर्ची मामांस सोडीना ! आतां काय करावें ! मग वयस्यानें युक्ति केली. त्यानें खिशांतून एक टांचणी काढली व पाठीमागून बसण्याचे जागीं मामांना सडकून बोंचली. त्याबरोबर हवेच्या बंदुकीच्या तोंडांतील बुचाप्रमाणें चटकन् मामांची सुटका झाली ! खुर्चीचा एक हातही तुटून बाहेर आला. वयस्य म्हणाला ‘ मामांनीं तिचें पाणिग्रहण केलें ! ’

नंतर आम्ही न्यायकोर्ट पाहण्यास गेलों. परंतु हें न्यायकोर्ट शोभेपेक्षां उपयुक्ततेची दृष्टि जास्त ठेऊन बांधलेलें दिसलें. आम्ही तेथून कफेमध्ये गेलों. काफीचा आस्वाद घेतां घेतां मामा म्हणाले, ‘ रामदासस्वामींनीं असें म्हटलें आहे ‘‘नाना युक्षदंडांचे रस । नाना फळांचे नाना रस । नाना प्रकारचे गोरस । मद पारा गूळच ॥ ’’ ( दा. बो. १६–४–१५ ). त्या वेळीं लोकांना चहाकाफी माहीत नव्हती; नाहीं तर त्यांचा त्यांनीं प्रामुख्येंकरून उल्लेख केल्याशिवाय सोडलें नसतें ! !’

मीः—आपण एक मठस्थापना करून तेथें उदरसांप्रदायाची गादी स्थापणार आहां असें मीं ऐकिलें !

मामा—होय, अलीकडे मीं पाहिलें आहे कीं, मठ, गड, गादी यांसारख्या जाहिरातींशिवाय आपल्या धार्मिक-अधार्मिक मतांचा प्रसार करण्याचें दुसरें साधन नाहीं. ह्या गोष्टीचें शास्त्रीय स्वरूप इतर गोष्टींप्रमाणेंच आपण विलायती लोकांकडून शिकलें पाहिजे !

मीः—मग तुमच्या सांप्रदायांत उपास करणें वर्ज्य होईल.

मामाः—अर्थात् ! मनुष्य उपजल्याबरोबर खाणें त्याच्या मागें लागलेंच आहे. तें सोडणें मूर्खपणा आहे. काय मुनिमहाराज, ह्यासंबंधानें कांहीं वचन आहे काय ?

नारदः—हो हो ! खाणें हें मनुष्यासह जन्माला आलें असल्यामुळें गीतेंतलें वचन " सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् " हें येथें बरोबर लागूं पडतें. ह्याचा भावार्थ असा कीं खाण्यामुळें रोग उत्पन्न होत असला तरी खाणें सोडूं नये.

दुसरे दिवशीं सकाळीं आह्मी दानवा नदी ( आस्त्रियन नांव 'दानाऊ,' इंग्रजी नांव 'डॅन्यूब' ) च्या स्नानाला जाण्याचें ठरविलें. ही नदी युरोपांतील फार मोठ्या नद्यांपैकीं असून ती एक मोठा व्यापारी जलमार्ग आहे. ही व्हिएन्ना शहरापासून थोडी दूर असून तिचा एक कालवा शहराच्या मध्यभागांतून नेला आहे. ह्या कालव्याच्या कांठावरून मधून मधून उद्यानें जानपदांच्या विहारासाठीं केलेलीं आहेत. टामरेळीनें जाऊन आम्ही सुमारें अर्ध्या तासानें नदीच्या पुलाजवळ पोंचलों. पूल बराच मोठा व लांबलचक दिसत होता. पण त्याच्या पलीकडे जाण्याच्या भानगडींत न पडतां जवळच स्नानगृह दिसत होतें तिकडे आम्ही वळलों. स्नानगृह चांगलें ऐसपैस व उत्तम व्यव-

स्थेशीर होतें, पण आंत स्नाते कोणी नव्हते. ह्याचें कारण सकाळची वेळ, जरा थंडी असून वारेंही होतें.

' मामा तुम्हांस पोहतां येतें ना ?

' हो ! हो ! एके वेळीं मी मोठा पटाईत पोहणारा होतों. '

मामा सगळ्यांच्या आधीं चड्डी चढवून पाण्याच्या कांठावर उतरले.

' मामा ! तुम्हांस उडी नाहीं का मारतां येत ? '

' उडी मारण्याची सोय आहे का ? मला ठाऊक नाहीं. '

आम्ही तिघांनीं उड्या मारलेल्या पाहून मामा उडी मारण्याचे जागीं गेले व अवसानांत उभे राहिले व म्हणाले,

' वयस्या ! ये आपण उडी मारूं ! '

वयस्य जाऊन त्यांचे शेजारीं उभा राहिला. बाहेर टामरेळ चालत होती ती थांबली; नदीच्या पाण्याचा आवाज ऐकूं येईनासा झाला. सर्व विश्व स्तब्ध झालें ! पण मामांची उडी प्रगट होईना. वयस्य म्हणाला, 'मला थंडी वाजते; मी पाण्यांत शिरतों. '

' ही मी उडी टाकतोंच ! पण पाणी फार खोल आहे कारे ? '

' छे हो ! अगदीं उथळ आहे. '

' अर्रर्र ! खोल पाणी उडी मारायला चांगलें ! पण तुम्ही उड्या मारल्याच आहेत; आतां मीही एक तऱ्हा तुम्हांस दाखवितों ! '

वयस्यानें त्यांचा हात धरला व उडी टाकली. मामांनींही उडी ठोकली. पण मेंदूकडून छातीमार्फत आलेली तार पायांना उशिरा पोंचल्यामुळें कीं काय, एक पाय लवकर न हालून मामांचें ' उर्ध्वायै दिशे ब्रह्मणेनमः ' झालें. मामांचा आकार कोळसारंगम् अय्यंगारच्या कपाळावरील नामाप्रमाणें होऊन ' मेलों, मेलों ' अशी आरोळी हवेंत उठली ! पाण्यावर डोंगरासारख्या लाटा येऊन हवा जिकडे तिकडे तुषारमय होऊन गेली. आपल्या नाका-

तोंडांतलें पाणी झाडून मामा जलगाढ झाले होते तिकडे पाहिलें, तों तेथें फेंसच दिसत होता. फेंस निवळून केंस दिसूं लागले व यथावकाश डोकेंही बाहेर आलें. पण काय! मामांच्या चेहऱ्यावर निराळाच देखावा दिसूं लागला. तांबडेपणा पार जाऊन डोळे विस्तृत झाले होते व तोंड उघडें असून त्यांतून पाझर निघत होते. इतक्यांत हात वर गेले व डोकें पुनः खालीं जाणार असा रंग दिसूं लागला. त्याबरोबर आम्ही पुढें झालों. एकानें एक दंड धरला, दुसऱ्यानें दुसरा धरला व तिसऱ्यानें मान धरली; अशा थाटानें मिरवत मामांची स्वारी त्यांच्या खोलीपर्यंत आली. मग चटकन् त्यांचें अंग पुसून कपडे घातले व आम्हीही कपडे चढवून त्यांना शेजारच्या कफेमध्यें घेऊन गेलों. तीन पेले चहा आणि दोन पेले काफीनें जेव्हां त्यांचें तोंड ओलें झालें तेव्हां त्यांच्या तोंडांतून पहिला शब्द बाहेर पडला.

' तुम्हीं मला बाहेर आणण्याची एवढी घाई कां केली ? मी तुम्हांला पाण्यांत मजा दाखविली असती ? '

' तुमची मजा पाहण्यास आम्हांला हरकत नव्हती ! पण पंचनाम्याची मजा पाहण्यास आम्हांस वेळ नव्हता ! '

मग शहरांत परत येऊन युनिव्हर्सिटी पहाण्यास गेलों. ही इमारत मोठी भव्य आहे. तेथील क्लासरूम्स व लायब्ररी वगैरे पाहिल्यानंतर क्लार्कच्या आफिसांत गेलों, कारण वयस्याला कांहीं माहिती पाहिजे होती. पण आम्हांस आस्ट्रियन येईना व त्या कारकुनास इंग्रजी येईना ! मग त्यानें इंग्रजी—आस्ट्रियन डिक्शनरी काढली व महत्त्वाचा एखादा एखादा शब्द त्यांत काढून दाखवून वयस्यानें आपलें काम करून घेतलें. ह्या युनिव्हर्सिटींतील नेत्रवैद्यकीचा भाग अत्युत्तम असल्याबद्दल प्रख्यात आहे व शिक्षण इंग्रजींत मिळण्याचीही सोय आहे असें ऐकिलें.

दुपारचें जेवण आटोपल्यानंतर आम्ही येथील 'शय्नब्रन' हा राजवाडा पाहण्यास गेलों. शहरापासून हा सुमारें पाऊण तासाच्या रस्त्यावर असून आम्हांस टामरेल्वींतून तिकडे जातां आलें. हा पाहाण्यास तिकीट असून दर अर्ध्या तासानें दाखवडा जमलेल्या मंडळींस घेऊन जातो. राजवाड्याच्या पलीकडे वनस्पतिशास्त्रोपयोगी एक बाग आहे तिकडे प्रथम आम्ही गेलों. यांतील बहुतेक झाडें एका कांचगृहांत असून त्यांत बरींच गमतीदार फुलें-पानें वगैरे आम्हांस पाहण्यास सांपडलीं. माणसाच्या उंचीइतकें एक झाड होतें. तें हिमालयांतील देवदार म्हणून लिहिलें होतें. तिकडून निघून मग आम्हीं राजवाड्याकडे आलों. राजवाड्याला बाहेर लावलेला पिंवळा रंग विशेष मोहक नव्हता. वाडा उंचही फार नव्हता, पण लांबलचक तीन पाखीं त्याला होतीं. त्यांपैकीं फक्त एका समोरच्या पाख्याचें अर्ध आम्हांस दाखविलें.

बाहेरून जरी वाडा विशेष शोभिवंत दिसत नव्हता तरी आंतून तो शृंगारला होता. कधीं कधीं बादशहाची स्वारी येथें येऊन रहाते. लहान मोठ्या खोल्या, त्यांतील उंची सामान, चित्रविचित्र गालिचे वगैरे अनेक प्रेक्षणीय प्रकार तेथें होते. एक खोली आम्हांला दाखविली तेथें नेपोलियन व्हिएन्नामध्यें होता तेव्हां रहात असे. मेरिया थरीसा वगैरे ऐतिहासिक माण-सांच्या राहण्याच्या जागा दाखविण्यांत आल्या. एका खोलींत वॉलपेपरप्रमाणें गुळगुळीत चित्रें भिंतींत लावलेलीं होतीं. एक खोली सोनेरी वेलबुट्टीनें शोभि-वंत केलेली होती. मुख्य मोठा जेवणाचा महाल तर फारच प्रेक्षणीय होता. छतांवर, खांबांवर वगैरे सोनेरी नक्षी असून भोंवतालीं पाहिऱ्यांप्रमाणें तीन खुर्च्यांच्या रांगा होत्या. त्या खुर्च्या मखमलीनें मढवलेल्या होत्या; मोठाल्या खिडक्या होत्या त्यांतून गार वारें येत असून बाहेर सुंदर देखावा दिसत होता. सदरहू महालांत आम्ही निरीक्षण करीत असतां शेजारीं पुढील शब्द ऐकूं आले.

'बगदादला ह्याहून सुंदर असे किती तरी महाल होते! पण ते आतां कोठें आहेत?'

आम्ही वळून पाहिलें. मी म्हणालों, 'कोण! सिंदबाद दर्यावर्दी!* केव्हां येथें आलास?'

सिंदबादः—मी तुमच्याबरोबर वाड्यांत शिरलों, पण तुम्ही पहातां कोठें? हा वयस्य तर मला धक्का देऊन गेला, पण नुसतें 'पर्दो' (Pardon) सुद्धां म्हणाला नाहीं! माझ्या चवथ्या सफरींत मला असे रानटी लोक भेटले होते. (मामांकडे वळून) कां मामा! जगांत दुसऱ्या लोकांना राहण्यास जागा मिळते आहे कीं नाहीं?

मामाः—बाहेर मिळाली नाहीं तर आंत शिरावें! तुमच्यासारख्या फिरस्त्या लोकांना मासे व कोंबड्यांच्या शेजारीं जरूर जागा देऊं! सध्यां आतां कोणीकडे सफर?

सिंदबादः—सध्यां माझा व्हेनिसला जाण्याचा बेत होता; पण तुमच्यासारख्यांचा समागम मिळेल तर बेत तहकूब करूं.

वयस्यः—आम्हीही पुढें व्हेनिसला जाणार आहों! आपण बरोबरच जाऊं म्हणजे झालें?

नारदाची व सिंदबादची ओळख नाहीं असें पाहून मी त्यांचा परिचय करून दिला. 'नारदमुनि—सिंदबाद दर्यावर्दी. यांची सातवी सफर झाल्यानंतर हे बगदादमध्यें स्वस्थ रहाणार होते. पण बगदादची खिलाफत नष्ट झाल्यामुळें हे प्रवासांतच फार वेळ घालवितात.'

नारदः—यांच्या सहवासामुळें फार आनंद झाला असता, पण नाइलाज आहे. मला येथूनच परत गेलें पाहिजे!

---

* अरेबियन नाइट्समध्यें सिंदबाद दर्यावर्दी याच्या सात सफरींचें अद्भुत वर्णन आलेलें आहे. तें वाचलें म्हणजे येथील सिंदबादची भूमिका समजेल.

वयस्यः—कां, इंद्राच्या दरबारांत लेव्ही आहे काय ?

नारदः—नाहीं, दरबारची महत्त्वाची बैठक आहे. देवदानवांची मोठी लढाई लागणार आहे. तेव्हां देवांनीं काय काम करावयाचें हें तेथें ठरणार आहे.

मीः—मग त्यांत तुम्हांला कांहीं कामगिरी असेलच ?

नारदः—नाहीं, आम्हांला भगवान् श्रीकृष्णांनीं मोकळीक देऊन ठेवली आहे. अठराव्या अध्यायापर्यंत गीता सांगून शेवटच्या अध्यायांत ते म्हणतात, "यथेच्छसि तथा कुरु।"

मीः—तें बरें केलें: "राखिला लौकिक घरचे घरीं."

त्या दिवशीं रात्रीं ९ चे गाडीनें आम्ही सुडबान स्टेशनावरून सिंदबादसह व्हेनिसला निघालों. निरोप घेतांना जांगिळमामा गंहिवरून म्हणाले "हे ब्रह्म-कुमरा, कृपावंत होऊन ह्या दीन दासाला कांहीं आशीर्वाद द्यावा." नारद म्हणाला "ठीक आहे, वत्सा, तुला माझा असा आशीर्वाद आहे कीं परिपाकपंचकांत तुला अग्रस्थान मिळेल. तुडुंब अवस्थेनंतर 'अगस्ति' च्या ऐवजीं तुझें नांव घालून लोक पुढील प्रमाणें श्लोक म्हणून पोटावरून हात फिरवितील.

जांगिळं कुंभकर्णं च शनिं च वडवानलम् ।
आहारपरिपाकार्थं स्मरामि च वृकोदरम् ॥

नंतर सर्वांनाच 'अग्निमीळे पुरोहितम् ।' ह्या मंत्रानें आशीर्वाद देऊन मुनिमहाराजांनीं आमचा निरोप घेतला.

— — —

## संचार आठवा

# वेनिझिया ( Venezia ) इटली

( इंग्रजी नांव व्हेनिस )

व्हिएन्नाच्या सुडबान स्टेशनवरून गाडी सुटली ती रात्रभर चालून आस्ट्रियाच्या सरहद्दीवर आली. तेथें ती गाडी फार शिणल्यामुळें कीं काय आम्हांस दुसऱ्या गाडींत जाणें भाग पडलें. या दुसऱ्या गाडींत थर्ड क्लासच्या डब्यांत जागा नसल्यामुळें गार्डनें आम्हांस सेकंड क्लासच्या डब्यांत बसविलें. मध्येंच तो गार्ड बदलून दुसरा आला. व्हेनिसच्या नजीक एक तिकिट इन्स्पेक्टर आला तो म्हणाला 'जास्त पैसे द्या.' आम्ही म्हटलें आमची कांहीं चूक नाहीं. गार्ड पाहिला तर दुसराच ! इन्स्पेक्टर म्हणाला 'तुम्हांला व्हेनिसच्या स्टेशनवर अडकवून ठेवतों.' असें म्हणून तो गेला. मग आम्ही विचार केला कीं व्हेनिसच्या स्टेशनवर सुटका झाली तरी पुष्कळ त्रास पडेल. शिवाय ह्या माणसासही कांहीं चिरीमिरी पाहिजे असें दिसतें व त्याकरितां बहुतकरून तो पुनः येईल. त्यावेळीं त्यानें फार पैसे उपटूं नये म्हणून आम्हीं युक्ति करावयाचें ठरविलें. आम्हीं तर्क केल्याप्रमाणें तो पुनः आलाच. त्याबरोबर वयस्यानें एक क्रोनेन त्याचेपुढें करून मुद्रेनें दर्शविलें कीं उगीच भानगड करूं नको. त्यानें दर्शविलें कीं १० क्रोनेन पाहिजेत ! वयस्यानें पुनः एक क्रोनेन पुढें केला. त्याबरोबर जांगिळमामांनीं उसळून वयस्याला मराठींत म्हटलें ' कांहीं देऊं नकोस त्याला; आमची काय चूक आहे ?' ( वाचकांना हे ठाऊकच असेल कीं अशा प्रसंगीं उच्चारलेले शब्द छापतां येत नाहींत. ) वयस्य म्हणाला ' जाऊं दे–जाऊं दे. ' मग त्या दोघांत असा वाद जुंपला कीं इन्स्पेक्टर पहातच राहिला ! शेवटीं मामांनीं वयस्याचे अंगावर झांप टाकून त्याला कोपऱ्यांत कोंबलें, त्याचा क्रोनेन

खिशांत परत घालायला लावला व इन्स्पेक्टरला खूण केली कीं चालता हो. तो कांहीं ' बिल्लीएट्टो ' बोलूं लागला, तर मामा मराठींत म्हणाले ' तुझ्या बापाला पैसे देणार नाहीं लेका ! ' तेव्हां तो गेला. मग व्हेनिसच्या स्टेशनावर उतरल्यावर तो म्हणाला 'चला स्टेशनांत.' मामानीं म्हटलें 'चल.' मग त्यानेंहि पाहिलें कीं विशेष कांहीं जास्त मिळण्याचा रंग दिसत नाहीं. तेव्हां अर्ध्या वाटेंत त्यानें आपला हात पुढें केला. मीहि त्याचे हातावर एक क्रोनेन टाकला व त्यानें आम्हांस सोडून दिलें. क्रोनेन हें आस्त्रियन नाणें फ्रँकच्या किंमतीचें म्हणजे १०आणे किंमतीचे असतें व त्याचे अंश म्हणजे हेलर. १०० हेलर म्हणजे एक क्रोनेन. इतर देशांत अर्धा आण्यापेक्षां कमी किंमतीचें नाणें फारसें दिसलें नाहीं. पण आस्त्रियांत सुटे हेलर ( सुमारें पैएवढया आकाराचे व किंमतीचे ) बरेच पाहण्यांत आले.

स्टेशनांत क्लोकरूममध्यें पडशा ठेवून स्टेशनांतून बाहेर पडल्याबरोबर आम्हांस मोठा मजेदार देखावा दिसला. एक रुंदसा कालवा (मुंबईच्या कोटांतील हार्नबीरोड इतका रुंद असेल), त्याच्या दोनही बाजूंस ३–४ पाहिऱ्यांचा घाट होता व मधून मधून होडया चालल्या होत्या. होडया वल्हविण्याची तऱ्हा मात्र विलक्षण होती. आंतील मनुष्य उभा राहून एकच वल्हें एका बाजूस मारून वाटेल तशी नाव नेत असे. तें पाहून नावेंत बसण्याची आम्हांस फार उत्कंठा झाली. तथापि एक वाजला असल्याकारणानें पोटांत कावळे ओरडूं लागले होते. सकाळीं जंक्शनवर चहारोटी घेतली होती, परंतु चहारोटीला रोजच्या ब्रेकफस्टची सर येणें शक्य नव्हतें.तरी पण सिंदबाद म्हणाला 'जरा एखाद्या बाजूच्या रस्त्याला जाऊन रेस्टॉरंट पाहूं. ' त्याबरोबर मामा म्हणतात ' हा समोर रेस्टारंट दिसतो आहे तेथेंच जाऊं, मग काय संकट येईल तें येवो !' मग तेथील मॅकॅरोनी वगैरे रुचकर पदार्थ पाहुन मामांनीं असा हात–नव्हे चमचाकांटा–चालविला कीं बोलायला फुरसत नाहीं. सिंदबाद म्हणाला ' जळवा

लावतात तुम्हांला माहित आहे ? जळू फुगून सुटल्यावर जिवंत रहावी अशी इच्छा असल्यास तिला पुनः ताबडतोब पिळून रिकामी करावी लागते.'

वयस्य म्हणाला 'तुळशीबागेंत एकादशीचे दिवशीं फुगे मिळतात फुगे. ते किती फुगवायचे इकडे लक्ष दिलें नाहीं तर—'

जांगिळमामाः—ब्यरं ! ब्यरं ! सुग्रास अन्न चाखावयाची आपणांस ताकद नाहीं तर लोकांस तरी भोगुं द्यावें. ज्ञानेश्वरींत म्हटलें आहे (अध्याय १७)

तरी सत्वगुणाकडे । जैं दैवें भोक्ता पडे । तैं मधुरीं रसीं वाढे । मेचु तया ॥ १२५ ॥ आंगेंचि द्रव्यें सुरसें । जें आंगेचि पदार्थ गोडसे । आंगेचि स्नेहे बहुवसें । सुपक्के जियें ॥ ६ ॥ आकारें नव्हति डगळे । स्पर्शें अति मवाळे । जिभेलागीं स्नेहाळें । स्वादेंचियें ॥ ७ ॥ रसें गाढे वरीविलीं । द्रवभावीं आथिलीं । ठायें ठावो सांडिलीं । अग्नितापें ॥ ८ ॥

तुम्हांला मेचु वाढला नाहीं त्याला मी काय करूं ?

मीः—सगळ्यांच्याच नशिबीं कुठें आहे मेचु वाढायचें ! त्याला सुदैव लागतें !

जेवून बाहेर पडल्यावर कालव्याच्या कांठानें (ह्याचें नांव ग्रँड कॅनाल) आह्मी चाललों,पण पुढें घांट संपला व घरांच्या भिंतीपासूनच कालवा लागला. मग बाजूच्या रस्त्यास वळून कोठें एखादा पॅसिऑं दिसतो आहे कीं काय म्हणून पाहूं लागलों. पण आधींच अरुंद रस्ते होते ते पुढें इतके अरुंद होऊं लागले कीं आम्हांला वाटलें मांजराचें तोंड तुपाच्या अरुंद कथलींत अडकलें असतां जशी अवस्था होते तशी मामांची स्थिति व्हावयाची ! मग आम्ही परत वळलों व टॉमस कुकाचें गाइड काढलें. त्यांत त्यानें ग्रँडकॅनाल, Riva degli Schiavoni वगैरे ठिकाणीं बरे पॅसिऑं मिळतात, म्हणून लिहिलें होतें. मग आम्हीं ग्रँडकॅनालमधल्या एका होडीवाल्याला हांक मारली व होडींत बसलों. त्यानें होडी किनाऱ्याजवळ सोडल्यावर मी त्याला म्हटलें

' रिव्हा-डेग्ली स्चियाव्होनी.' त्याला कांहीं समजेना, आणखी तो लागला कांहीं तरी बडबड करायला. वयस्य म्हणाला ' रिव्हाडेग्ली स्कियाव्होनी. ' सिंदबाद म्हणाला ' रिव्हा–देह्ली शियाव्होनी. ' मामा म्हणाले ' रजा घेतली शिपायांनीं. ' तरी त्याला कांहीं समजेना ! त्यानें होडी थांबविली आणखी आमचें प्रदर्शन मांडलें ! बाजूनें जाणारा दुसरा कोणी होडीवाला दिसला कीं आमच्याकडे पाहून त्याला कांहीं सांगे. मामा म्हणाले, तो बहुतकरून त्यांना म्हणत असेल ' हे पहा, मंगळावरून आलेले लोक !' त्यानें मग होडी अगदींच थांबविली व तो इटालियन भाषेंत कांहीं ' विट्टो गिल्ली ' बडबडूं लागला. मामा त्याला मराठी भाषेंत शिव्या देऊं लागले ! मग मी विचार केला कीं येथें नाटकगृह बनण्यापूर्वीं आपण सुटका करून घेतली पाहिजे. म्हणून कॅनालमधून बाजूस एक फांटा जात होता तेथें त्याला दाखविलें. त्यानें तिकडे बोट वळविल्यावर आम्ही एका लहान गल्लींत—पाणगल्लींत, कारण दोनही बाजूंस उंच उंच घरें असून तीं पाण्यांतूनच वर आलेलीं होतीं—शिरलों. या वारिमार्गाला आडवा असा एखादा भूमार्ग असल्यास त्याच्यासाठीं लहानसा पूल केलेला होता. ह्या पुलाखालून जातांना बसलेल्या माणसास वांकावें लागत नसे पण उभ्या होडीवाल्यास वांकावें लागे. अशा भूमार्गाला लागून वारिमार्गावर येण्यासाठीं दोन तीन पाहिऱ्या असतात. त्या पाहिऱ्यांजवळ होडी थांबविण्यास सांगितलें. आम्ही होडींत सारे १० मिनिटेंच असल्यामुळें त्याचे हातावर ४० सांतीम म्हणजे ४ आणे ठेवले. त्यानें अस्से फेंकून दिले; ( येथें वाचकांनीं होडीवाल्याचा स्वतः अभिनय करावा ) व तोंडाचा पट्टा चालू करून त्यानें आपलें पासबुक काढलें. त्यांत आम्हांला काय समजणार ! मग त्याच्या हातावर एक लायरा ठेवला आणखी चालूं लागलों. त्यानें बडबड चालू ठेवलीच होती, पण आम्हांला जास्त त्रास दिला नाहीं. पुढें आम्हांस कळलें कीं आधीं ठराव करून न निघाल्यास



व्हेनिस (इटली) येथील मोठा पाणरस्ता व गोंडुला (पाणगाडी).

कमींत कमी एक लायरा व ५० सांतीम द्यावे लागतात. ( लायरा Lira हें इटालियन नाणें फ्रांकच्या तोलाचें म्हणजे १० आणे किमतीचें असतें. त्याचे शंभर भाग व प्रत्येक भागाचें नांव सांतीम Centime. १० सांतीम म्हणजे एक आणा किंवा एक पेनीबरोबर. )

व्हेनिस हें पाण्यावर वसलेलें शहर म्हणून प्रसिद्ध आहे. पूर्वीच्या काळीं ही दलदलीची जागा होती. सहा नद्या येथें समुद्रास येऊन मिळतात त्यामुळें त्यांचे तोंडांशीं माती वाहून येऊन मधूनमधून पुष्कळशीं बेटें झालेलीं होतीं, त्यांवर लोक येऊन राहिले होते. पुढें शहराचें महत्त्व वाढून शिल्पकलेचा प्रवेश झाला व मजबूत घरें बांधण्यास सुरुवात झाली. त्या वेळीं पाण्याचे रस्ते व त्यांवरील गाड्या म्हणजे होड्या ह्यांचा प्रचार पडला. परंतु लोकांनीं घरें बांधण्यापूर्वीं कडक व्यवस्था न ठेवल्यामुळें पाण्याचे व जमिनीचे रस्ते अरुंद-विशेषतः शहराच्या व्यापारी भागांत—राहिले आहेत. वारिमार्गावरील होड्यांस 'गोंदुला ( Gondola )' असें म्हणतात. कांहीं रंगीत चित्रांत आम्हीं पूर्वींच्या गोंदुला पाहिल्या होत्या त्या भरजरी रंगीत कापडांनीं मढविलेल्या असल्यामुळें फारच सुंदर दिसत होत्या; परंतु प्रत्यक्ष पाहिलेली होडी त्या होडींचे मानानें रथापुढें छकडा अशी दिसली. तरी पण वारिमार्गावरून जाण्याचा अनुभव नवीन असल्यामुळें गम्मत वाटणें साहजिक आहे.

गोंदुलांतून उतरल्यावर 'इंग्लिश होटेल' म्हणून विचारीत चाललों. थोड्या वेळानें एका चौकासारख्या जागेंत आम्हांस एक मनुष्य भेटला त्याला इंग्रजी येत होतें. त्यानें आम्हांला दुसऱ्या एका हमालासारख्या मनुष्याच्या स्वाधीन करून दिलें. त्यानें दोन तीन ठिकाणीं आम्हांस नेलें; पण तेथें जागा नसल्यामुळें समुद्राच्या तीरावरील एका ठिकाणीं नेलें. तेथें व्यवस्था बरोबर जमण्याचा रंग दिसल्यावरून आम्हीं तळ दिला. खोलींत जाऊन स्वस्थ झाल्यावर मग फिरून हिंडावयास निघालों. कांपानील म्हणून एक टॉवर

तेथें जवळच होता. ती एक तेथील पाहण्यालायक चीज आहे असें कळल्यावरून तिकडे आम्ही वळलों. पूर्वींचा वैभवाच्या काळचा कांपानील चांगला सुशोभित होता; परंतु तो १९०२ सालीं पडल्यामुळें सध्याचा हा साधा बांधण्यांत आला आहे. याच्या शेजारीं सांमार्को ( San Marco इंग्रजींत 'सेंट मार्क'), ख्रिस्ताच्या बारा अपॉसलपैकीं एक, याचें चर्च आहे व त्या ठिकाणीं त्याच्या अस्थि पुरल्या आहेत. त्या चर्चच्या घंटेचा बुरूज म्हणून हा बांधलेला आहे. सांमार्को याच्या अस्थि प्रथम आलेक्झांड्रियास होत्या. पुढें व्हेनिझिया नगरी बलाढ्य झाल्यावर त्या तेथें आणण्यांत येऊन त्यांवर मोठें चर्च बांधण्यांत आलें व सांमार्को ही व्हेनिझिया नगरीची स्थानदेवता बनली. कांपानील बुरूज विटांनीं बांधलेला ३२५ फूट उंच असून ४० फूट रुंदीचा आहे. वर जाण्याचा मार्ग सुमारें १२ फूट रुंदीचा आहे व त्याच्या पाहिऱ्या सपाट नसून चढत्या ( पर्वतीच्या पाहिऱ्यांप्रमाणें ) आहेत. चार पाहिऱ्यांत एक फेरा होतो, अशा सुमारें चाळीस पाहिऱ्या आहेत. नेपेलियन बादशहा पूर्वींच्या कांपानीलवर घोड्यावर बसून गेला होता. वरती पोंचल्यावर तेथून जो देखावा पाहिला तो फार मनोहर होता. एके बाजूस शहराचीं लहानमोठीं व वांकड्यातिकड्या रीतीनें वसलेलीं घरें दिसत होतीं व इतर तीन बाजूंनीं समुद्रांतील बेटें दिसत होतीं. या बेटांवरील झाडें–घरें वगैरे पहाण्याची फारच मौज होती. समुद्रावर मधून मधून वाफेच्या जालीबोटी व गोंदुला मोठ्या चपलतेनें जात होत्या व साधारण आकाराच्या आगबोटीही पोक्तपणानें मार्ग क्रमीत होत्या. शहरांतील नागमोडी व गिचमिड दिसणाऱ्या गल्ल्यांत एक यहुदी ( ज्यू ) लोकांचा मोहोला आहे असें आह्मांस कळलें व 'मर्चंट ऑफ व्हेनिस' नाटकांतील 'शायलाक दि ज्यू' तेथें रहात असे असें कळलें. तसेंच हें गांव पाहून अदोर्नो आणि युबर्तो यांच्या करुणरसपर गोष्टीची आठवण झाली.

अशा रीतीनें वातायनस्थ अवलोक नेत्रगत करीत असतां सिंदबाद दर्यावर्दी म्हणाला ‘ ह्या व्हेनिस नगरचा इतिहास फार विलक्षण आहे. इंग्लंड ज्याप्रमाणें आज समुद्रावरील बलिष्ठ राष्ट्र आहे, त्याप्रमाणें एके काळीं हें शहर–देश नव्हे--त्या वेळीं सर्व दर्यावर्दी लोकांत प्रबळ होतें व बलाढ्य तुर्की साम्राज्याशीं दोन शतकें लढून ह्यानें सर्व युरोपखंडांत स्वतःबद्दल आदर उत्पन्न करून घेतला होता. विशाल संपत्तीचें आगर व ऐषआरामाची विलासभूमि असें हें शहर त्या वेळीं सर्व युरोपखंडांत होऊन बसलें होतें. रोमचें राज्यही एका शहराचेंच ह्मणतात. पण रोमन नागरिकत्वाचा हक्क रोमच्या बाहेरच्या जिंकलेल्या प्रातांतील लोकांना मिळू शके व रोमच्या आसपासच्या प्रदेशांतील पुष्कळांना हा हक्क होता. तसेंच रोमचें राज्य प्रथम शिष्टसत्तात्मक होतें. तें लवकरच बदलून लोकसत्तात्मक होऊन वैभवास चढलें. व्हेनिसचें प्रथम लोक-सत्तात्मक असलेलें राज्य शिष्टसत्तात्मक ( Oligarchy ) होऊन मग वैभवास चढलें. व्हेनिसच्या रिपब्लिकचें अस्तित्व १३०० वर्षे होतें व तें शेवटीं नेपोलियन बादशहानें मोडलें. ह्याच्या वैभवाची मुख्य किल्ली म्हणजे चीन-हिंदु-स्थान–इराण इत्यादि राष्ट्रांशीं असलेला युरोपखंडाचा व्यापार ह्यांच्या हातांत असे. केप ऑफ गुडहोपचा मार्ग निघाल्याबरोबर ह्यांच्या वैभवाला धक्का बसला व त्याला उतरती कळा लागली.’

मी विचारलें ‘ ह्या शहरचा इतिहास त्रोटकपणानें तुला सांगता येईल काय ? ’

सिंदबाद म्हणाला ‘ मला साधारण माहिती आहे ती सांगतों. प्राचीन काळीं, इसवी सनाच्या तिसऱ्या शतकांत कांहीं लोक आपल्या प्रांतांतील जुलमास कंटाळून ह्या दलदलीच्या बेटांवर येऊन राहिले. ह्यांचें नांव व्हेनेटी असें होतें व त्यापासूनच व्हेनिझिया हें नांव आलें असें समजतात.’

वयस्यः-समजणारे मूर्ख आहेत. माझी अशी ठाम समजूत आहे कीं, ‘ वाणिज्य ’ म्हणजे व्यापार ह्या संस्कृत शब्दावरून हें नांव आलें आहे.

सिंदबादः—तुझी एकदां ठाम समजूत झाली म्हणजे मग अंधळ्या डोळ्याला दुर्बीण लावणाऱ्या नेल्सनलाही तूं मागें टाकशील. असो, तुझ्या म्हणण्याप्रमाणें कां होईना, ह्या ‘वाणिज्या’ नगरीची स्थिति पाहिल्या प्रथम अगदीं वाईट होती; पण एक गोष्ट होती कीं तिच्या भौगोलिक पारिस्थिती-मुळें दुसरा कोणी त्यांच्यावर स्वारी करण्यास येण्याची भीति नव्हती. प्रथम कांहीं दिवस हें रोमच्या साम्राज्यांत सामील होतें. पुढें हळुहळु ह्या लोकां-मध्यें एक प्रकारची राज्यव्यवस्था सुरू झाली. इसवी सन ४६६ मध्यें १२ बेटांतले लोकांनीं जमून प्रत्येक बेटास एक ह्याप्रमाणें १२ ट्रिब्यून नेमले. परंतु परचक्रापासून रक्षण होण्याचे कामीं जरूर असणारा एकोपा उत्पन्न होण्यासाठीं सन ६९७ मध्यें त्यांनीं एकत्र जमून एक दोजी (Doge) म्हणून मुख्य अधिकारी (जन्मभर सत्ताधारी) निवडला. त्यानंतर ह्या शहराची प्रगति झपाट्यानें होऊं लागली. तरी पण दोजीची निवडणूक होते वेळीं कोणत्या बेटांतील मनुष्यास निवडावें अशाबद्दल तंटे सुरू होऊन कांहीं वर्षें दोजी न नेमतां दरसाल मास्तो मिलेस(मुख्य वीर)म्हणून एक नेमित. पण थोड्याच दिवसांनीं पुनः दोजी नेमूं लागले. पुढें कांहीं दोजींनीं आपली सत्ता अनियंत्रित व वंशपरंपरा करण्याचा प्रयत्न केल्यामुळें त्यांची सत्ता नियंत्रित करून एक लोकनियुक्त काउन्सिल नेमिलें. पण कौन्सिलांतील रिकाम्या झालेल्या जागा भरून काढण्याची व्यवस्था कौन्सिलाकडेच दिली. या चुकीचा परिणाम पुढें भोगावा लागला. प्रथम कोणीही नागरिक योग्यतेचा असला म्हणजे त्याचा कौन्सिलांत प्रवेश होऊं शकत असे; पण पुढें ही पात्रता फक्त वंशपरंपरा करण्यांत आली. (शेवटीं-शेवटीं राष्ट्रावर संकट येऊन पैशाची टंचाई पडूं लागली, ते वेळीं हा हक्क इतरांस विकत देण्यांत आला.) कौन्सिलनें दोजीचे अधिकार उत्तरोत्तर

कमी कमी करून बडेजाव मात्र वाढविला व त्यामुळें पुढें पुढें दोजी म्हणजे मिरवणुकींना शोभा आणण्याचें किंवा नाण्यांचा पृष्ठभाग मंडित करण्याचें भूषण होऊन बसलें. कौन्सिल फार मोठें ( सुमारें २०० माणसांचें ) असल्या-मुळें व्यवस्था नीट पहाण्यासाठीं एक दहा इसमांचें मंडळ नेमलें व गुप्तपणें चौकशी करून शिक्षा देण्याचा ह्याला अधिकार असल्यामुळें ह्याची भयंकर जरब बसली होती. शेवटपर्यंत साधारणपणें हीच व्यवस्था चालू होती.

व्हेनिसबंदर हें पूर्वेकडील व्यापारी माल युरोपखंडांत नेण्यास अत्यंत सोईचें असल्यामुळें त्याचा व्यापार वाढून पुढें फार मोठमोठीं गलबतें बांधण्यांत येऊं लागलीं व त्यांच्या संरक्षणार्थ लढाऊ जहाजेंही निर्माण झालीं. त्याच्या मागोमाग महत्वाचीं व्यापारी ठाणीं हस्तगत करून घेण्याची राज्यतृष्णाही उत्पन्न होऊन खुद्द तुर्कस्थानांत त्यांनीं बरींच ठिकाणें स्वाधीन केलीं होतीं. त्या वेळीं कॉनस्टॅन्टिनोपल येथें रोमन पादशहातीची एक बलाढ्य शाखा राज्य करीत होती; पण त्या पादशहाला सुद्धां व्हेनिसच्या लोकांचा धाक असे. व्हेनिसच्या व्यापाराला फार मोठें उत्तेजन क्रूसेड्स् ( ख्रिस्ताची-जन्मभूमि परधर्मीयांच्या हातांतून सोडविण्याकरितां युरोपच्या लोकांनीं केलेलीं अनेक धर्मयुद्धें ) पासून मिळालें. त्या वेळीं सैन्य व इतर सामान वाहून नेण्याच्या कामीं मुख्य मान व्हेनिसचा होता. एकदां तर कॉन्स्टँटि-नोपलची पादशहात व्हेनिसचा दोजी व इतर दोघांनीं मिळून खालसा केल्या-वर पादशहा होण्याचा मान दोजीला मिळण्याचा संभव असतां त्यानें नाकारला. पण पुढें तुर्क प्रबळ होऊन त्यांनीं कॉन्स्टँटिनोपल ( इस्तंबूल ) घेतल्यावर पारडें फिरलें. पोपच्या इच्छेविरुद्ध मुसलमानांशीं व्यापारी तह करून व्हेनिसच्या लोकांनीं कांहीं व्यापारी सवलती मिळविल्या. पूर्वेकडील व्यापा-राच्या कामांत त्यांस जिनोआ बंदर हें प्रतिस्पर्धी होतें. त्याचप्रमाणें कांहीं प्रसंगांनीं जमिनीवर त्यांना राज्यविस्तार करावा लागला. ह्या ठिकाणचे

तंटे, जिनोआच्या लोकांशीं होणाऱ्या समुद्रावरील लढाया व तुर्कीच्या चांचे लोकांशीं झगडे व खुद्द तुर्की साम्राज्याशीं केलेलीं युद्धें ह्यांमध्यें दोन तीन शतकें व्हेनिसच्या लोकांनीं चांगलीच मर्दुमकी दाखविली. परंतु पुढें जेरीस येऊन ह्या राज्याला जी उतरती कळा लागली तिचा शेवट सन १७९६ मध्यें नेपोलियन बादशहानें ह्या दुबळया म्हाताऱ्या रिपाब्लिकचा मृत्यु जाहीर करून केला.

ह्या शहरासंबंधीं एक ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे पोपचा धार्मिक जुलूम बरींच वर्षें इतर खिती राष्ट्रांवर फार चालत असे; परंतु व्हेनिसनें तो अगदीं शेवट शेवटपर्यंत चालूं दिला नाहीं. रोमची-पोपची गादी म्हणजे सेंट पिटर नांवाच्या खिस्तशिष्याची गादी आहे. पण व्हेनिसच्या लोकांनीं सेंटमार्क ह्या खिस्तशिष्याच्या अस्थि आपल्या नगरींत स्थापन करून स्वतंत्रपणाचा बाणा थोडयाबहुत अंशानें कायम ठेविला होता. असा ह्या राज्याचा इतिहास मोठा मनोरंजक असून राष्ट्रांच्या उदयास्तांचा विचार करणाऱ्याला मोठा बोधप्रद आहे.'

सिंदबाद दर्यावर्दी यानें व्हेनिसचा इतिहास सांगितला, तो संपल्यावर आम्हीं पुन: एकदां शहराकडे व बेटांकडे नजर टाकली; व मनांत आणलें कीं अशा रीतीनें एके काळीं मोठें वैभवसंपन्न असलेलें हेंच तें शहर काय? असा विचार करीत होतों; इतक्यांत एकदम वरती मोठ्या घणदिशीं आवाज झाला. पाहतों तों वरती टांगलेल्या एका मोठ्या घंटेचा आवाज होता. अशा पांच घंटा तेथें होत्या व प्रत्येक घंटा कमरेइतकी तरी उंच होती! प्रत्येक घंटा एका कमानीवर अशा रीतीनें अडकविली होती कीं, सबंध घंटाची घंटा दोरी ओढून हलवितां यावी. दोऱ्या तळमजल्यावरूनच हलविल्या जात असत. वास्तविक अशी घंटा वाजविणें म्हणजे लोलक हलवून वाजविणें सोपें; परंतु येथील वहिवाट म्हणजे घंटाच हलविण्याची दिसली.

वयस्य म्हणाला :—' आपलेकडे देवपूजेच्या वेळीं आपण घंटा वाजवितों त्या वेळीं आपण घंटाच हलवितों ; जांगिळमामा म्हणाले:—' पण एखाद्या देवळांत समाराधना असली तर देवळांतील घंटा आपण लोलक हलवूनच वाजवितों.' वयस्य म्हणाला:—' पण तशा रीतीनें घंटा वाजविण्यांत कांहीं पुण्य नाहीं अशी ह्या लोकांची समजूत असेल!

एक घंटा वाजत होती तर तिचाच आवाज कानठाळ्या बसवीत होता; पण आतां एका मागून एक चार घंटा वाजूं लागल्या! आम्हीं सर्वांनीं कानांत बोटें घातलीं. वयस्य म्हणाला, ह्या घंटांमुळेंच पूर्वीचा बुरूज पडला असेल; आतां पुनः पडला तर घ्या काय? असें म्हणून वयस्यानें जिन्याकडे धांव घेतली व लाडिसामागून घाटएंजिन जावें त्याप्रमाणें मामांनींही त्याचें अनुकरण केलें. वाटेंत सिंदबाद उभा होता, त्याला टाळ-ण्याचा वयस्यानें प्रयत्न केला, तों दोरींत पाय अडकून सपशेल धरणीवर पडला. त्याला सावरण्यासाठीं सिंदबाद वांकला तों मामांना आपला वेग न आवरल्यामुळें ते त्याच्यावर आदळले व दोघेही खालीं आले. मी मामांना सांवरण्यासाठीं हात घातला तर तो चेंगरून त्याला रग लागली. वयस्य 'मेलों-मेलों' म्हणून ओरडूं लागला; मामा 'धांवा-धांवा' म्हणून ओरडूं लागले; सिंदबाद 'तोबा- तोबा' म्हणून ओरडूं लागला; व मी 'सोडा-सोडा' म्हणून ओरडूं लागलों! वरतीं चार घंटा पृथक् पृथक् वाजत होत्या व खालीं चार शंख होऊं लागले; त्यामुळें एक ऑर्केस्ट्राच निर्माण झाला! तेव्हां तेथील रक्षकानें येऊन मामांच्या पाठीखालीं काठी घालून त्यांना उच-ललें, तेव्हां माझा हात सुटला व मी वयस्याला उठविलें. मामांनीं काठीच्या साह्यानें आपला गुरुत्वमध्य जाग्यावर आणला व सिंदबादनेंही स्थितिस्थापक-तत्वाचा आश्रय केला. नंतर कमिशन भरवून चौकशी केली; तों कोणाला कांहीं विशेष इजा झाली नाहीं, असें दिसून आलें. मग मदत केल्याबद्दल

रक्षकाच्या हातावर कांहीं ठेऊन त्याला बजाविलें कीं, ही हकीकत इंडियन लोकांना–विशेषतः महाराष्ट्रीय लोकांना—सांगू नकोस.

दुसरे दिवशीं सकाळीं समुद्रस्नानाकरितां लिदो नामक बेटावर गेलों. ह्या बेटावर कांहीं पथिकालयें आहेत व कांहीं घरें आहेत. पण एकंदर वस्ती विरळ आहे. तथापि आहेत तीं घरें फार नामी आहेत. बंदरापासून स्नानगृहापर्यंत व दुसऱ्या एका ठिकाणापर्यंत टामरेळही आहे. सांमार्को बंदरावर आम्ही आगबोटींत बसून सुमारें पाव तासांत लिदो बंदरावर आलों; तेथून सुमारें पाऊण मैलावर स्नानाची जागा आहे तेथें गेलों. ह्या ठिकाणीं पीयरसारखी पण जरा जास्ती रुंद व आच्छादित अशी तक्तपोशीची जागा समुद्रांत नेलेली आहे व आंत एक उपहारगृह, हवा खात बसण्याची जागा, कांहीं दुकानें वगैरे आहेत. बाजूलाच स्नान करणाऱ्यांसाठीं खोल्या आहेत व तेथून स्नानाचे कपडे घालून समुद्रांत शिरावयाचें. ह्या ठिकाणीं खोल पाण्यासाठीं फार लांब जावें लागत नाहीं. थोड्याच अंतरावर गळ्यापर्यंत पाणी लागतें; तेथें समोर व दोन्ही बाजूंनीं मर्यादा घातलेली आहे. ही मर्यादा म्हणजे मधून खांब असून त्यांला आडव्या दोऱ्या बांधलेल्या आहेत. पाहिल्या प्रथम व्हिएन्नाप्रमाणेंच येथेंही मामांची स्थिति होते कीं काय अशी आम्हांस भीति वाटत होती. पण वर सांगितलेली व्यवस्था पाहिल्याबरोबर ती नाहींशी झाली. मग आम्ही सर्वजण आंत शिरलों. स्नान करितां करितां वयस्य एकदम म्हणाला ‘अरे, येथें दुसरे एक जांगिळमामा दिसत आहेत !’

मी पाहिलें तों खरेंच कोणी एक विशाळ प्राणी स्नानाला आलेला दिसला. तो पाठमोरा होता, पण त्याच्या डोक्याला तांबडी टोपी घातलेली दिसत होती. हा कोण प्राणी असावा असा विचार करीत असतां त्यानें आपलें तोंड इकडे केलें, त्याबरोबर आम्हांला हंसू लोटलें; कारण ते मामा

नसून त्या आत्याबाई होत्या ! मग दुसरीकडेही आम्हांला कोणी लतिकाबाई, कोणी तंगवसनाबाई अशा स्त्रिया स्नान करितांना दिसूं लागल्या.

तेथून आल्यावर मग आम्ही दोजीचा राजवाडा पाहण्यास गेलों. ह्या वाड्यांत बरींच मोठमोठीं दालनें आहेत. सगळीकडे नामांकित इटालियन चित्रकारांनीं चित्रें ठेवलेलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं फार सुरेख आहेत; परंतु वाड्याच्या भिंतीचा रंग उजळ नसल्यामुळें व चित्रेंही जुनीं झाल्यामुळें, तसेंच उजेड येण्याची व्यवस्था शास्त्रोक्त नसल्यामुळें एक प्रकारची उदासवाणी छाया दिसत होती. वाड्याच्या पटांगणांतच ( म्हणजे समुद्रापासून सुमारें १००—२०० फुटांच्या अंतरावर ) दोन विहिरी लहान आकाराच्या आहेत. ह्यांचें पाणी पिण्याजोगें असून सर्व शहरांतील पाण्यांत उत्तम आहे. समोरच एक रुंद जिना दिसतो त्याचें नांव ' राक्षसी जिना. ' तो चढून वर गेल्यावर सज्जा आहे; तेथून प्रवेश फी देऊन आंत जावयाचें. जिने चांगले ऐसपैस असून वाडाही बराच विस्तीर्ण आहे. ह्या वाड्यापैकीं कांहीं भाग दोजीला राहण्यासाटीं दिलेला असून बराच भाग कौन्सिलच्या बैठकी, दरबार व इतर कचेऱ्या यांच्यासाठीं योजिलेला होता. दरबारचीं दालनें बरींच लांबरुंद असून त्यांच्या छतावरही चित्रें काढलेलीं होतीं. वाड्यांत असलेल्या चित्रांपैकीं पुढील कांहीं चित्रें पाहण्यालायक वाटलीं.:—

दोजीनें पराभूत केलेला बादशहा बार्बरोसा हा पोपला शरण आला आहे.

पोप तिसरा आलेक्झांडर हा दोजीला अंगठी नजर करीत आहे. ह्याची गोष्ट अशी आहे कीं, बार्बरोसानें स्वारी केल्यामुळें पोप पळून व्हेनिसच्या आश्रयास आला. तेव्हां दोजीनें त्याला आश्रय देऊन बार्बरोसावर आपलें आरमार नेऊन त्याच्या आरमाराचा पूर्ण पराभव केला. परत अल्यावर पोपनें त्याला मोठ्या सन्मानानें एक अंगठी नजर करून म्हटलें 'आजपासून समुद्राचें प्रभुत्व मिळविल्याची खूण म्हणून ही अंगठी

घे. इतकेंच नाहीं तर ह्या अंगठीनें सिंधुदेवीशीं विवाहबद्ध हो. ( समुद्र हा शब्द युरोपांत स्त्रीलिंगी आहे, आपल्या भाषेंत समुद्राला स्त्रीलिंगी शब्द नाहीं ) व हिचा तुमचा पतिपत्नीचा संबंध झाला म्हणून अनंत कालपर्यंत ह्या दिवशीं दरसाल असाच उत्सव करीत जा.' तेव्हांपासून दरसाल दोजी आपल्या परिवारासह मिरवत जाऊन समुद्रांत एक अंगठी मोठ्या समारंभानें टाकीत असे !

दोजी दांदोळो हा बाल्डविन ह्यास कान्स्टंटिनोपलच्या सम्राट्पदाचा मुकुट घालीत आहे.

सांमार्कोच्या देवळांत क्रूसेडर लोक शपथा घेत आहेत.
ईजिप्तमधील खलीफाचा पराभव.
झारा शहर काबीज केलें. इत्यादि

एका दालनांत सर्व दोजींचीं चित्रें आहेत; परंतु मरिना फाळिएरो नांवाच्या एका दोजीचें नाहीं. ह्या दोजीचा अपमान एका सरदार घराण्यांतील तरुणानें केल्यामुळें त्याची चौकशी होऊन शिक्षा झाली, परंतु दोजीच्या मतानें शिक्षा फार थोडी झाली. आपला कांहीं मान रहात नाहीं असें त्याच्या मनानें घेतलें. त्याला असेच दुसरे असंतुष्ट लोक मिळून त्यानें सर्व बड्या लोकांविरुद्ध एक कट केला. परंतु कटांतील एका माणसाचें एका बड्यावर प्रेम असल्यामुळें त्यानें त्याला त्या दिवशीं अलग राहण्यास सुचविलें. तेवढ्यावरून कटाची बातमी फुटून दोजीची चौकशी झाली व त्याचा शिरच्छेद झाला आणि इतरांसही प्रायश्चित्त भोगावें लागलें.

ठिकठिकाणीं सिंहाचीं तोंडें असत, त्यांतून कोणाला चहाडी करणें असल्यास ती लेखी किंवा तोंडीं करावी; चहाडी कौन्सिल-ऑफ-टेनपुढें जायचीच, व त्यांचा दरारा इतका असे कीं, मनुष्य त्यांच्या तडाक्यांत सांपडला कीं गुप्त व्हावयाचा असा समज असे. वाड्यांत एके ठिकाणीं

एका खोलींतून दुसऱ्या खोलींतील बातमी ऐकण्यास व पाहण्यास छिद्र असे तें दाखविण्यांत आलें. तसेंच कैद्यांच्या कोठड्यांत एके ठिकाणीं प्रेत गुपचिप खालीं पाण्यांत सोडून देण्यास व्यवस्था होती तीही पाहिली. ती पाहून आम्हाला एक प्रकारची भीति वाटली. वयस्य म्हणाला 'अशा प्रकारच्या राज्यांत लोक कसे रहात असतील कोणास ठाऊक?' सिंदबाद म्हणाला 'अंः! त्यांत काय आहे? अशा तऱ्हेचा अनुभव मीं माझ्या आठव्या सफरींत स्वतः घेतला आहे!' वयस्य म्हणालाः–' मग तुझ्या आठव्या सफरीचा वृत्तांत आम्हाला एकदां सांगच.' सिंदबाद म्हणाला ' या इकडे आपण बाजूला बसूं.' एका मोकळ्या वातायनापाशीं द्वीपगुच्छलांछित नीलजलाब्धि-वरील समीरणामुळें सुखावह भासत असलेल्या आसनांवर बसल्या नंतर सिंदबादनें सुरुवात केली.—

**सिंदबाद याची आठवी सफर**—सातव्या सफरीनंतर मीं निश्चय केला होता कीं, आतां पुनः सफरीच्या म्हणून भानगडींत पडावयाचें नाहीं. त्याप्रमाणें कांहीं वर्षें मीं सुखांत घालविलीं. परंतु माझी प्रिय पत्नी होती ती वारली. त्याचप्रमाणें माझ्या मुलांमध्यें भांडणें लागलीं. तेव्हां मग पुनः एकदां पर्यटनला निघण्याचें मीं ठरविलें. बरेचसे व्यापारी एक जहाज ठरवून पश्चिमेकडल्या मुलखांत व्यापाराकरितां जात होते त्यांनाच मी मिळालों. पहिल्याप्रथम आमचा प्रवास फार सुखकर झाला. दमास्कस, केरो वगैरे शहरांजवळ असलेला माल विकून दुसरा माल घेतला व तुन्नेस (Tunis) नामक बंदरीं जाण्याकरितां जहाज हांकारलें. तीन दिवसांचा प्रवास केल्यानंतर एके दिवशीं समुद्रांत दूर खडकाप्रमाणें कांहीं दिसूं लागलें. नाखुद्यानें कांहीं वेळ तिकडे नजर लावल्यानंतर तो एकदम छाती बडवून घेऊं लागला. तो म्हणाला " समोर दिसत आहे हे 'सांगडमासे' म्हणून प्रचंड मासे आहेत त्यांचें सैन्य आहे. ह्यांच्या तडाक्यांत जहाज सांपडलें म्हणजे तें ते सपाट्यास

फोडून टाकतात व आंतील मनुष्यांस खाऊन टाकतात.” हें ऐकून सुखाचा जीव धोक्यांत घातल्याबद्दल मला किती पश्चात्ताप झाला असेल ही कल्पना करा. मग मीं नाखुद्यास विचारिलें कीं, ह्याला कांहीं उपाय नाहीं काय? तो म्हणाला ‘ ह्यांच्या वाटेंतून आपण बाहेर गेल्यास सुरक्षित राहूं.’ त्याप्रमाणें आम्हीं आपलें गलबत बाजूस नेलें. पण त्या ओळीच्या अगदीं बाहेर आम्हांस जातां आलें नाहीं. अगदीं कडेच्या दोन माशांनीं फटकारे लगावल्यामुळें जहाजाचे पार तुकडे झाले व बहुतेक लोक प्राणास मुकले. मला मात्र एक रुंदसें फळकट सांपडलें; त्याच्या आधारानें दोन दिवस मी पाण्यांत वाहवत होतों. तिसऱ्या दिवशीं मी तीराला लागलों. कपडे वगैरे वाळवून परमेश्वराची प्रार्थना केल्यावर जवळ झाडी दिसत होती तिकडे वळलों. भुकेनें प्राण कासावीस झाले असल्यामुळें तेथील कांहीं फळें तोडून खाल्लीं. त्याबरोबर तेथील एका माणसानें येऊन मला पकडून आपल्या मुख्याकडे नेलें. हे लोक सिद्दी लोकांप्रमाणें काळेकुळकुळित होते; परंतु ह्यांचीं नाकें त्यांच्यापेक्षां उंच असून ओठही लहान होते. हे लोक एक प्रकारचे कपडे वापरीत ते फार गुळगुळीत व चकचकीत दिसत. हे एका प्रकारच्या गवताचे होते असें मला कळलें. त्या मुख्यानें मला आपल्या राजाकडे नेलें. त्या लोकांची भाषा मला येत नसल्यामुळें मीं खुणेनें शक्य तितकें सांगितलें. नवीन प्रकारचा मनुष्य पाहून राजानें मला आपल्याजवळ ठेवून घेतलें व माझी उत्तम बरदास्त ठेविली. पुढें मीं तेथील एक वेळूचा तुकडा घेऊन त्याचें अलगुज केलें व तें वाजवूं लागलों. तें पाहून राजा इतका खुष झाला कीं, त्यानें मला बहुमोल नजराणे देऊन आपल्या एकुलत्या एक मुलीला तें वाद्य शिकविण्यास सांगितलें. पुढें कांहीं दिवसांनीं राजा म्हणूं लागला कीं, ‘सिंदबाद, माझ्या मुलीशीं तूं लग्न करावें अशी तिची फार इच्छा आहे.’ मी राजास म्हटलें ‘माझें आतां ५० च्या जवळ जवळ वय झालें आहे, तेव्हां

असला भलता आग्रह करूं नये.' पण राजाचा अति आग्रह पडला व त्याचें न ऐकल्यास मारून टाकण्याची त्यानें धमकी दिल्यामुळें, मला लग्न करणें भाग पडलें. पुढें राजा वारल्यावर माझी बायकोच राज्याची मालकीण झाली. तिला मी आधींच महमदी धर्माची दीक्षा दिली होती, त्यामुळें ती त्या देशांतील धार्मिक आचार पाळीना. आधींच मी परका मनुष्य मध्येंच शिरल्यामुळें तेथील शिष्ट लोकांत असंतोष उत्पन्न झाला होता तो ह्यामुळें जास्तच वाढला; व एके दिवशीं मी गांवाबाहेर हिंडावयास गेलों असतां तेथील कांहीं लोकांनीं मला पकडलें व मला मारून टाकण्याचा बेत केला. मी त्यांस पुष्कळ सांगितलें कीं, मला येथें राहण्याची हौस नाहीं; मला दुसऱ्या मुलखांत पाठवून द्या. पण तें त्यांस पटलें नाहीं. मग त्यांनीं मला दुष्टपणानें मारण्यासाठीं एक युक्ति योजली. तेथें बुचाचीं मोठमोठीं झाडें असत. त्यांपैकीं एका झाडाच्या लांकडाची पेटी करून त्यांत मला घातलें व पेटी बंद करून एका उंच कड्यावरून मला समुद्रांत ढकलून दिलें. त्या वेळीं माझी काय स्थिति झाली असेल त्याची कल्पना करा. सुदैवानें मी उभा पाण्यांत पडलों आणि त्यांनीं डोक्याकडील भाग रुंद व जाड केलेला असल्यामुळें तो पाण्याच्या बराच वर आला. मजबरोबर नेहमीं एक सुरा असे. त्या सुऱ्यानें मीं भोंक पाडून एक तुकडा काढला व हवा येण्यास मार्ग केला. मग पुढें काय करावें अशा विचारांत असतां कोणी तरी पेटी ओढीत आहे असा भास झाला व एकदम अंधेर होऊन आंत कांहीं चिकट पदार्थ येऊं लागला. त्याबरोबर मीं गवाक्ष बंद केलें. मग मला भासलें कीं, मी पाण्यांत तर कांहीं नाहीं पण कोठें तरी जात आहें असें मला वाटलें. तेव्हां मला कल्पना आली कीं, कोणी तरी एखाद्या मोठ्या माशानें मला गिळलें असावें. ही कल्पना आल्याबरोबर मी बेशुद्ध झालों. शुद्धीवर आल्यावर मी पाहतों तों मी पेटींत नसून एका गलबतावर आहे.

त्या लोकांनीं मला सांगितलें ,कीं, त्यांचे गलबतावरून त्यांना एक चमत्कार दिसला; तो असा कीं, ‘एक डोंगराएवढा मोठा . मासा समुद्रांतून जात असतांना फार खवळलेला दिसला. तो उताणापाताणा होत होता. मध्येंच समुद्रांत बुडी मारी, पुनः वर येई. इतक्यांत तो ओकला व त्याच्या तोंडांतून एक पेटी बाहेर आली तेव्हां मासा निघून गेला.’ मग त्या गलबतावरील लोकांनीं ती पेटी वर ओढून घेतली व पाहतात तों आंतून बंद केल्यासारखें एक भोक दिसलें. तेव्हां त्यांनीं ती पेटी फोडली. आंतमध्यें मनुष्य दिसल्या-बरोबर त्यांना आश्चर्य तर वाटलेंच, पण त्याच्या अंगांत ऊब असलेली पाहून त्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें! मग गलबतावरील वैद्यानें मला जिवंत करण्याचा प्रयत्न केला व तो यशस्वीही झाला. मी आपली हकीकत त्यांस सांगितली, तेव्हां ते म्हणाले कीं इकडील किनारा खराब असल्यामुळें गलबतें तेथें जात नाहींत; परंतु तेथें एक मोठें राज्य आहे, असें ऐकिलें आहे. मग त्यांनीं आपापसांत वर्गणी करून मला थोडें भांडवल दिलें. बंदरी पोंचल्या-वर मीं त्या भांडवलानें व्यापार करून बराच पैसा जमविला; ती हकीकतही मनोरंजक आहे पण ती पुनः केव्हां तरी सांगेन. घरीं परत आल्यावर पुनः आतां सफरीला जावयाचें नाहीं असा कृतनिश्चय केला.

वयस्यः—इति सब्मरीनप्रवासपुराणं समाप्तम्।

जेवणास परत येत असतां एका माणसानें गांठून आम्हांस विनविलें कीं, आमचा मोझेइक वस्तूंचा कारखाना पाहण्यास या. तेव्हां तिसरे प्रहरीं येण्याचें कबूल करून होटेलांत परत आलों तों तेथें दुसऱ्या एकानें गांठून दुसरा एक मोझेइक कारखाना पाहण्यास जाण्याचा आग्रह केला. त्यालाही तिसरें प्रहरीं येण्याचें कबूल केलें. तो गेल्यावर होटेलमधला एक नोकर म्हणाला ‘संभाळा, कारण हे लोक तुम्हांला दसपट किंमत सांगून हलका माल तुमच्या गळ्यांत बांधतील.’

जेवण झाल्यावर आम्ही ते कारखाने पाहण्यास गेलों. मोझेइक कारागिरी म्हणजे निरनिराळ्या रंगीत कांचांनीं व कांचांच्या तुकड्यांनीं वस्तु तयार करणें. अनेक प्रकारच्या अति सुंदर वस्तु तेथें पाहण्यास सांपडल्या. पेले, बरण्या वगैरे लहान मोठीं भांडीं, घड्याळाचीं लॉकेट्स, अत्तराच्या कुप्या वगैरे इतर लहान पदार्थ सुंदर रीतीनें मांडून ठेवलेल्या खोल्यांच्या खोल्या आम्हांस दाखविल्या. कांचेच्या तुकडयांनीं रंगीत चित्रें, देखावे वगैरे तयार करीत असलेले लोक आम्हांस तेथें दिसले. त्याचप्रमाणें अलीकडे नाटकीय राजांच्या पगडयांना व गणपतीच्या मूर्तींना आवश्यक झालेले कांचेच्या केसांचे तुरे करण्याची कांचेची तार कशी तयार करितात, तें पाहिलें. कापसा-पासून यंत्रानें जसें सूत निघतें त्याप्रमाणें वितळलेल्या कांचेपासून एका रहाटा-वर ही काढीत होते. वयस्य म्हणाला 'ह्या तारेची रुंदी काय आहे?' तो मनुष्य म्हणाला 'तार इतकी बारीक आहे कीं रुंदी मोजतां येणें शक्य नाहीं!' वयस्य म्हणाला 'तारेची लांबी, वजन व विशिष्ठगुरुत्व ह्यांवरून रुंदी सहज काढतां येईल.' त्या मनुष्यावर कांहीं विशेष प्रकाश पडलेला दिसला नाहीं, तेव्हां वयस्यानें त्याला समजावून सांगण्याचें मनांत आणलें; तेव्हां मीं वयस्याला म्हटलें 'शिकविण्याबद्दल तुला पगार कांहीं मिळणार नाहींच पण त्याच्या कामांत व्यत्यय आल्यास त्याचा मात्र पगार बुडेल!' कांहीं माल घ्या म्हणून कारखानदारानें आग्रह केला. तेव्हां पुनः येऊं तेव्हां घेऊं, असें सांगून तेथून निघालों. मग आम्हीं चित्रशाळा पाहण्यास गेलों. ही चित्रशाळा फार प्रसिद्ध असून नामांकित चित्रकारांचीं चित्रें येथें आहेत व 'रस्किन' ह्या प्रसिद्ध रसज्ञानें ह्यासंबंधानें एक पुस्तकच लिहिलें आहे म्हणे! कांहीं कांहीं चित्रें पाहून आम्हांला आनंद झाला. पण जांगिळमामा म्हणाले त्याप्रमाणें ४० लाडू, ४५ करंज्या आणि ५० अनरसे खाल्यावर जिलब्या अति मधुर असल्या तरी रुचणार काय आणि खाणार किती? वयस्य म्हणाला 'मामा

ह्या तुमचा विनय आहे.' हें ऐकून मामांचा चेहरा जास्तच विनयी दिसूं लागला. मी म्हटलें 'वयस्या, जाऊं दे ! उगीच त्यांचा विनय वाढवूं नकोस. इतर मनोविकाराप्रमाणेंच विनयाचाही अतिरेक होणें चांगलें नाहीं.'

आम्ही तेथें होतों त्या दिवशीं रेदेंतोर नामक साधूंचा कांहीं उत्सव होता, त्यामुळें रात्रीं दारूकाम सुटावयाचें होतें; म्हणून लवकर आम्ही परत येऊन जेवण उरकलें. प्रथम आम्हीं पियाझ्झा सांमार्कोकडे गेलों. हा कांपानीलच्या पायथ्याशींच असून दिवसा पाहिला होता; पण दिवसापेक्षां रात्रीं ह्याला फार शोभा आलेली होती. हें एक मोठें पटांगण असून ह्याच्या तीन बाजूंनीं दुमजली इमारती आहेत, आणि चवथ्या बाजूस जरा वाट सोडून सांमार्कोचें कथीड्रल आहे. तीन बाजूंनीं दुमजली इमारती आहेत त्या एकीस एक जोडून आहेत. ह्या-पूर्वींचे हे राजवाडे आहेत, पण सध्या येथें तळमजल्यावर सर्व दुकानें आहेत. दुकानापुढें इमारतींतच पडवीप्रमाणें रस्ता आहे. ह्या पडवीला लांबीच्या बाजूस सुमारें १००।१२५ महिरपी आहेत व रुंदीच्या बाजूस चाळीस एक आहेत. तळमजल्यावरील प्रत्येक महिरपीवर दुसऱ्या मजल्यास दोन आहेत व ह्या सर्व महिरपींतून विजेच्या दिव्यांच्या ओळी लावून रोषनाई केली होती. ही मजा एखाद्या दिवाणखान्यांत झालरीला मोत्यांच्या सरी लावाव्यात त्याप्रमाणें दिसत होती. मध्यें एके ठिकाणीं बँड ( अँग्लो व्हर्नाक्युलर पद्धतीप्रमाणें 'बेंडबाजा' ) वाजत होता व पटांगणांत खूप गर्दी होती. तें विस्तीर्ण पटांगण, त्या दीपकमाला व तो जन-समुदाय पाहून मौज पहाण्यासाठीं आम्ही क्षणभर उभे राहिलों. त्या वेळीं जांगिळमामा म्हणाले, ' माझ्या मनांत एक फार मोठी महत्त्वाकांक्षा आहे; तिची मला हें पटांगण पाहून आठवण झाली.' ती महत्त्वाकांक्षा काय हें विचारणें आम्हांला भाग पडलें. मामा म्हणाले: ' मुंबईच्या बोरी-बंदर स्टेशनावर उभा असतां मला अशी प्रेरणा झाली कीं, हे विस्तीर्ण

प्लाटफार्म कशा रीतीनें उपयोगांत आणले असतां उत्तम शोभतील ! तर अशा रीतीनें कीं, एक मोठी समाराधना घालावी. एवढी कीं, अठरापगड जातींचें एक कोटिभोजन होऊं शकेल ! जी. आय. पी. कंपनीकडून तिच्या आगगाड्या आणखी प्लाटफार्म भाड्यानें घेऊन देशावरचे लोक तेथें गाड्या भरभरून आणावयाचे व जेवण घालून परत पाठवावयाचे. प्रत्येक प्लाटफार्मवर हजारप्रमाणें प्रत्येक पंक्तीला सहा सहस्रभोजनें उठवायला कांहीं हरकत नाहीं. दिवसांतून पांच सहा पंक्ती म्हटल्या तर तीन दिवसांत एक लक्ष माणूस होईल; व एक महिन्यांत दशलक्ष भोजन होईल. कोटिभोजन हवें असल्यास इतर स्टेशनें घेतलीं म्हणजे काम होईल. वाढण्याचें काम फारच सोपें ! प्लाटफार्ममधील रुळावर एक लाडिसांची सर्विस ठेवावी व प्रत्येक लाडिसावर एका गार्डच्या ताब्यांत जेवणाचें सर्व सामान ठेवावें. खर्च कांहीं फार लागणार नाहीं. माणशीं रुपया जेवणावळ; १॥ रुपया ( सरसकट ) गाडीभाडें व इतर कांहीं; मिळून माणशीं ३ रुपये ह्या हिशोबानें फक्त ३ कोट रुपयांत हें प्रचंड काम सहज आटपून जाईल !'

हिंदुस्थानची स्थिति खालावण्याचें एक मोठें कारण मीं ऐकिलें आहे.- तें हें कीं, हिंदुस्थानच्या लोकांच्या कल्पनाच क्षुद्र; विशाल व अचाट कल्पना बसविण्याची त्यांची पात्रताच नाहीं. हें कारण मला पूर्वी पटत नव्हतेंच; पण आतां तर खात्रीच झाली कीं त्याचें आम्ही दुसरें कांहीं कारण शोधलें पाहिजे.

येथील शोभा पाहून झाल्यावर पुढें जाऊन एका घांटावर आलों. तेथें जवळच एका बेटावरून दारूकाम सोडण्यांत येत होतें. अनेक बाण आकाशांत जाऊन त्यांच्यांतून अनेक प्रकारच्या आकृति निघत होत्या. पण ह्या दारूकामापेक्षांही पाण्यावरील शोभा फारच प्रेक्षणीय होती. ह्या व समोरच्या किनाऱ्यावर जिकडे तिकडे दिवे लावलेले असून त्यांचीं लहान मोठीं विविध रंगांचीं प्रतिबिंबें पाण्यांत पडून पाण्याच्या लहरींमुळें भग्न, प्रसृत व आंदोलाय-

मान होत होतीं. पाण्यावर गोंदुला संचार करीत होत्या त्यांच्याही दिव्यांचीं प्रतिबिंबें पाण्यांत पडून सर्व जलपृष्ठावर क्षणोक्षणीं नवीन रूप धारण करणारे गालिचे पसरले आहेत कीं काय असा भास होत होता. आषाढ शुद्ध सप्तमीचा दिवस असल्यामुळें व्हेनिस नगरी जणुं काय भरजरीचा रत्नखचित अस्मानी शालू परिधान करून सागराशीं क्रीडा करण्यांत दंग होऊन गेली आहे असें भासत होतें. लहान लहान १०।१२ माणसें नेणाऱ्या भाडयाच्या गोंदुला बऱ्याच असून मधून मधून जरा मोठ्या आकाराच्या व पुष्पमालादिकांनीं शोभिवंत गोंदुलाही दिसत होत्या. त्यांवर इतर रोषनाईमध्यें जपानी कंदिल लावलेले होते व आंत टेबलें मांडलेलीं होतीं. त्यांच्या दोन बाजूंस नानातऱ्हेचे मनोहर वेष धारण केलेले विलासी युवयुवती–गण दिसत होते. त्यांच्या हातांत वाद्यें होतीं व युवतींच्या मधुर गायनाला युवक वाद्यांनीं साथ करीत होते. तो सोहळा पाहून वयस्य म्हणाला– 'आपणास एखाद्या गोंदुलांतून जातां येईल काय ? भाडें काय आहे तें चौकशी करूं ?' भाडें फक्त माणशीं एक आणा होतें. तेव्हां आह्मीं चौघेजण एका नावेंत बसलों. नांव एका बाजूस कलूं लागली ! तेव्हां मी मामांशेजारीं बसलों होतों तो उठून समोर वयस्य व सिंदबाद ह्यांच्यामध्यें गर्दी करुन बसलों. नावाडीही जरा पलीकडच्या बाजूस सरला तेव्हां नाव बेतावर आली. नावेंत बसून जात असतां तेथील शीतळ, सुगंधित व मंद मारुत, जलपृष्ठावरील तरंगविभ्रम व दीपप्रतिबिंबलीला, शेजारून जाणाऱ्या विलासनौकांमधून ऐकूं येऊं लागावा न लागावा तों निघून जाणारा गायनवादनध्वनि, आकाशस्थभगवान्सुधांशुसमर्पित चांद्रिका, दुसरे बाजूस आकाशांत मधून मधून आरोहण करणारीं विस्तीर्ण अग्निपुष्पें ( दारूकाम ), तसाच दोन्ही तीरांवरील दीपोत्सव आणि अस्फुट असा जनसंमर्दविनिर्मित कोलाहल ह्या सर्व गोष्टींचा परिणाम एकसमयावच्छेदेंकरून मनावर होऊन मन एक प्रकारच्या विलक्षण

आनंदानें भरून जात होतें. थोड्या वेळानें नावाड्यानें आह्मांस पलीकडच्या तीरावर उतरविलें. पण तेथें फार वेळ न थांबतां आह्मी पुन्हां नावेंत बसून परतलों. बसल्या बसल्या वयस्य म्हणाला ' मामा, मी कविता करूं का ? ' मामा म्हणाले ' मी नुक्ताच पोट भरभरून जेवलों आहे ! ' वयस्य म्हणाला ' मी कवितेचा विषय गद्यांतच सांगतों. ' मामा म्हणाले ' ठीक आहे ! ह्या आनंदाचे वेळीं तुला शंभर खून माफ आहेत ! ' मग वयस्य म्हणाला 'मला असें स्वप्न पडलें कीं, मी चंद्रापीड असून एका किन्नरमिथुनाच्या मागें लागून —'

मी:—इंद्रायुध बरोबर असेलच्च !

वयस्य—हो, पण तो फार दमल्यामुळें त्यालाच खांद्यावर घेऊन नेत होतों ! आतां पुनः मध्यें मध्यें प्रश्न विचारूं नकोस ! (स्वप्न) पौर्णिमा मध्यरात्रीची वेळ होती. मी अच्छोद सरोवराच्या कांठीं आलों, तों तेथें माझी प्रियतमा कादंबरी माझी वाट पहात उभी होती.

मामा—बाळूबगडीला पाजून निजविलें होतें कीं त्यांना घेऊन आली होती.

वयस्य—साळीच्या लाह्यांकरितां पैसा मागण्यासाठीं त्यांना घेऊन आली होती !! मामा, तुम्ही अगदींच गद्य कसे बोवा? (स्वप्न) नव तारुण्य अंगांत मुसमुसत असलेल्या माझ्या त्या प्रियतमेचें स्वागत करून जवळच बांधलेली एक विलासनौका मी सोडली. ती नौका उंची कापडानें मढविलेली असून विलासाचे सर्व पदार्थ आंत तयार ठेवले होते.

मामा— म्हणजे चहा, चिवडा, चिरूट ?

वयस्य— अहो, तुमच्या भारंभार मिठाई असून मणभर बासुंदी होती. ( स्वप्न) आरोहण करून किनाऱ्यापासून बरेच दूर गेल्यावर तेथें एक

कमलिनीपुञ्ज दिसला. कमलिनीचीं पानें त्या चंद्रप्रकाशांत मोराच्या पिसाऱ्यावरील डोळयांप्रमाणें शोभत होतीं.

मामा——जेवायला वाढण्याएवढीं होतीं काय ?

मी——जाऊंद्या मामा ! शिजत असलेल्या पदार्थाला असें मध्यें डिवचलें तर तो बिघडून जातो.

वयस्य——मधून मधून कमळें वर आलेलीं होतीं, तीं केव्हां केव्हां आमच्या स्वागतार्थ माना डोलवीत होतीं. अशा त्या नितांतरमणीय स्थलीं नौका थांबवून मी प्रियसखीशेजारीं आसनावर बसावयास जाण्यास निघालों; पण तितक्यांत थबकलों. कारण प्रियसखी कोणती हें मला ओळखतांच येईना ! भोंवतालीं असलेल्या कुमुदिनींत एकदां, तर जलतरंगावर प्रतिबिंबरूपानें दृश्य होणाऱ्या अनेक चंद्रमंडलांत एकदां असें प्रियसखीचें वदन लुप्त होत होतें !

मी——शाबास ! वयस्या ! कुमुदिनीमधून तिच्या अनुपम श्वाससुगंधानें व प्रतिबिंबित चंद्रमंडलांतून तिच्या कलंकराहित्यामुळें तूं तिचें वदन ओळखलें असशीलच; पण आतां आपली नौका ह्या क्षारोद सरोवराच्या तीरावर लागल्यामुळें आपणांस गोष्ट लांबणीवर टाकणें भाग आहे.

वयस्यः——झालीच माझी गोष्ट. माझें स्वप्न येथेंच संपलें.

मामाः——पुढल्या खेपेस स्वप्न पडलें तर असें भलत्याच वेळीं त्याला सोडूं नकोस.†

होडीचा परित्याग करून आम्ही मध्यरात्रीचे सुमारास घरीं आलों. निजावयास जाण्यापूर्वी आह्मीं विचार करून दुसरे दिवशीं दुपारचे गाडीनें

---

† येथपर्यंतचा मजकूर १९१२–१३ सालीं केसरींत आलेला आहे.

व्हेनिस सोडून निघण्याचा बेत ठरविला. जांगिळमामा म्हणाले “ मला आतां तुमच्या बरोबर यावयाचें नसल्यामुळें माझी अशी सूचना आहे कीं आपण सकाळीं लिदो बेटावर जाऊन समुद्रकांठीं पिकनिक करूं या. ” ही कल्पना सर्वांस पसंत पडली. त्याप्रमाणें सकाळीं सज्ज होऊन बरोबर तहान-लाडू भूक-लाडू घेऊन स्टीमरनें लिदो बेटावर आलों. बाथमध्यें स्नान करून आम्हीं एका वृक्षाखालीं तळ ठेवला. मामा होस्ट ( यजमान ) झाले व आम्हीं तिघेजण कोंबडीच्या पिलांप्रमाणें त्यांच्या भोवतालीं बसलों. मामा म्हणाले “ सुहृदा, तुला त्रिसुपर्ण येतें मला माहित आहे. तर आम्हीं पात्रांची सिद्धता करतों तोंवर तूं त्रिसुपर्ण म्हण म्हणजे आपल्या हिंदी संस्कृतीचा ध्वज येथें अदृश्य रीतीनें रोंवला जाईल.” तेव्हां ‘ करिष्ये वचनं तव ’ असें म्हणून मी मुक्त कंठानें “ ब्रह्ममेतुमां ” चा सपाटा लावला. माझें म्हणणें संपत आहे तों एक गृहस्थ आमचेकडे आले व मराठींत म्हणाले “ आपण महाराष्ट्रीयच आहां काय ?” सिंदबादनें कांहीं वेळ टक लावून त्यांजकडे पाहिलें व म्हणाला “ कोण, गलिव्हर ! ” तो गृहस्थ म्हणाला “ ओहो, सिंदबाद ! मी प्रथम तुला ओळखलेंच नाहीं. ” वयस्य म्हणाला “ सिंदबादच्या हनुवटीवर ऊर्ध्व-मूलमधःशाख असा कांहीं नवीन प्रकार झाला आहे त्यामुळें असें झालें असेल ” मग त्यानें नजर टाकून इतरांना ओळखलें व म्हणाला “ हा तर वयस्य, आणखी हा सुहृद ! खरें म्हटलें तर सुहृदचा आवाज मी ओळखावयास पाहिजे होता. ” मामांची त्याची ओळख नसल्यामुळें मीं मामांस त्याचा परिचय करून दिला कीं “ ब्राबडिंगनाग व लिलिपुट येथें प्रवास करून आलेले, जोनाथन स्विफ्टचे मानसपुत्र, गलिव्हर † ते हेच. ”

---

† स्विफ्टच्या “ गलिव्हर्स ट्रॅव्हल्स ” ह्या पुस्तकाचें मराठी भाषांतर झालेलें आहे.

मग मामांच्याकडे बोट दाखवून मी गलिव्हरला म्हटलें " ज्या सुपुत्राच्या योगानें धरणीमातेला ' मेदिनी ' असें नांव पडलें ते जांगिळमामा हेच." मग मी गलिव्हरला विचारलें " तूं आतां येथें कोणिकडे ? " गलिव्हर म्हणाला " मला चित्रकलेची जरा हौस आहे व येथील चित्रसंग्रह फार नामांकित आहे तो पहाण्यास आलों होतों. आज दुपारीं येथून फ्लॉरेन्सला जाणार आहें. कारण तेथील चित्रसंग्रह कलेच्या दृष्टीनें येथील संग्रहापेक्षांही मौल्यवान् आहे. आज सकाळीं येथें स्नान करून माज पहात बसलों होतों. तों " मधु वाता ऋतायते मधु क्षरान्ति सिंधव :" हे शब्द ऐकूं आले. मग रहात्रेनाच ह्मणून इकडे आलों." मी म्हटलें " मग हा योगायोगच म्हणावयाचा. कारण आम्हीही दुपारच्या गाडीनें फ्लॉरेन्सलाच जाणार आहों." नंतर आम्ही गलिव्हरला पंक्तीस घेतलें. त्यानेंही बरोबर फराळाचे पदार्थ आणले होतेच. सुरवात करण्यापूर्वी आम्ही " यन्तु नंदयो " म्हणून हरहर महादेवाचा एवढा मोठा घोष केला कीं "नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन्।" मामांच्यासाठीं एक स्पेशल हँपर आणला होता, त्यांतील अर्धाअधिक खलास झाल्यावर मग त्यांना बोलण्यास फुरसत झाली. ते म्हणाले "आजच्या प्रसंगानें आपल्या लग्नकार्यांतील मेजवानीची आठवण होत आहे, तर त्यावेळीं जसे श्लोक ह्मणण्यांत येतात तसे आतां कां म्हणूं नयेत ? " सिंदबाद म्हणाला " तसल्या पंक्तींत व आजच्या पंक्तींत भेद आहे तो मनांत आणतां मी अशी सूचना करितों कीं कोणास कांहीं विनोदी काव्य येत असेल तर तेंच श्लोकांचे ऐवजीं म्हणावें. " ही सूचना सर्वानुमतें पसार झाली. पहिला मान यजमानांनींच घ्यावा असें सर्वांचें म्हणणें पडल्यावरून मामांनीं पुढील काव्य सत्यविजय नाटकांतील "नृपतनयेवर मन हें माझें" ह्या चालीवर ठेक्यांत म्हणून दाखविलें:—

( ताल- पहिल्या दोन ओळी धुमाळी, पुढें दादरा. )

हां हां म्हणतां फस्त करुनि मी टाकिन हंडाभर चिवडा ।
भजीं:ताटभर शेव शेरभर थालिपिठाचा थोर वडा ।
बासुंदी पुरी । वहार ती करी ।
बरफि केशरी । जिलबि गोजिरी ।
विविध त्या खिरी । मधुर बहुपरी ।
अनरसे भरीं । मीं निजोदरीं ।
करंज्या खाईन । श्रीखंड झोडीन । हातहि मारीन । लाडूवरी ॥
हवा पहा । मला चहा । हवा पहा । मला चहा ॥ हां हां० ॥

नंतर मी पुढील दोन मंगळाष्टकें म्हटलीं:—

झाल्या यादि करोनियां कटकटी झाला गडगनेरही !
वाद्यां पास कमेटिचा मिळविला आली घटांची वही ।
झालें तोरण बोहलें चुरमुऱ्याचे लाडुही जाहले ।
दारीं मंगलमूर्तिचित्र बसलें कुर्यात् सदा मंगलम् ॥१॥
झाल्या पांच खिरी बहू शिपतरें त्या पापड्या जाहल्या ।
हुंडा छंछन मोजला वधुवरां मुंडावळी बांधल्या ।
झाला तो मधुपर्क भिक्षुकगणीं अंतःपटा ताणिलें ।
पाही चोरुनियां वधूसि वर तो कुर्यात् सदा मंगलम् ॥ २ ॥

सिंदबादनें पुढील चुटका म्हटला:—

काळ्या मांजरानें उंदीर खाल्लारे ।
लठ्ठ्या बोक्यानें उंदीर खाल्लारे ॥
शेपुट खाल्लें डोकें खाल्लें इतर भागही सगळा ।
खाउनि टाकी, उरे न बाकी, कीर्ति न खाऊं शकला ॥ काळ्या० ॥

गलिव्हरनें एकच श्लोक मालिनी वृत्तांत म्हटला, तो असा—

खडतर तप केलें मोडिलें एक तासा ।
सुरहि सदय झाले दीधला एक पैसा ॥
नगर बघुनि मोठें घेतले चूरमूरे ।
जगभरि यश झालें मारिती शेण पोरें ॥

वयस्यानें " भक्तिसुधारस लंपट मधुकर " ह्या चालीवर पद म्हटलें:-

गाणें म्हणणें असे तुम्हां जर ताल सुरावर गावें तें ।
उगाच ना तर सुटा ओरडत, काय मजा त्या मधिं येते।
चाल—गाढव् गाई कोकिल् गाई दोघें गाती गान ।
एका म्हणती छान् । दुसऱ्या मिटती कान् ।
म्हणुन सांगतो वयस्य तुम्हां राखा अपुला मान ॥ गाणें० ॥

सर्वांचें भोजन झाल्यावर मी म्हणालों "वयस्याला 'बाळूरायाची काकड-आरती' म्हणून एक कविता येते आहे ती ऐकण्यासारखी आहे. " हें ऐकून बरेच आढेवेढे घेऊन लोकाग्रहास्तव म्हणून वयस्यानें ती म्हणून दाखविली.

## बाळुरायाची काकडआरती

उठा उठा बाळेश्वरा! नेत्रयुग्म किलकिलें करा;
चिपडें थोडीं बाजुस सारा । हस्त जरा हलवोनी । १
जरी डोळे मिटती पुन्हां । हस्त ताठ मागें ताणा;
आळस द्यावा रेंकताना । जृंभानना पसरोनी । २
स्मरण करा आई! आई! । ना तर बाबांचें लवलाहीं;
उत्तर देतां कोणि न कांहीं । तान द्यावी विशाळ । ३
खर्ज मध्यम तार स्वरीं । गायन व्हावें प्रहरभरी;
निद्राजाड्या हरण करीं । जें सत्वरीं पावन । ४

राहति नयनीं अश्रू उभे । संगम चिपुडांचा त्या लाभे;
देखावा मग अपूर्व शोभे । धांवति लोभें मक्षिका । ५

नासिकेचे प्रवाह दोघे । मुखिंचा मधुरस पंचम निघे
मूत्रस्थानीं धार लागे । षड्रस अवघे लोटले ॥ ६

गायन ऐकुनि मंजुळ सुरीं । कुक्कुट मोदें सुस्वर धरी;
काकमालिका छप्परीं । ताल धरी मुखानें ॥ ७

रात्रीं उसळी खाल्लया जरा । उदराचा तो होय नगारा;
परिमळ सुटे फरा फरा । वेळ बरा साधला ॥ ८

रोषरस, त्वेषरस, । पश्चात्तापाचाही रस;
शोकरस, करुणरस, । कटुवच रस सहावा ॥ ९

सप्तम तीव्र क्षुधा लागतां । अष्टम तहानेचा तत्त्वतां ॥
शेवटचा तो थप्पड खातां । नच वर्णितां वर्णवे ॥ १०

ऐसे नव रस ते योजुनी । गायन चाले विविध स्वनीं;
गर्दभाचार्य लज्जित मनीं । त्वरा जनीं जाहली ॥ ११

गान परिसाया धावले । मेघहि पाण्यानें जे भरले;
थोर शब्दें ते गडगडले । मज वाटलें टाळ्या ह्या ॥ १२

धरणीवरती पडती धारा । वाजे खिडकीमधुनी वारा;
गमला मज हा प्रयत्न सारा । वन्स्मोअरा कराया ॥ १३

गायनरंगीं वादन तदा । होई चालू तें बद्बदा;
कर हाणुनी भूवर सदा । किंवा कदा मस्तक ॥ १४

मधुनी मधुनी शंखध्वनी । मिश्रित होई तो वादनीं;
ढुंगण भूवरतें हपटोनी । तोष कानीं देतसे ॥ १५

नृत्याचेही प्रकार थोर । वर्णन करवे नच ते साग्र
वाळुदास हा कविवर । बाळेश्वर प्रसन्न ॥ † १६

भोजन व संगीतसमारंभ उरकल्यावर आम्ही स्टीमरकडे परत जावयास निघालों. जातांजातां वयस्य म्हणाला " कायरे गलिव्हर, तूं मघाशीं मामांकडे टक लावून पहात होतास ?" तुला ब्राबडिंगनागचे लोक असेच दिसत होते काय ? "

गलिव्हर म्हणालाः—नाहीं ! ते लोक पुष्कळ उंच होते, मात्र त्यांच्यांतील मुलांच्या जाडीची स्पर्धा मामा करीत आहेत खास. पण मला ह्यांच्याकडे पाहून शेक्स्पियरच्या सचित्र नाटकांतील फॉल्स्टाफच्या चित्राची आठवण होते. फक्त यांचें नाक लाल दिसत नाहीं येवढेंच.

स्टीमरवर आम्ही जरा लवकरच गेल्यामुळें गर्दी झाली नव्हती. जलदी करून अगदीं पुढच्या टोंकाजवळच्या आसनावर मामा जाऊन बसले, व गुडघ्यांवर दोन्ही हात ठेऊन विचारतात " कायरे सुहृदा, आतां मी अगदीं राजासारखा दिसतों नाहीं ?" मीं म्हटलें " हें काय विचारावें हुजूर ? आपलें ऐश्वर्य पाहून मला अगदीं श्रावण शुद्ध षष्ठीची आठवण होते !"

सिंदबादनें विचारलें:—हें तिथिमहात्म्य काय आहे बोवा ?

मी म्हटलें " अरे तुला नाहीं का आठवत, नागपंचमीच्या दुसऱ्या दिवशीं शिराळशेट करतात ते ? शिराळजी म्हणून एक शेटजी औटघटका राज्यपदावर बसले होते, त्यांच्या वैभवाचें निदर्शक म्हणून त्यांचें चित्र करीत असतात. मामांची मूर्ति घडवितांना विधात्यानें त्या शिराळशेटाच्या स्वरूपाचें ध्यान केलें असलें पाहिजे. "

---

† ही जळगांवच्या काव्यरत्नावली मासिकांत जुलई १९११ चे अंकांत " एक बीभत्सरसात्मक काव्य " असें म्हणून " शिवज " ह्या टोपण नांवानें छापली होती.

स्टीमर मधून उतरून आम्हीं हॉटेल मधें गेलों व बिल चुकतें करून आपल्या पडशा घेऊन स्टेशनवर आलों. गालिव्हरही आपलें सामान घेऊन आम्हांस येऊन मिळाला. आम्ही फ्लॉरेन्सचीं तिकिटें काढून गाडींत जाऊन बसलों. मामाही पोंचवायला फलाटावर आले होते. आतां मात्र मला मामांच्या वियोगाचें जें दुःख झालें तें आवरेना. मामाही "दृष्टि भरे जलभारें। कांरे, अनिवारे, सुहृदारे" असें म्हणत एवढ्या मोठमोठ्यानें हुंदके देऊं लागले कीं स्टेशनची इमारत डळमळूं लागली! तेव्हां ड्रायव्हरनें वेळ व्हायच्या आधींच अर्धा तास गाडी सोडून अनर्थ वांचविला व आम्ही मार्गस्थ झालें.

---

## संचार नववा

# फिरेन्झ ( *Firenze* ) इटली

### ( इंग्रजी नांव फ्लॉरेन्स )

फिरेन्झ ऊर्फ फ्लॉरेन्सच्या स्टेशनावर उतरल्याबरोबर कित्येक लोक आम्हांस उतरण्यास जागा देण्यासाठीं आग्रह करूं लागले. आम्हीं विचार केला कीं हॉटेलमध्यें उतरण्यापेक्षां एखाद्या घरांत उतरणें कदाचित् स्वस्तें पडेल. म्हणून आम्हीं एका पोक्तशा माणसाला दर विचारला. तो म्हणाला दोन खोल्यांत चौघे रहात असाल तर स्वस्त देईन. त्याचे दर एकंदर स्वस्त वाटल्यावरून आम्हीं त्याचेकडे जाण्याचें ठरविलें. वयस्य म्हणाला " पहारे बुवा, 'घ्याल स्वता माल आवडीनें आणि पस्तावाल सवडीनें ' असें व्हावयाचें. " स्टेशनांतून बाहेर आल्यापासूनच आम्हांला कांहीं फरक दृश्यमान होऊं लागला. बसायला म्हणून आम्हीं एक गाडी केली. ती अगदीं पुण्यास पूर्वी शिग्राम असत त्या-

प्रमाणें शटरच्या पेटीसारखी होती. तींत बसून आम्हीं त्या बोवाच्या घरीं पोंचलों तेव्हां संकटांतून सुटलों असें वाटलें. पण काय ? बोवाची जागा म्हणजे एका जुनाट घरांतील दोन पुराण्या खोल्या होत्या. वयस्य म्हणाला " उद्यां सकाळपर्यंत ह्या घराचा किती भाग शिल्लक रहाणार आहे, ह्याचा निश्चय केला पाहिजे. सुहृदा ! तुला फलज्योतिष येतें. तर ह्या घराची कुंडली मांडून त्याचा आयुर्दाय काढ बरें." " बरें आहे " म्हणून मी एका कागदावर कुंडली मांडली व वयस्याला म्हटलें " कुंडलींतले सगळे ग्रह स्वगृहींचे असून उच्चीचे आहेत व त्यांची केंद्रस्थानीं पूर्ण दृष्टी आहे. तेव्हां ह्या घराला कांहीं दिवस तरी भीति नाहीं." वयस्य म्हणाला " ह्यावरून असें दिसतें कीं ह्या घरांतलीं सगळीं माणसें घरांतच राहून आमच्यावर पाळथ ठेवतील व आम्हीं बाहेर गेल्याबरोबर आमचीं गांठोडीं उचलून पळून जातील." मग मी पुनः दुसरी कुंडली मांडून म्हटलें कीं " आतां ग्रह बदलले आहेत व पापग्रह अजीबाद कुंडलींतून काढून टाकले आहेत." हें ऐकून वयस्याचें समाधान झालें व आम्हीं मोडक्या टेबलापुढें तुटक्या खुर्च्यांवर जेमतेम निभावून घेतलें. कारण गलिव्हर म्हणाला " इकडल्या सगळ्या देशांत इटली देश गलिच्छ व दरिद्री आहे. तेव्हां विशेष सुखसोईची अपेक्षा न करणें बरें." एवढ्या वेळांत जीं आम्हीं माणसें, घरें वगैरे येतां येतां पाहिलीं त्यावरून गलिव्हरच्या म्हणण्याला पुष्टिच मिळाली.

सामानाची व्यवस्था करून मग आम्हीं बाहेर निघालों. नदीवर स्नानाची व्यवस्था असेल म्हणून ह्या गांवची अरुणा (Arno) नामक नदी शहरामधूनच वाहते ती पाहण्यास गेलों. येथें ही तोच प्रकार आढळला. पाणी घाण हिरवट असून मधून मधून शेवाळ धरलेलें होतें व एकंदरींत नदी शेजारीं उभें राहूं नये असें वाटलें. शहरांत नदीवर सात पूल आहेत पैकीं दोन नवे आहेत. 'पोंते व्हेचिओ' नांवाच्या पुलावर तर घरासारखीं दुकानें आहेत व तेथें जवाहिरांचा

व चित्रांचा वगैरे व्यापार चालतो. तेथून पलीकडे जाऊन आम्हीं एक रेस्तोरां गांठला व फराळ केला. नंतर प्रेक्षणीय स्थळें पहाण्याचें ठरविलें. ह्या बाजूला बहुतेक मोठाल्या शहरांत एक कथीड्रल व कांपानील म्हणजे टॉवर असावयाचाच. येथील टॉवरला ज्योतोचा टॉवर म्हणतात, व कथीड्रलला द्वोमो म्हणतात. कथीड्रल इतर ठिकाणच्यासारखेंच व टॉवरही व्हेनिसच्या कांपानील सारखाच असेल तेव्हां हें पहाण्याचें कांहीं कारण नाहीं असें वयस्याचें मत पडलें. परंतु ज्योतोच्या टॉवरमध्यें विशेष कांहीं आहे असें वाचल्यावरून आम्ही तो पहावयास जाण्याचें ठरविलें. हा चवदाव्या शतकांत बांधला गेला असून ह्यांत उत्तम प्रकारचीं खोंदीव चित्रें आहेत. परंतु त्यांची चांगलीशी निगा राखिली नसल्यामुळें आम्हांला त्यांत कांहींच मौज वाटली नाहीं. आम्हीं बाहेर पडतों तों आम्हांला एक मनुष्य भेटला व म्हणाला तुम्हांला मी हें द्वोमो दाखवून सर्व माहिती सांगतों. त्याला आम्हीं आम्हांला पहावयाचें नांहीं म्हणून पुष्कळदां सांगितलें तरी तो ऐकेना. तेव्हां वयस्यानें युक्ति केली. त्याचें त्या मनुष्याशीं संभाषण पुढीलप्रमाणें झालें:—

वयस्यः——हा कोणीं बांधला ?

दाख०:—हा ज्योतोनें बांधला.

वयस्य:—आमच्यांत ज्योती ह्मणजे आगीला म्हणतात. तुमच्या देवळाला आग लागली होती काय ?

दाख०:—(आश्चर्यानें) नाहीं. देऊळ होऊन ६०० च्यावर वर्षें झालीं.

वयस्यः—तो ज्योतू कोठें रहातो ?

दाख०:—तो मेला.

वयस्य——मेला! अरे अरे! त्याचा मुलगा कोठें रहातो ?

दाख०:—मुलगा मेला.

वयस्यः—हं ! मग त्याच्या मुलाचा मुलगा ?

दाख०:—सगळे मेले.

वयस्यः—काय मूर्ख लोक ! बरें तुला बायका किती आहेत ?

दाख०:—मला एकच आहे.

वयस्यः—मग आणखी कां नाहीं करीत ? आमच्यामधें आम्ही चार चार आठ आठ बायका करतों. आमच्या बरोबर एक बाई आम्हीं आणली आहे. तिच्याशीं लग्न करतोस ? फक्त ५०० लायरा दे म्हणजे झालें. आहेत का तुझ्याजवळ ? पाहूं तुझा खिसा ?

असें म्हणून वयस्यानें त्याच्या खिशाकडे हात नेला. त्याबरोबर तो दाखवडा पळतच सुटला. वयस्य म्हणाला "तो इतर काय दाखविणार होता त्यापेक्षां ही पळण्याची मजा फारच पहाण्यासारखी आहे."

सिंदबाद म्हणाला "ह्या दाखवड्याची चर्पटपंजरी ऐकण्यांत कांहीं अर्थ नव्हता म्हणा, पण ह्या कॅथीड्रलमधें व त्याच्या शेजारच्या बॅप्टिस्टेरी-मधें किंवा सां जोहानाच्या चर्चमधें ह्या शहराचा पुष्कळसा इतिहास सांठविलेला आहे."

हा इतिहास सांगण्याविषयीं मीं विनंति केली, तेव्हां वयस्य म्हणाला "मला परीक्षेंत नेहमीं इतिहासांत पासिंग मार्कापेक्षां एक मार्क कमी मिळत असे व मग तो परीक्षकांच्या पायां पडून मिळवावा लागत असे. तेव्हां लांब-लचक इतिहास सांगूं नका बोवा ! सांगायचा तर अगदीं थोडक्यांत सांगा !"

मीः—थोडक्यांत म्हणजे किती ?

वयस्यः—थोडक्यांत म्हणजे ग्रामोफोनच्या एका प्लेटवर मावला पाहिजे.

मीः—हें पहा ! जांगिळमामांची गांठ पडल्यापासून माझी एका प्लेटवर† तृप्ति होईनाशी झाली आहे.

---

† प्लेट म्हणजे जेवणाचें ताट असाही अर्थ आहे.

वयस्यः—तूं मोठी प्लेट लाव म्हणजे झालें. कापडाच्या गिरणींतल्या इंजनमधील फ्रायव्हील एवढी लावली तरी चालेल.

अशा रीतीनें तडजोड झाल्यावर सिंदबादनें सांगण्यास सुरवात केलीः— ह्या शहराचा सांगण्यासारखा इतिहास म्हणजे सुमारें साडेचारशें वर्षांचा फार तर आहे. हीं साडेचारशें वर्षें म्हणजे ख्रिस्ती शकाच्या अकराव्या शतकानंतरचीं साडेचार शतकें. ह्या शहराचें बळ म्हटलें तर मुख्यत्वें व्यापारावर अवलंबून होतें. युरोपखंडाला हिंदुस्थान व चीन वगैरे देशांतील जरतार, लेंकरीचा व सुती तलम कपडा, मसाल्याचे पदार्थ वगैरेंची वाण असे. त्यासाठीं जहाजें व लढाऊ आरमार ठेवून उत्तर इटली मधील व्हेनिस, जिनोआ, मिलन, पिस्तोजा, लुक्का, सिएना, पिसा, वगैरे शहरांनीं फार संपत्ति मिळविली. त्यांतले त्यांत फ्लॉरेन्स शहरानें बँकिंग म्हणजे सावकारी अथवा हुंडीवाल्या पेढ्यांचा धंदा करून फार संपत्ति मिळाविली. प्रथम फ्रान्स पासून आस्ट्रिया पर्यंत एक मोठें साम्राज्य होतें त्यांतच हीं शहरें होतीं. परंतु एका बादशहाकडून त्यांना बरेच हक्क मिळाले व बादशहातीच्या कलहांत आपोआप स्वतंत्रता मिळाली. निरनिराळ्या धंद्यांचे लोकांचे गट करून त्यांचे कम्यून्स म्हणून संघ करीत व त्यांचे तर्फे प्रतिनिधि नेमून राज्यकारभार चालत असे. प्रतिनिधींचें एक काउन्सिल असे, परंतु कार्यकारी सत्ता दहा बारा लोकांच्या मंडळाकडे असे. ह्याची निवडणूक वारंवार होत असे. ही निवडणूक होण्याचे वेळीं मतें देणें तीं एका प्रकारचीं बीन्स ( वालपापडीच्या शेंगांचे दाणे ) टाकून देत असत. परंतु कधीं कधीं जमलेल्या लोकांच्या नुसत्या आरडा ओरड्यानें ही सत्ताधीशांची उलथापालथ होत असे. कोणाही शहराच्या मुलखाची व्याप्ति आसपासच्या कांहीं मुलखापलीकडे गेली नाहीं. नाहीं म्हणावयाला आशिया मायनर किंवा आफ्रिकेचा उत्तर किनारा वगैरेकडे एखादें व्यापारपेठेचें शहर ह्यांच्या ताब्यांत असे व कॉर्सिका,

सार्डिनिया वगैरे बेटांवरही ह्यांचा अंमल कांहीं शतकें पर्यंत होता. प्रथम कांहीं शतकें पर्यंत खुद्द शहरांतील नागरिकच लढाऊ पेशाचे असून युद्धांत विजय संपादन करीत. परंतु पुढें व्यापार वाढून संपत्ति आल्यावर भाडोत्री सैन्यावर काम भागूं लागलें. तसेंच आपसांतील मारामाऱ्यांमुळें लोकसत्तेलाही लोक कंटाळून एकमाणशी सत्तेला सुरुवात झाली व ती सत्ता वंशपरंपरा चालविण्याकडे पुष्कळांचा कल दिसूं लागला. सतराव्या शतकापासून अमेरिका खंडाचा शोध लागल्यामुळें आशियाचा व्यापार पोर्तुगीज, इंग्रज, फ्रेंच वगैरे लोकांकडे गेला व या शहरांचें वैभव कमी होऊन बादशाही अंमलाखालीं हीं शहरें गेलीं. बादशहातर्फें एक ड्यूक ऑफ टस्कनी नेमण्यांत आला. इटली देश बादशहातीशीं बंड करून स्वतंत्र झाल्यावर ड्यूक ऑफ टस्कनीच इटलीचा राजा झाला."

मीः—ह्या इतक्या मारामारींत एवढाल्या इमारती बांधायला वेळ केव्हां सांपडला?

सिंदबादः—शहरांत संपत्ति फार असल्यामुळें कुशल कारागीरही फार असत व प्रत्यक्षपणें मारामारींत भाग न घेणाऱ्या किंवा प्रामुख्यानें राजकारणांत भाग न घेणाऱ्या नागरिकांच्या वाटेस कोणी जात नसे. त्यामुळें श्रीमंत नागरिकांस मोठाल्या इमारती बांधण्यास कांहीं हरकत नसे. उलट प्रत्येक कम्यूनला एक स्वतंत्र टॉवर असे व देवळें वगैरे धार्मिक इमारती सर्व शहरच्या हौशीनेंच बांधल्या जात असत. मधें मेदिची नामें घराण्याकडे सुमारें शंभर वर्षें (सन १४३४ ते १५३६) राज्यकारभार गेला ते वेळीं शहराला बरीच स्वस्थता मिळाली. हा काळ रिनेसन्स (renaissance) म्हणजे नवचैतन्याचा काळ म्हणून समजला जातो. ह्या वेळीं फ्लॉरेन्स शहरांत ब्रुनेलेशीसारखे शिल्पकार, रफाएलसारखे चित्रकार, मिचेल आंजेलो सारखे मूर्तिकार, दांते (Dante) सारखे प्रख्यात कवी, माचिआवेलीसारखे

लेखक निर्माण झाले व लोरेंझो मेदिची ह्याच्या दिलदारपणामुळें त्याला "magnificent" म्हणजे वैभवशाली असें नांव पडलें होतें. इतकेंच नाहीं तर ह्या शहराचे नांवाचा अर्थ फुलाचें शहर असा करीत असत व ह्या शहराला गुणविशिष्ट असें (gentile) म्हणजे 'शिष्ट' असें उपपद मिळालें. येथें ललितकलांची इतकी समृद्धि झाली होती कीं अजूनही मूर्तिकला व चित्रकला यांचे शिक्षणाची पूर्तता रोम, फ्लॉरेन्स वगैरे शहरें पाहिल्याशिवाय झाली असें समजत नाहींत.

मीः—इतर शहरांना अशींच उपपदें होतीं काय ?

सिंदबादः—हो तर ! रोमला eternal (अक्षय्य), पाडुआला la dotta (विद्वान्), बलोनाला la grassa (लठ्ठ) इत्यादि उपपदें पडलीं होतीं.

इतका वेळ आम्हीं ड्रोमोच्या शेजारींच एका बांकावर बसून बोलत होतों. तेथून मग आम्हीं बाप्टिस्टेरी म्हणजे तान्ह्या मुलांना पहिला ख्रिस्ती धर्माचा संस्कार करण्याचें ठिकाण पहाण्यास गेलों. ही एक मोठी अष्टकोनी इमारत आहे. एकंदर येथील शिल्पकला पाहून मन थक्क होतें. जिकडे पहावें तिकडे मूर्ति, पुतळे व खोदकाम करून काढलेलीं चित्रें व नाना तऱ्हेच्या खोंदीव वेलबुट्या दिसून येतात. ह्यांवरून एके काळीं हे लोक किती कलाप्रिय असतील हें दिसून येतें. भरभराटीच्या वेळेस ह्यांना पूर्वेकडील व्यापारामुळें अतोनात पैसा मिळाला. ह्या बॅप्टिस्टेरीच्या एका दरवाजाचें काम वर्षानुवर्षें चाललें होतें व तो देवळाला लावला ते वेळीं सगळ्या देशभर मोठा उत्सव झाला म्हणतात. दरवाज्याच्या प्रत्येक फळीवर १०।१० चौकटी करून त्यांवर देखावे कोरलेले आहेत. हें पाहिल्यावर आम्हीं येथेंच थोडा वेळ एका बांकावर बसून मग घरीं जाण्याचें ठरविलें. मी म्हटलें "ह्यावरून येथें बुद्धिमान् लोकांचेंच साम्राज्य असलें पाहिजे. नुसत्या अडाणी लोकांच्या हातांत राज्यकारभार असेल तर इतकें ऐश्वर्य व रसिकता येणें शक्य नाहीं."

वयस्य उसळून म्हणाला " बुद्धिमान् असो कांहीं असो, लोकमतानुवर्ती सत्ता झाल्याशिवाय जनतेला कधींही सुख लागणार नाहीं."

सिंदबाद म्हणाला " सर्वसाधारण जनसमाज म्हणजे शुद्ध बैलांचा बनलेला असतो. चालेल तोंवर सुधा असतो नाहीं तर कोठें हुंदाडी देईल ह्याचा नेम नाहीं. मला वाटतें नेहमीं एका माणसाच्या हातांतच सत्ता असावी."

वयस्यः—म्हणजे मग त्यानें वाटेल तसे प्रजेचे हाल करून आपण मात्र ऐषआराम भोगावा.

सिंदबादः—असा प्रसंग एखादे वेळेसच येतो. सत्तेचा दुरुपयोग लोकशाहींत होत नाहीं असें नाहीं. फ्रेंच रेव्होल्यूशन पहाना ? तसेंच मेक्सिको वगैरे ठिकाणची बजबजपुरी पहा. जोंपर्यंत एक मनुष्य सत्ताधारी होता तोंवर ठीक होतें. तो गेल्याबरोबर मारामारी सुरू झाली.

मीः— मी म्हणतों राज्यांत बुद्धिवान् लोकांचें वर्चस्व असावें. मग ती इंग्लंडसारखी राजसत्ता असो कीं युनायटेड स्टेट्स्सारखी लोकसत्ता असो.

वयस्यः–पण लोकशाहीशिवाय बुद्धिवान् लोकांच्या कर्तृत्वाला वाव मिळावयाचा नाहीं.

सिंदबादः—लोकशाहीमध्यें कर्तृत्वाचें चीज होत नाहीं. आज एकाला डोक्यावर घेतला तर उद्यां पायाखालीं तुडवितील. ह्याच शहरांत 'सावोनारोला' म्हणून जो प्रख्यात धर्मोपदेशक होऊन गेला त्याचेंच उदाहरण पहाना ?

मीः— ती हकीकत सांग पाहूं. इतिहासांत चार दोन वाक्यें वाचल्याचीं आठवतात पण आतां कांहीं स्मरण नाहीं.

सिंदबादः—लॉरेन्झो दै मेदिची ह्या नांवाला जरी लोकनियुक्त म्हणून मुख्याधिकारी होता तथापि वस्तुतः सर्वसत्ताधारी होता. त्याच्या दरबारीं

अनेक प्रकारें कला, वाङ्मय वगैरेंना उत्तेजन मिळत असे, तरी त्याचा थाट-माट फार असल्यामुळें खर्चाकरितां नाना प्रकारांनीं तो प्रजेवर कर बसवीत असे, आणि त्याच्या अमदानींत प्रजेमध्यें चैनबाजी फार शिरली. वास्तविक हें युग सगळीकडेच चैनबाजीचें होतें व धर्मपीठाचा अधिकारी जो पोप त्याच्या धार्मिक सत्तेचा अतोनात दुरुपयोग होई. मोठमोठे धर्माधिकारी पैसे भरून किंवा इतर वशिल्यानें धर्मगुरूच्या पदावर अधिष्ठित झालेले असत व त्यांचा अनाचार जरी गुप्तपणें चाले तरी पुष्कळदां त्याचा परिस्फोट होई. पोपही अतिशय दुराचरणी असत व धर्माचे योगानें सदाचाराचे ऐवजीं पापकर्मच वाढूं लागलें. प्रॉटेस्टंट बंडाचा संस्थापक मार्टिन लूथर असें समजतात, पण तो लहान असतांनाच पहिलें बंड सावोनारोला यानें केलें. मात्र ह्यानें धर्मगुरूंच्या सत्तेला मुळापासूनच हात घातला नाहीं, तर फक्त अनाचाराबद्दल टीका केली व ह्याचें बंड मोडल्यामुळें तात्पुरतें जिरून गेलें. परंतु पापाला वाचा फुटली व त्याचे मागून आलेल्या लूथरला राजकारणाचे दृष्टीनें पोपला विरोध करणाऱ्या राजे बादशहांनीं उघड वा गुप्त अशी मदत केल्यामुळें त्याच्या बंडाचा प्रसार होऊन पोपच्या धार्मिक सत्तेचें बरेंचसें उच्चाटण झालें. चैनबाजी सोडून द्यावी व शरीराला कष्ट देत असावें अशा तऱ्हेची सावोनारोलाची शिकवण असे. परंतु मुख्यत्वें तो म्हणे, मला स्वप्नांत येशू ख्रिस्त किंवा देवदूत दिसून सांगतात कीं लोकांनीं जर अनाचार सोडला नाहीं तर लवकरच जगावर मोठें संकट येणार आहे. करितां लोकांनीं अनाचार सोडावा. तो स्वतः शास्त्रोक्त धर्मगुरू असून एका मठाचा स्वामी होता व त्याच्या मठांतील सांप्रदायिक धर्मगुरू कडकडीत वैराग्यशील आचरणाचे असत, ह्यामुळें त्याच्याबद्दल लोकांचा आदर होता. ह्याच्या अंगांत कांहीं एक प्रकारचें तेज असे आणि खासगी भाषणांत व जाहीर प्रवचनांत श्रोत्यांवर त्याची फार छाप पडत असे. हळुं हळुं शहरांतल्या मोठ-

मोठ्या लोकांवर त्याचें वजन बसूं लागलें व अधिकारी लोकांत त्याचे भक्त नेमून येऊं लागले. एक वर्ष असा प्रकार झाला कीं चैनबाजीच्या जिनसा म्हणजे सैतानाचीं शस्त्रें म्हणून त्यांची एक मोठी सार्वजनिक होळी झाली व मुलांनीं टोळ्या करून रस्त्यांतून व घरोघर हिंडून लोकांजवळच्या चैनीच्या वस्तु घेऊन त्या होळींत नेऊन जाळल्या. ह्या प्रकारामुळें पोपनें सावोनारोलाला भाषणाची बंदी केली व त्याचें भाषण ऐकणारालाही शाप लागेल असें लोकांस सांगितलें. हा हुकूम अन्यायाचा म्हणून सावोनारोलानें भाषणें चालू ठेवलीं व बरेच लोकही ऐकावयास जाऊं लागले. राज्यकर्तेही ह्या बाबतींत पोपचें ऐकेनात. त्यामुळें पोपनें सगळ्या शहरावरच धार्मिक बहिष्कार पुकारला. त्याचा अर्थ शहरांतील धर्मगुरु कोणतेच धार्मिक संस्कार करीनात. तरी सावोनारोलाच्या विरुद्ध जाण्याची कोणाची छाती होईना. मग पोपतर्फे असें जाहीर करण्यांत आलें कीं सावोनारोलानें व पोपकडील एका धर्मगुरूनें अग्निप्रवेशाचें दिव्य करावें. सावोनारोलाला ही गोष्ट पटेना पण त्याच्या मठांतील व इतर अनुयायांपैकीं शेंकडों जण स्वतः दिव्य करावयास तयार झाले व लोकसमाजही दिव्यासाठीं हट्ट धरून बसला. तेव्हां सरकारच्या हुकुमानें पोपकडील एक व सावोनारोलाकडील एक अशा दोघांनीं दिव्य करावें असें ठरलें. ८० फूट लांब व १० फूट रुंद असा एक चौथरा ५ फू. उंचीचा तयार केला. रुंदीच्या दरम्यान दोन फूट जागा मोकळी ठेवून दोन्ही बाजूंनीं चार फूट उंचीपर्यंत सर्पण रचलें. दोघांनीं लांबीभर पेटलेल्या अग्नी-मधून चालत जावयाचें होतें. अग्निप्रवेशाचे वेळेस पोपच्या बाजूच्या लोकांनीं तक्रारी काढल्या. ते म्हणाले, सावोनारोलाच्या माणसानें धर्मगुरूचे कपडे, क्रूस किंवा तीर्थ बरोबर घेतां कामा नये. कारण त्याचा भ्रष्टाकार होईल. पहिल्या दोन गोष्टी वादविवादांत सावोनारोलानें कबूल केल्या, पण तिसरी गोष्ट तो कबूल करीना. ह्या वादविवादांत पुष्कळ वेळ गेला व तितक्यांत एक मोठी

पावसाची सर येऊन सर्पण सर्व भिजून गेलें, त्यामुळें सर्वच समारंभ रहित झाला. लोकांची निराशा झाली व लोकमत बदललें. प्रधान मंडळाची नवीन निवडणूक झाली. तींत विरुद्ध पक्षाचे अधिक लोक निवडून आले. त्यांनीं सावोनारोलाला पकडून व त्याचा वेदनायंत्रांनीं छळ करून कांहीं कबुली-जबाब लिहून घेतला व त्याचें विकृत स्वरूप प्रसिद्ध केलें. नंतर खटला करून देहांत शिक्षा दिली. शिक्षा अंमलांत आणतेवेळीं त्याला धर्मगुरूचे अधिकारा-वरून भ्रष्ट केलें व शिक्षा होतेवेळीं लोकांनीं आनंद प्रदर्शित केला.

वयस्य म्हणाला " मग तो शोभणारवाला स्वतःच कां आगींत नाहीं शिरला? त्याला तीर्थाची जरूरच नव्हती, तो स्वतःच तीर्थ होता. मी असतों तर ८० फूटच काय पण मैलभर अग्नींतून चालून दाखविलें असतें."

मी म्हटलें " असें का ? मग कसा चालणार तें नुसतें तरी चालून दाखविशील ? "

वयस्य म्हणाला " हो ! हें पहा मी सगळें वर्णन करून दाखवितों."

मग त्यानें पुढें आग कशी पेटली आहे, लोक कसे पहात उभे राहिले आहेत, वगैरे रसभरित वर्णन करून म्हणाला " मी आतां आगींत शिरतों पहा हं ! " असें म्हणतो आहे तों गलिव्हर ओरडला " अरे तुझा कोट पाठी-मागें पेटला आहे बघ. " ही खोडी गलिव्हरनें अशी केली होती कीं रस्त्यांत पडलेल्या दोन चार तेलकट चिंध्या गोळा करून हळूच वयस्याच्या कोटाला मागें टांचणीनें टोंचून दिल्या होत्या व विडी पेटविण्याच्या निमित्तानें काडी ओढून पेटवून दिल्या होत्या. वयस्यानें मागें वळून पाहिलें तों खरेंच जाळ व धूर दिसला ! त्याबरोबर आग ! आग ! धांवा ! धांवा ! म्हणून ओरडत इकडून तिकडे पळत सुटला. तेव्हां आम्हीं त्याला पकडून जळक्या चिंध्या काढून टाकल्या. मग सर्वांनीं वरचा रस्ता पकडला. गलिव्हर म्हणाला "आग विझेपर्यंत वयस्यानें फेऱ्या घातल्या त्यांची लांबी मी मोजली ती बरोबर एक

मैल झाली. " वयस्य म्हणाला " आग समोर असती तर दाखविलें असतें. असा पाठीवर वार करणें कांहीं शूरपणाचें लक्षण नाहीं."

दुसरे दिवशीं सकाळीं न्याहारी झाल्यावर आम्हीं येथील चित्रशाळा किंवा चित्रसंग्रह पाहण्यास निघालों. खरें म्हटलें तर ह्या शहरांत इतके ठिकाणीं चित्रसंग्रह पाहण्यासारखे आहेत कीं सगळे पहावयाचे म्हटलें म्हणजे कितीं एक दिवस लागतील, म्हणून आम्हीं उफिझी व पित्ती नांवाच्या दोन ग्यालऱ्या [ म्हणजे लांबलचक इमारती ] एकाला एक जोडूनच आहेत, त्यांतील चित्रसंग्रह उत्तमापैकीं व विपुल आहे, म्हणून तेवढ्याच पहावयाचें ठरविलें. दगडावरील खोदीव काम, चित्रें वगैरेंची रेलचेल होती. त्यांतलेत्यांत ख्रिस्तमाता कुमारी मेरी इचीं चित्रें फार होतीं. तिला मदोना Madonna म्हणतात. ह्याचा इंग्रजी भाषेंत "अवर लेडी ", फ्रेंच भाषेंत "नोत्र दाम" Notre Dame म्हणजे आपली स्वामिनी असा शब्दप्रयोग होतो. वयस्य म्हणाला " त्या काळचें कथानक असलेल्या कादंबऱ्यांत "बाय अवर लेडी" असा शब्दप्रयोग वारंवार वाचल्याचें आठवतें. " गलिव्हर म्हणाला " ह्याच शब्दप्रयोगापासून " ब्लडी " असा ख्रिस्ती लोकांच्या व्यवहारांत रूढ असलेला शद्ब निघालेला आहे. प्रार्थना किंवा कोर्टांतील शपथ ह्या खेरीज देवाचें नांव घेणें हा खिस्ती शास्त्रांत अधर्म आहे. एके काळीं लोक " माय गॉड " " गॉड ब्लेस मी " वगैरे शब्द फार वापरीत. प्यूरिटॅनिझमच्या काळांत असल्या उक्तींवर बहिष्कार पडला, पण त्याचे मोबदला कांहीं तरी उद्गारवचनांशिवाय काम भागेना, म्हणून " माय गुडनेस " " गुडनेस मी " वगैरे हल्लीं संभावित लोकांच्या भाषणांतसुद्धां येणारे शब्द रूढ झाले.

सिंदबाद म्हणाला " ह्यावरून कालच्या वादाची आठवण झाली. पहिल्या चार्लस राजाला ठार करणारे प्यूरिटन लोकांनीं प्रजासत्तात्मक राज्य करण्याचा प्रयत्न केला, परंतु थोड्याच दिवसांत त्यांचा पुढारी क्रॉमवेल ह्यास

आपले हातांत अनियंत्रित सत्ता घ्यावी लागली. बहुजनसमाजाला एकतंत्री राज्यच प्रिय असतें व राजसत्ता वंशपरंपरा द्यायला ते खुषी असतात असें नेपोलियनच्या उदाहरणावरून दिसून येतें.

मी:—मग सध्यां अमेरिकेंतला प्रकार कसा शांतपणें चालला आहे ?

सिंदबाद:—हा फार दिवस टिकेल असें वाटत नाहीं. अजून त्या देशावर मोठेंसें संकट आलेलें नाहीं. किंवा एखादी मोठी शिकार मारलेली पचवायचा प्रसंग आलेला नाहीं. आणखी पंचवीस एक वर्षांत असा प्रसंग त्या राष्ट्रावर आला म्हणजे तेथेंही कोणीतरी राजा होणारच.

वयस्य: — असलीं भविष्यवचनें म्हणजे कांहीं मुद्याचें समर्थन नाहीं. कायहो गलिव्हर व्रिन जोनाथन ! या बाबतींत तुम्हांला कांहीं अनुभव आहे कीं नाहीं ?

गलिव्हर:—माझ्या पांचव्या प्रवासांत मला असे कांहीं विचार येण्या-जोगें दृश्य पहाण्यास सांपडलें खरें.

मी:—मग त्या सफरीचा वृत्तांत आम्हांला सांगच आतां. चला आपण एका बाजूला जाऊन बसूं.

एका बाजूला चित्रपटगत भूतकालीन विभूतींनीं परिवेष्टित अशी जागा पाहून इतर कोणाला त्रास न होईल अशा बेतानें आम्हीं बसलों व गलिव्हरनें आपल्या वृत्तांतास सुरुवात केली. त्यानें फक्त सारांशच आम्हांस सांगितला व येथें तर त्याचाही अतिसंक्षेप करणें भाग आहे.

हूंहूंहूंच्या राज्यांतून परत आल्यावर मी सर्व याहूशीं ( म्हणजे मनुष्यप्राण्यांशीं ) तुटकपणानें वागत असें. आणि एका गोष्टीनें तर मला

इतका उद्वेग आला कीं त्याच्या भरांत नार्वेकडे प्रवासाला जाणाऱ्या एका जहाजांत जाण्याची संधि आली ती मी पत्करली. परंतु नार्वेच्या अलीकडे जहाज तुफानांत सांपडलें व थेट उत्तरेकडे गेलें. माझ्या कांहीं तिरस्काराच्या शद्बांमुळें सर्व खलाशांनीं संप करून मला बोटींतून काढून टाकण्याचा आग्रह धरला व मींही खुषी दाखविल्यामुळें मला एका होडींत घालून अन्न-सामुग्रीसह सोडून देण्यांत आलें. मी त्या होडींतूनच थेट उत्तरेकडे निघालों. तिकडे बर्फाचे पर्वत दिसूं लागले तरी त्यांच्या पलीकडे मी गेलों. खावयाला मासे व प्यावयाला बर्फाचें पाणी मिळे. शेवटीं एकेठिकाणीं माझ्या भोंवतालचें बर्फ गोठलें व मीं पाठीशीं गांठोडें बांधून पायींच पुढें निघालों. खावयाला सीलमासे मिळत असत. स्केटसारखे जोडे केल्यामुळें माझा प्रवासही फार झपा-ट्यानें होत होता. पुढें जमीन लागली व तीवर एक कांसव भेटलें. कांसव किती जलद चालणार? पण हें कांसव इतक्या जलद चाललें कीं मलाही त्याच्या बरोबर जाण्यासाठीं झपाझप चालावें लागलें. सुमारें दोन तासांनंतर कांसव पाण्यांत शिरलें. तेथें मला मनुष्यवस्तीचीं चिन्हें व पायवाट दिसूं लागली. त्या पायवाटेनें जात असतां समोरून एक मनुष्य येतांना दिसला. हा पळत नसून झपा-ट्यानें चालत होता तरी त्याची गति पळणाऱ्या माणसाच्या दुप्पट होती. मज-कडे पाहून त्यानें एक हात पोटावर व एक हात गळ्यावर ठेवला. मी त्याला टोपी काढून सलाम केला. त्याबरोबर तो वळून सपाट्यानें परत गेला. कांहीं वेळानें आणखी दोन मनुष्यें आलीं व त्यांनीं मला कांहीं प्रश्न विचारले. ते इतक्या जलद कीं अक्षरें वेगळीं ऐकूं येणें मारामार. मग त्यांनीं मला आपल्या बरोबर येण्यास खूण केली. त्यांचे बरोबर मला पळावें लागलें व लोक सर्वच टकमक पहात होते.कारण बोलणें, चालणें, बाजार करणें, इत्यादि त्या लोकांचा व्यवहार झटपट! जातां जातां मी एका मोठ्या रस्त्यांत शिरलों. तेथें मी एका गाडीखालीं सांपडून मरावयाचाच. पण माझ्या सोबत्यानें मला बाजूला ओढलें!

कारण ही गाडी अतिशयच वेगानें चालत असून तिला घोडे वगैरे ओढणारा कोणीच प्राणी नव्हता.†

प्रथम मला मुख्य नवलाची गोष्ट वाटली ती ही कीं येथील लोकांचे कपडे अगदीं थोडे व हलके दिसत होते, इतकेंच नाहीं तर मलाही ह्या मुलखांत शिरल्यापासून थंडी कमी वाजूं लागली होती व माझे अंगांतील कपडे जरा गरमच वाटूं लागले होते! तसेंच लहान लहान घरें कोठेंच दिसत नव्हतीं. रस्त्याच्या कडेला सर्व बागा होत्या. त्यांत कोचें होतीं तीं अशीं कीं वाटल्यास त्यांवर झोंप घेतां यावी. त्या कोचांवर वेताच्याच रुंदीचीं अशीं छपरें होतीं व तीं कोंचाच्या एकदां ह्या बाजूला तर एकदां त्या बाजूला वाटेल तशीं वळवितां येत. मधून मधून लताकुंजही होते. पुष्कळ पुष्कळ अंतरावर फार मोठाल्या व उंच अशा इमारती दिसत होत्या. त्यांचीं छपरें उंच नव्हतीं परंतु मध्यें एक टोंक व तेथून सपाट निमुळते पट्टे असे गेलेले होते. मी मोठ्या रस्त्यावर शिरल्यावर मला माझ्या सोबत्यांनीं लवकर रस्ता ओलांडून पलीकडच्या कडेला नेलें. रस्त्याच्या दोन्ही कडील भाग सुमारें सहा इंच उंच केला होता व फक्त त्यांवरूनच माणसें चालत होतीं. हा रस्ता मला मोठा वाटला, पण कांहीं वेळानें पाहतों तों एका फारच मोठ्या रस्त्यांत आलों. हा रस्ता सुमारें १५० फूट रुंद असेल. पण त्यांत आश्चर्याचा भाग असा कीं त्यांत कांहीं माणसें इतक्या झपाट्यानें जात होतीं कीं त्यांवर नजर ठरेना! त्याचा अनुभव मलाही आलाच. मी जरा पायापुढें पाहिलें तों रस्त्याचा पलीकडील भाग पळत होता! माझ्या एका सोबत्यानें मला त्यावर चलण्यास सांगितलें व स्वतः त्यावर उडी टाकली. मीही उडी टाकली तों धाडदिशीं मागें पडलों! मग त्यांनीं मला सांवरल्यावर उभा राहून

---

† गलिव्हरची चवथी सफर ता. ५ डिसेंबर १७१५ रोजीं संपली व १७२१।२२ मधील पांचव्या सफरीचें हें वर्णन आहे.

पाहिलें तों त्यापलीकडील भाग त्याहूनही पळत होता. त्यावर आम्हीं गेलों. ह्या वेळेस मी लक्ष्य ठेवलें असल्यामुळें पडलों नाहीं. अशाच रीतीनें आणखी दोनदां एकापलीकडे एक व अधिकाधिक पळत्या अशा रस्त्यांवर उडी मारली आणि मग चालावयास लागून रस्त्याच्या कडेनें पाहिलें तर झाडें वगैरे सपाट्यानें मागें पळत होतीं. हे पळते रस्ते सहा फूट रुंदीचे होते, त्यांवर आम्हीं चालत होतों, परंतु त्या रस्त्यांच्या मधोमध बाकें असत त्यांवर नुसतें बसलों तरी रस्त्याबरोबर प्रगति होत असे. सुमारें २० मिनिटांनीं माझ्या सोबत्यानें मला रस्त्यांतून बाहेर पडण्यास खूण केली. मी प्रथम शेजारच्या रस्त्यावर पाय टाकला. तों तोंडघशींच पडत होतों, पण आतां मी सावधगिरी शिकूं लागलों होतों त्यामुळें सांवरलें. पुढील दोन पळत्या रस्त्यांवरून उड्या टाकून आम्हीं स्थिर रस्त्यावर आलों. तेथून त्यांनीं मला एका बागेंत नेऊन एका मनुष्यापुढें उभें केलें. त्यानें कांहीं हुकूम दिल्यावरून त्यांनीं मला एका स्नानगृहांत स्नान घालून माझ्यापुढें त्यांच्या पद्धतीचे कपडे ठेवले. ते मी घातले तेव्हां प्रथम मला बरीच थंडी वाजली. मग त्यांनीं मला एका भोजनालयांत नेऊन माझ्या पुढें कांहीं खावयास ठेविलें व स्वतः हीं खाऊं लागले. त्यांचें खाणें एकच मिनिटांत आटोपलें, पण मला वेळ लागला. तरी तो फक्त फळें खाण्यास, कारण त्यांचें मुख्य खाणें म्हणजे एक प्रकारच्या वड्या होत्या, त्या किंचित् गुळचट व तुरट होत्या व त्या खाल्याबरोबर भूक शांत झाली. त्यांच्यापैकीं प्रत्येकानें एकेकच वडी खाल्ली; मी मात्र तीन खाल्लया, पण त्याचा परिणाम माझ्या अंगाचा दाह होऊन अतिसार झाला. ह्याचें कारण असें कळलें त्या लोकांचे जठररस लवकर सुटत असत व त्यामुळें त्यांची तृप्ति लवकर होई. मग मी प्रथम सावकाश जेऊं लागलों व अर्धीच वडी खाई. पुढें मलाही एका वडीची संवय झाली.

ह्या अतिसारामुळें मला इस्पितळांत पाठविण्यांत आलें. येथें रोगी थोडे असत व तेही मुख्यतः अपघाताचे असत. तेथें एकदोन दिवसांत मी

औषधाशिवायच बरा झालों. औषधाशिवाय म्हटलें खरें पण त्याचा अर्थ यवेढाच कीं पोटांत कांहीं औषध घेतलें नाहीं. परंतु डाक्टरानें कांहीं एक प्रकारचें यंत्र माझ्या बेंबीपुढें कांहीं वेळ धरलें होतें. पुढें मला कळलें कीं ह्यांतून कांहीं एक प्रकारचे प्रकाशकिरण निघतात व शरीरांत पांच सहा ठिकाणें व पाठीचा कणा ह्यांपैकीं जरूर त्याप्रमाणें एक अथवा अधिक ठिकाणीं लावल्यानें सर्व रोग बरे होतात. तसेंच येथील सार्वजनिक किंवा खाजगी कोणत्याच दिव्यांना तेल लागत नाहीं व हवाही लागत नाहीं ! एक बारीकशी दांडी वर किंवा खालीं केल्यानें दिवा लावतां किंवा मालवितां येतो. व शेजारींच एका तबकडीवर घड्याळासारखे आंकडे व कांटा असतो तो सारून प्रकाश वाटेल तितका कमीअधिक करितां येतो. वाऱ्याचीं पंख्यासारखीं यंत्रें आहेत त्यांनींही असा कमीअधिक वारा सुरू होतो व पाण्याच्या बाबतींत देखील एका यंत्रांच्या योगानें एकदोन भांडीं पाणी वाटेल तेथें मिळतें. हें हवेंतील वाफेपासून निर्माण होतें असें मला कळलें. अधिक पाण्यासाठीं घरोघर नळ्या आहेत त्यांतून वाटेल तितकें मिळतें. त्याचप्रमाणें सरकारी खर्चानें ठेवलेलें एक मोठें यंत्र आहे, त्यानें वाटेल तेवढा मोठा पाऊस हवा तितका वेळ पाडतां येतो व आपोआप आलेले ढग पळवून लावतां येतात. पण ह्याच्यापेक्षां नवलाची गोष्ट म्हणजे उष्णता. घरोघर उष्णता उत्पन्न करण्याचीं यंत्रें आहेतच, त्यांच्या योगानें नुसती दांडी हलवून कांहीं प्रमाणापर्यंत हवी तितकी कमीअधिक उष्णता किंवा थंडी उत्पन्न करितां येते. सरकारी खर्चानें चाललेलें जें मोठें यंत्र आहे त्यानें सर्व प्रांतभर हवा सरकारच्या मनास येईल तितकी ऊबदार किंवा थंड ठेवतां येते. प्रकाशाचें सरकारी यंत्र आहे त्यानें सर्व देशभर जरूर तेवढा प्रकाश सारखा ठेवतां येतो. तेथें सहा महिने रात्र व सहा महिने दिवस असतो, व दिवसाचे चार महिने खेरीज करून उजेडही कमी असतो, त्यामुळें कृत्रिम प्रकाशाची फार जरूर आहे.

नाहीं म्हणावयाला आकाशांत रंगीत प्रकाशाचे कधीं कधीं पडदेच्या पडदे दिसतात, त्यांचें सौंदर्य वर्णन करून सांगतां येणार नाहीं.†

येथील व्यवहाराचा सूर्योदय व सूर्यास्ताशीं संबंध नसतो. त्यामुळें येथील कामें घड्याळावर चालतात. प्रत्येकाजवळ घड्याळें असतात, त्यांना महिन्यांतून एकदां किल्ली द्यावी लागते. हीं घड्याळें अतिशय लहान असतात व तीं कपाळावर राहतील अशा रीतीनें पट्ट्यानें बांधलेलीं असतात. स्वतःला वेळ पाहणें असल्यास पिशवींतून लहान आरशांची एक जोडी काढून त्यानें कपाळावरील घड्याळ पाहतात. ही अशा रीतीनें गुंतविलेली असते कीं त्यांतील एका आरशांतील प्रतिबिंब दुसऱ्या आरशावर पाडून पहावयाचें असतें. पण एकाहून अधिक माणसें जेथें असतील तेथें कोणाही दुसऱ्या माणसाचे कपाळावरील घड्याळ पहातां येतें. प्रत्येक माणसाजवळ एक पिशवी असते तींत वारा, प्रकाश, उष्णता, पाणी, वगैरेंचीं यंत्रें, खाण्याच्या वड्या व एक संदेशयंत्र असतें. ह्या संदेशयंत्राचे योगानें मनुष्य लांब अंतरावरच्या दुसऱ्या ओळखीच्या माणसाशीं बोलूं शकतो म्हणे ! आणखी याचे मुख्याधिकारी आहेत त्यांजजवळचीं जीं असलीं यंत्रें आहेत त्यांचे योगानें ते बोलत असतांना एकमेकांना पाहूंही शकतात म्हणून मला कळलें. ह्या यंत्रावर अगदीं हळू बोललेलें मोठ्यानें ऐकूं येतें. या लोकांत हा एक विशेष मला दिसला कीं येथें शांतता अतिशय. कोणी मोठ्यानें बोलावयाचा नाहीं किंवा मोठा आवाजही व्हावयाचा नाहीं. गायनही ह्या लोकांत वर्ज्य आहे. तान्हीं मुलें सुद्धां पहिले दोन तीन दिवसांपुढें रडत नाहींत. त्यामुळें प्रथम माझ्या बोलण्याचा

---

† ह्यापुढें गलिव्हरनें त्यांचा चरितार्थ, मुलांचें शिक्षण, समाजांतील स्त्रियांचें स्थान, सार्वजनिक उत्सव वगैरे माहिती सांगून त्यांचीं कामें किती वेगानें होतात तें सांगितलें. पण त्याचा सारांश सुद्धां स्थलाभावामुळें येथें देतां येत नाहीं.

त्यांना त्रास झाला. पण भाषेच्या अडचणीमुळें मीं बोलणें सोडलें तेव्हां हा त्रास आपोआपच थांबला.

मला त्यांची भाषा येऊं लागल्यावर ह्या लोकांच्या एका अधिकाऱ्याकडून बोलावणें आलें. तिकडे जाण्यापूर्वी मला नेमलेल्या भाषाशिक्षकानें सांगितलें कीं मी आपलें बोलणें शक्य तितक्या थोडक्या शब्दांत सांगावें. कारण माझ्या अगदीं साध्या बोलण्यांत सुद्धां त्याला फार पाल्हाळ दिसत होता. तो म्हणे माणसांच्या बुद्धीच्या आटोक्यांतीलच गोष्टी बहुतेक आपण नेहमीं बोलत असतों, मग आपलें भाषण अगदीं थोडक्यांत कां करतां येऊं नये ? दोनचार शब्दांत एकाची मुख्य कल्पना दुसऱ्याला कळवितां आली पाहिजे. ह्या धोरणानें ह्या देशांतील भाषाही सुधारली आहे. मुख्य मुख्य कल्पनांचीं वाक्येंचीं वाक्यें एकएका शब्दांत आणलीं आहेत. शिवाय ते लोक अतिशय जलद बोलतात. त्यामुळें प्रथम माझी अगदीं त्रेधातिरपिट उडाली व संवय झाल्यावर सुद्धां दुसऱ्याचें बोलणें एकचित्तानें ऐकावें लागे तेव्हां तें साधारण समजे. मात्र मला असा चमत्कार वाटला कीं येथें माझें एकाग्र चित्त लवकर होऊं लागे व इतर कोणत्याही भाषेपेक्षां येथील भाषा फार लवकर आली. एकाग्रतेचा सराव त्या लोकांत बराच आहे, कारण ही संवय त्यांना लहानपणापासूनच लावलेली असते. माझ्या शिक्षकाचें असें म्हणणें पडलें कीं ह्या एकाग्रतेच्या सरावामुळें त्या लोकांच्या मेंदूला अशी शक्ति येते कीं दुसऱ्याचे शब्द फारसे न ऐकतां सुद्धां त्याचे विचार उत्तम रीतीनें त्यांस समजतात. निदान भाषेच्या अपुरत्या ज्ञानामुळें माझे शब्द जरी थोडे व कांहीं अंशानें चुकीचे किंवा अशुद्ध उच्चारले गेले तरी माझ्या प्रश्नाचीं उत्तरें ते इतक्या लवकर समजूत पटून देत कीं मला आश्चर्य वाटे, इतकेंच नाहीं तर त्यांची अल्पशब्दी भाषा असूनही मला त्यांचा भावार्थ लवकरच कळे.

माझ्या शिक्षकानें असें सांगितलें कीं त्या देशाचें नांव नांडिन असून तेथील राजाचें नांव मिगिव असें आहे व ज्या अधिकाऱ्यानें मला बोलावलें त्याचें नांव पुलिह आहे. त्या अधिकाऱ्यापुढें गेल्यावर तेथील रिवाजाप्रमाणें मी सलाम करून बसलों. त्यानें मला प्रश्न विचारून फार थोडक्यांत माझे कडून पुष्कळ माहिती काढून घेतली व त्यानेंही कांहीं माहिती मला सांगितली. तो मुख्यतः धार्मिक विषयांतील अधिकारी होता. त्या विषयांतील माहिती त्यानें मला सांगितली, पण ती गूढमार्गी विशेष असल्यामुळें मला सांगतां येत नाहीं. इतकें सांगतां येईल कीं त्यांच्यांत धर्मसाधनाचे चार प्रकार असतात. एकामधें कांहीं विधि असतात, दुसऱ्यामधें ध्यान असतें, तिसऱ्यामधें सप्रयोग अध्ययन असतें व चवथ्यामधें एक प्रकारची आनंदाची अवस्था असते. ह्या चवथ्या प्रकारचे लोकांतून धर्मगुरु निवडले जातात, परंतु त्यांना इतर प्रकारांची चांगली माहिती असावी लागते.

ह्या अधिकाऱ्यानें माझ्या संबंधीं माहिती तेथील राजाला सांगितल्या-वरून त्याच्याकडून मला एक दिवस बोलावणें आलें. मी त्याच्या पुढें जाऊन तेथील रीतीप्रमाणें उजव्या हाताचें एक बोट भ्रूमध्यावर व डाव्या हाताचें बोट डोक्याचे मागील भागीं ठेवल्यावर त्यानें आपल्या हाताचें एक बोट माझ्या पुढें केलें. त्याचे योगानें माझ्यावर कांहीं विलक्षण परिणाम झाला. राजाशीं माझें संभाषण विशेषतः राज्यव्यवस्थेसंबंधीं झालें. पाहिली भेट अगदीं थोडी झाली. त्यानंतर त्यानें मला एका शिक्षकाकडे पाठविलें. त्यानें सुमारें २०००० वर्षांपूर्वीपासून आजतागायत जीं लहानमोठीं राज्यें झालीं त्यांतील राज्यपद्धतींच्या अनेक तऱ्हा सांगून राजा व प्रजा यांचे संबंध उत्तम राहण्याचे बाबतींत ज्या अडचणी येतात त्या सांगितल्या. प्रजा ही स्त्रीजातीसारखी असून भावनाप्रधान असते. तिला राजा हा पुरुषजातीसारखा असून क्रियाप्रधान असावयास पाहिजे व ह्या दोघांनीं ज्ञानप्रधान अशा पुरुषांची सल्ला घेऊन

त्याचा आदरानें उपयोग केला पाहिजे असें त्याचें मत होतें. राजाबरोबर दुसरी भेट झाली तींत राजानें सांगितलें कीं प्रजेच्या भावनाप्रधानतेला दडपून न टाकतां तिला योग्य वाव देणें, राजाच्या क्रियाशक्तिला ओहोटी न लागूं देणें व मंत्रीजनांच्या ज्ञानाचा झरा जिवंत ठेवणें यासाठीं राज्य-यंत्रांत योजना करणें इष्ट असतें. तसेंच धर्माचा व राज्यव्यवहाराचा संबंध पवित्रतेचा असावा लागतो. राजाचें भाषण थोड्या वेळांत व थोड्या शब्दांत झालें तरी तें आपल्या भाषेंत सांगितल्यास एक मोठा ग्रंथच होईल. थोड-क्यांत म्हणजे असें कीं ज्याला आपण लोकसत्ता म्हणून समजतों तो सध्यांचा प्रकार अगदींच गौण आहे. कारण ज्याला ज्या विषयांत कांहीं समजत नाहीं अशा विषयांत त्याला मत देण्याचा अधिकार ठेवण्यानें आणि लायकी न पाहतां कोणालाही एकाद्या अधिकाराच्या जागेसाठीं उमेदवार म्हणून उभा राहण्याची परवानगी दिल्यानें सत्तेचा दुरुपयोग होतो. लायकी पाहतांना शील, चारित्र्य, धर्मज्ञान ह्यांकडेही लक्ष्य दिलें पाहिजे.

माझे विनंतीवरून राजानें माझी व तेथील मुख्य धर्मगुरूंची गांठ घालून दिली. ह्यांना सलाम करतेवेळीं भ्रूमध्यावर व ताळूवर बोटें ठेवावीं लागलीं व धर्मगुरूंनीं माझे भोंवतालीं दोन्हीं बाजूंनीं दोन्ही हात लंबवर्तुळा-कृति फिरविले. त्याबरोबर माझ्या वृत्तींत एक प्रकारची विलक्षण शान्ति वाटूं लागली. त्यांनीं मला प्रथमभेटीनंतर एका कमी दर्जाच्या धर्मगुरुकडून परलोकासंबंधीं कांहीं माहिती देववून स्वतः कांहीं अदृश्य दृश्यें दाखविलीं. पण हे प्रकार वर्णनाच्या पलीकडचे आहेत. त्यावेळे पासून माझ्या कल्पना अगदीं बदलून गेल्या. हूंहूंहूंच्या राज्यांतून आल्यानंतर मला याहूंच्या बद्दल जी किळस वाटत असे ती जाऊन किळसवाण्या म्हणून समजल्या जाणाऱ्या गोष्टींतही अद्भुत सौंदर्य दिसूं लागलें.

ह्या देशांत एक वर्ष राहिल्यानंतर मी तेथून निघण्याचा विचार केला. कारण त्या देशच्या मानानें मी फार मागासल्यासारखा असल्यानें माझ्या शरीरावर व ज्ञानतंतूंवर फार ताण पडूं लागून त्या लोकांनाही उपसर्ग होऊं लागला. कारण त्या देशांतील प्रत्येकाच्या मागें राष्ट्राचा घटक म्हणून कांहीं कर्तव्य असे तसें मला आचरतां येईना. म्हणून मी राजाजवळ परत जाण्याची परवानगी मागितली. ती देऊन राजानें एक मनुष्य बरोबर दिला व एका स्वयंचलित गाडींत मला घालून उत्तर अमेरिकेंतील एका वसाहतीनजीक सोडून दिलें. मजबरोबर दिलेल्या कांहीं सोन्याच्या तुकड्यांचे सहाय्यानें मी सन १७२२ च्या नाताळच्या आदल्या दिवशींच आपले कुटुंबांत येऊन पडलों. थोड्या दिवसांनीं मला असें आढळून आलें कीं माझे अंगीं नुसत्या हस्तस्पर्शानें कांहीं कांहीं रोग बरे करण्याची शक्ति आली आहे ! परंतु ही मी वापरूं शकलों नाहीं. कारण हा चेटकेपणाचा प्रकार असें लोक समजूं लागले व चेटकेपणाविरुद्धचा लोकक्षोभ अजून नाहींसा झालेला नव्हता.

## पडलेल्या पडद्यावरील मजकूर

सवडीचे अभावीं विलायतविहारची गाडी येथेंच शंट करून सायडिंगला ठेवावी लागत आहे. गाडी चालू असती तर ह्याच संचारांत कोल्हापूरच्या महाराजांच्या समाधीचें व छत्रीचें वर्णन, सिंदबादच्या नवव्या सफरींतील अग्नींतून चालणें, त्याची आमची संगत सुटून डॉन किझोट ह्या नवीन पात्राची गांठ पडणें, पुढील संचारांत गलिव्हरच्या सहाव्या सफरींतील अत्यंत मंदगति व मठ्ठबुद्धि लोकांचे राज्याची हकीकत, वगैरे देखावे दिसले असते. असो. दुसरी आवृत्ति निघण्याचा प्रसंग आल्यास तो सुरस कथाभाग यथामति निवेदन करितां येईल व कदाचित् गलिव्हरच्या पांचव्या सफरीची हकीकतही अधिक खुलाशानें सांगतां येईल. तोपर्यंत वाचकांनीं आपली उत्कंठाही सायडिंगला शंट करून ठेवावी अशी विनंति आहे.



फ्लॉरेन्स ( इटली ) येथील कोल्हापुरच्या महाराजांची छत्री.

चालोयान प्रेस, पुणें

# विलायतेंतील टिपणें.

( १९११ ते १३ सालीं विलायतेंत असतांना मी पाठविलेले कांहीं लेख चित्रमयजगत् मासिकांत प्रसिद्ध झाले होते. त्यांच्यांतील कांहीं भाग वगळून व थोडा फेरफार करून पुढील मजकूर तयार केला आहे. हा " विलायतविहार " सारखा काल्पनिक नाहीं, सत्य आहे. )

## बोर्नमथ, नाताळ १९११.

लंडन हें दाट वस्तीचें शहर असल्याकारणानें व तेथें नेहमीं धुकें असल्याकारणानें ज्याला ऐपत असेल तो माणूस थोडीशी सुट्टी मिळाल्याबरोबर बाहेर गांवीं जातो. आम्हींही नाताळची सुट्टी घेऊन त्याप्रमाणें समुद्रकांठीं एका गांवीं बोर्नमथ येथें एक वनस्पत्याहारी भोजनवसतिगृह ( बोर्डिंग हाऊस ) आहे तेथें जाण्याचें ठरविलें. बोर्डिंग हौसमध्यें विशेष हा आहे कीं सर्वांचें जेवण एका मोठ्या दिवाणखान्यांत होतें. आम्ही ता. २४ ला रात्रीं येथें येऊन पोचलों. दुसरे दिवशीं सकाळीं ९ वाजतां ब्रेकफस्ट ( न्याहारी ) ला गेलों. येथील लोकांची वहिवाट अशी आहे कीं सकाळीं उशीरां उठावयाचें व तोंड धुवून ( बरेच लोक असे आहेत कीं ते नियमानें दांत घासतातच असें नाहीं, पिवळ्या दांतांचे स्त्रीपुरुष फार दिसतात) पोषाख करून ब्रेकफस्ट घ्यावयाची व मग शौचास जावयाचें. स्नान आठवड्यांतून एकदां, क्वचित् दोनदां करतात. आमच्या संवयी निराळ्या पडल्यामुळें आम्ही शौचमुखमार्जन व स्नान आटोपून ब्रेकफस्टला जात असूं. रोजची ब्रेकफस्ट ८॥ वाजतां असते व सुट्टीच्या दिवशीं ९ वाजतां असते.

ब्रेकफस्टला विशेष कांहीं केलें नव्हतें. ह्या घरांत वनस्पत्याहारी लोकच फार होते. ते एकंदर ३०-४० होते व ५-७ टेबलांवर मिळून त्यांची व्यवस्था केली होती. एकंदर व्यवस्था टापटिपीची होती व २-३ दासींकडे वाढावयाचें काम होतें ( मालकिणीच्या हातांखालीं काम करणाऱ्या मेड सर्व्हंट्स् असतात त्यांस आम्ही दासी म्हणतों). त्यांना पुढच्या बाजूला एक पांढरें स्वच्छ एप्रन बांधलेलें असतें व डोक्यांत गजरे वजा पांढऱ्या स्वच्छ जाळीचा तुकडा असतो हें दासी ओळखण्याचें साधन होय. ब्रेकफस्ट झाल्यावर आम्ही समुद्रकांठीं हिंडावयास गेलों. कर्मधर्मसंयोगानें ह्या दिवशीं ऊन स्वच्छ पडलें होतें ( येथेंही उन्हाच्या नांवानें हांकाहाकच; पाऊसही वारंवार पडत असतो, परंतु लंडन सारखें येथें सर्वकाळ धुकें नसतें ). त्यामुळें चित्ताला अत्यंत आल्हाद झाला. थंडी होतीच परंतु चालण्यानें अंगांत ऊब आली व त्यांत कोंवळ्या उन्हाची भर पडली. त्यामुळें थंडीची मजाच वाटूं लागली. शिवाय हें स्थळही फार रम्य आहे. रस्ते चुनेगच्चीसारखे असून पदपथही तसेच रुंद आहेत व ठायीं ठायीं बांकें मांडलेलीं असून त्यांपैकीं कांहीं समुद्राकडीलखेरीज इतर बाजूंनीं व वरून आच्छादित आहेत. समुद्राच्या कांठीं आठ दहा पुरुष उंचीचा कडा असून त्याच्या पायथ्याशीं एक व टोंकावर एक असे दोन रस्ते आहेत. जवळच आंतील बाजूंस उद्यानें आहेत; त्यांपैकीं एकांतून एक कालवा नेला आहे. हा साधारण सहा फूट रुंद असून अर्धा पाऊण फूट खोल आहे. ह्याच्या दोन्ही बाजूंस पदपथ असून एका बाजूस पदपथामागें बांकावली ( हा समास शास्त्रोक्त नसल्यास बांकांची ओळ म्हणा ) होती व त्यांच्यामागें झाडें होतीं. ह्या कालव्यांतून बालकांच्या होड्या वाहात असून त्यांच्या मागोमाग बालकें जात होतीं. ह्या जागेस ‘ मुलांचा कोपरा ’ असें नांव आहे. सणावारांचा पोषाख करून नरनारी ( विलायती शास्त्राप्रमाणें नारीनर म्हटलें पाहिजे, उदाहरणार्थ लेडीज् अँड जन्टलमेन् ) विलसत होत्या. मध्यें एक बँडस्टँड होता.

तेथें विविधवाद्यस्वरततिसंमर्द श्रुतिगोचर होत होता. दुसरे एके ठिकाणीं समुद्रकांठचे कड्याचे मागें एक लहानशी दरी होती; त्या दरींत उद्यान तयार केलेलें होतें. येथें बाहेरून नवीं झाडें आणून लाविलेलीं नसून निसर्गायत्त झुडपेंच मोठीं मनोहर दिसतील अशीं केलेलीं होतीं. मधून मधून वांकडीं तिकडीं वळणें घेणारे पदपथ काढलेले असून कोठें कोठें अत्यंत उथळ असा एखादा लहानसा जलाशयही नयनगोचर होत होता. ह्या जलाशयांतही कांहीं बालकें स्प्रिंगच्या कळीच्या नांवा सोडून त्या इकडून तिकडे जात असतांना उत्सुकतेनें ईषत्स्मिताकुल नेत्रांनीं त्यांच्याकडे पाहात होतीं. ठिकठिकाणीं बांकें असावयाचींच. त्यांपैकीं कांहीं लताविरचित भिंतींमध्यें कोनाड्या सारखीं ठेविलीं होतीं. एकदोन टेनिस कोर्टें होतीं. मलमूत्रविसर्जनाच्या सोयी जागजागीं होत्या. मलविसर्जनासाठीं मात्र एक पेनी दाराच्या फटींतून आंत टाकल्याशिवाय दार उघडत नाहीं. ह्या सोयी स्त्रीपुरुषांसाठीं वेगळ्या असतात हें सांगावयास नकोच. उदधितीरगतपथाच्या मधूनच दोन ठिकाणीं समुद्राच्या आंत पीयर ( धक्के ) नेलेले होते. त्या धक्क्यांच्या दारावर दोन पेनी न देतां आंत जाण्याचा प्रयत्न केल्यास धक्का मिळतो असें माझा एक मित्र म्हणत होता. मी दोन पेनी आधींच दिल्यामुळें हें खरें कीं खोटें पहाण्यास सांपडलें नाहीं. ह्या पीयरच्या आंतमध्येंही बसावयाची व्यवस्था सुरेख केलेली असून तेथून देखावाही फारच रमणीय दिसत होता. आंत शिरल्यावर सुरवातीला धक्का २०–२५ फूट रुंद असून पुढच्या टोंकाकडे जास्त रुंद केला होता व टोंकाशीं अष्टकोनी आकार होता. सर्व पीयरभर तक्तपोशी असल्यामुळें आपण स्टीमरवर आहों कीं काय असा क्षणभर भास होई. कडेला सर्व बाजूंनीं बांकें असून मध्यें एक दुतर्फी पडवी होती. तिच्या आंत व बाहेर बांकें होतीं. मध्यें बॅंडस्टॅंड असून त्यापुढें बांकें होती. पलीकडच्या बाजूस क्षुधाशांतिगृह होतें. दुपारीं बाराचे सुमारास बॅंड

सुरू झाला; ते वेळेस गर्दी होऊं लागली व थोड्याच वेळांत सर्व जागा भरून गेली. युवतिगण आपला उत्तम प्रकारचा पोषाख करून तेथें आलेला होता. मखमल, साटिण व इतर जातींच्या उंची लोकरीच्या कापडाचीं तांबड्या, निळ्या, हिरव्या रंगांचीं वस्त्रें त्यांनीं परिधान केलेलीं होतीं, डोक्यावर लहानशा ताटलीपासून मोठ्या शिपतराएवढ्या आकाराच्या टोप्या होत्या; त्यांवर निरनिराळ्या रंगांच्या पाखरांचीं पिसें लावलेलीं होतीं. कांहीं टोप्यांवर फुलें, फळें वगैरे कृत्रिम प्रकार होते. एकंदरींत ही सर्व शोभा म्हणजे एखाद्या झाडाच्या फांदीवर पुष्कळशीं पांखरें जमावीं असी भासत होती. असो. अशा प्रकारें जवळपास हिंडावयास जाण्याचीं सर्व ठिकाणें बाकें, रस्ते वगैरेनीं भूषित केलीं होतीं. येथें मला फुलें मात्र फारशीं दिसलीं नाहींत. कांहीं शेवंतीचीं फुलें विकावयास आलीं होतीं; पण त्यांस वास नसतो. कदाचित् सध्यां हिंवाळा असल्यामुळें असें असेल. द्राक्षें, सफरचंदें वगैरे फळांसंबंधींही असेंच. हीं फळें दिसण्यांत गुलजार दिसतात. पण आपणाकडे ह्या फळांत जें स्वारस्य असतें तें एथें नाहीं.

हिंडून घरीं परत आल्यावर ड्राईंगरूममध्यें कांहीं वेळ स्वस्थ बसलों. येथें विस्तव लाविलेला होता ( भिंतींत शेगडी असते तेथें ) व पांच चार ताजीं वर्तमानपत्रें होतीं. दोन वाजतां जेवणाची वेळ झाली. रोजचा कार्यक्रम असा असतोः—सकाळीं ८॥ वाजतां न्याहारी, दुपारीं एक—लंच ( फराळ ), तिसरे प्रहरीं चार—चहा, संध्याकाळीं सात—जेवण ( डिनर ). सुट्टीच्या दिवसांचा कार्यक्रम असाः—सकाळीं ९—न्याहारी, दुपारीं २—जेवण ( डिनर ), तिसरे प्रहरीं ५—चहा, रात्रीं ८।।।—थंडें जेवण ( सपर ). जेवणास नेहमींपेक्षां एकदोन तऱ्हा जास्त असून एकीस ख्रिस्टमस् पुडिंग असें नांव दिलें होतें. प्रत्येकापुढें दोन दोन फटाकडे ठेविलेले होते. ह्या फटाकड्यांचा आकार व तऱ्हा हीं आपल्याकडील फडाकड्यांपेक्षां वेगळीं होतीं. फटाकडा कागदी असून सुमारें अर्धा फूट लांब असतो व मधें दोन करकोंचे असतात. हा फटाकडा

दोन माणसांनीं दोहीं कडून ओढावयाचा म्हणजे फट् असा आवाज होऊन एका करकोच्याच्या ठिकाणीं तो तुटतो. दोन करकोंच्यामधील भाग ज्याच्या हातीं जाईल त्यानें तो उलगडून पहावा ह्मणजे त्यांत कांहीं पदार्थ सांपडतो. हे पदार्थ नाना तऱ्हेचे असतात. कांहीं फटाकड्यांत कागदांच्या टोप्या—पुरभय्या फॅशन—निघाल्या. त्या ज्यांस सांपडल्या त्यांनीं आपल्या डोक्यांवर घातल्या. कांहींच्या फटाकड्यांतून वाजणाऱ्या चिमण्या निघाल्या, त्या लोक वाजवूं लागले; व त्यांचा एकच गलगा झाला. कोणाच्या फटाकड्यांतून मुलें (बाहुल्या), कोणाच्यांतून खेळणीं, वगैरे नाना तऱ्हा निघाल्या व अशा तऱ्हेनें जिकडे तिकडे हंशा माजून राहिला. जेवण झाल्यावर काय करावयाचें हा प्रश्न आला. आमचे टेबलावर एक इंग्रज भाऊबहीण बसलीं होतीं. भाऊ म्हणाला आपण पत्ते खेळूं. मी म्हटलें मी पैसे लावून खेळणार नाहीं. तो म्हणाला आम्हीही पैसे लावणार नाहीं (थोडे तरी पैसे लाविल्याशिवाय गोरे लोक पत्ते खेळत नाहींत. मी तर एक पैशाची पैजही कधीं लावीत नाहीं. हा मी जुगार समजतों). आम्ही एकंदर पांचजण होतों. तिघे हिंदी व दोघें तीं. त्यानें आम्हांस एक डाव शिकविला तो असाः— पांचांपैकीं प्रत्येकानें आळीपाळीनें वांटावयाचे व वांटणारानें तो डावभर स्वस्थ बसावयाचें. डांव कांटून हुकूम ठरवावयाचा. प्रथम ज्यास बांटलें त्यापासून बोलत जावयाचें. चार हात होण्याची जर आशा असेल तर 'आय प्रपोज' म्हणावें; पांचांची आशा असेल तर 'सोलो' म्हणावें. त्याच्या पुढची पायिरी म्हणजे मुळींच हात न करितां राहतां येणें त्याला 'मिझेरअर' म्हणावें व नऊ हात करतां येणें त्यास 'अबंडन्स' म्हणावें. एकानें 'आय प्रपोज' म्हटलें असतां व दुसऱ्यानें 'आय् ॲक्सेप्ट' म्हटलें असतां दोघांनीं मिळून आठ हात करावयाचे. मिझेरअर डाव खेळावयाचा म्हणजे त्यास निराळ्या रीतीनें पानें टाकावीं लागतात, हें प्रत्यक्ष खेळतांना

दिसून येईल. एकंदरींत डाव सातहाती किंवा लाडिसाप्रमाणेंच खेळावयाचा असतो. [ इकडील लोकांना झब्बू ऊर्फ टोह्या ऊर्फ गुंडी हा डाव माहीत नाहीं ! अहाहा त्या डावाची मजा कांहीं और आहे ! ] थोडया वेळानें आमचे शेजारीं एक बाई [ साधारण म्हातारीशी होती ] रिकामी बसलेली इंग्रजानें पाहिली व त्यानें तिलाही खेळावयास बोलाविलें. नंतर वांटणारा व त्याचे समोरचा असे दोघे प्रत्येक वेळीं रिकामे राहत. बाईला खेळ येत नव्हता, पण वांटणारा इंग्रज रिकामा होता, तो तिला सांगत होता. त्यानें तिला सुचविलें ' आय प्रपोज ' म्हण. बाईला कौतुक वाटलें. तिनें मोठ्या गमतीनें म्हटलें ' आय प्रपोज. ' पुढें मीच होतों. अस्मादिकांनीं म्हटलें 'आय ॲक्सेप्ट. ' एकंदर दहा हात झाले; बाईचें नशीब चांगलें !

इतक्यांत चहाची वेळ झाली. चहा झाल्यावर एका गृहस्थानें ड्राईंग रूममध्यें रास्किनवर भाषण केलें तें ऐकावयास गेलों. त्यानें रास्किनचे कांहीं काव्यमय उतारे म्हणून दाखविले व त्याची निंदा करणाऱ्यांची निंदा केली. मधून मधून लोक कंटाळलेसें वाटलें म्हणजे एखादा विनोदी चुटका म्हणून दाखवी. त्यांत एक जर्मन गृहस्थ इंग्रजींत आपली हकीकत सांगतो आहे अशी नक्कल केली. हकीकतीचा सारांश असाः—एक श्रीमंत गृहस्थ मेला; त्यानें कांहीं रक्कम काढून ठेविली व तिच्या व्याजांतून कांहीं वर्षासन, यांचीं एक आवडता कुत्रा होता तो ज्याच्याकडे जाईल त्यास, कुत्रा जिवंत आहे तोंपर्यंत द्यावयाचें व नंतर एका संस्थेला द्यावयाचें, असें लिहून ठेविलें. तो कुत्रा माझ्याकडे ( जर्मन गृहस्थाकडे ) आला व त्याप्रमाणें मला कांहीं वर्षें वर्षासन मिळालें. पुढें कुत्रा मेला; मग त्याच्या पोटांत पेंढा भरून ठेवला व त्यांत अशा कळी घालून ठेविल्या, कीं कुत्रा डोळे उघडीत मिटीत असे व इकडे तिकडे चालत असे. कांहीं वर्षांनीं संस्थेचा सेक्रेटरी आला व म्हणाला 'कुत्रा फार म्हातारा झाला असेल नाहीं ?' मी म्हटलें 'चांगला आहे

अजून, पहा' असें म्हणून त्यास दाखविला. तो म्हणाला 'कुत्रा ओरडत नाहीं?' मी म्हटलें 'त्यास थंडी झाली आहे.' तो म्हणाला 'मी पुन्हां येईन त्या वेळेस त्याची थंडी बरी होईल अशी आशा आहे.' मग मी फिकिरींत पडलों. पण माझ्या बायकोनें युक्ति सुचविली. त्याचे पोटांत फोनोग्राफ घालावा. मी एक फोनोग्राफ आणला व त्याच्या पुढें दुसरा कुत्रा ठेविला व त्यानें ओरडावें, म्हणून त्याला म्हणालों 'ओरड, चांगला ओरड'. अशा रीतीनें कुत्र्यांचें ओरडणें कुत्र्याचे पोटांत भरलें. सेक्रेटरी आला ते वेळीं मी फोनोग्राफची कळ दाबली. तेव्हां कुत्रा ओरडूं लागला 'भोः भोः' पण बोलूंही लागला 'ओरड, चांगला ओरड'. कारण माझे शब्द फोनोग्राफमध्यें गेले! लबाडी उघडकीस येऊन वर्षासन गेलें व कुत्राही लाथेनें फुटून गेला!

व्याख्यान झाल्यावर थाळी फिरविली व जमलेले पैसे व्याख्यात्यास दिले. दोन तास व्याख्यान झालें. रात्रीं नऊ वाजतां सपर झाल्यावर आम्ही खालच्या मोठ्या दालनांत गेलों. तेथें प्रथम कांहीं वेळ गायन वगैरे झाल्यावर खेळांस सुरवात झाली. पहिला खेळ झाला तो असा:——आह्मांस सगळ्या पुरुषांस मध्यें एका ओळीनें उभें केलें, तें असें कीं नं. १।२ ह्यांचीं तोंडें एकमेकांकडे; नं. ३।४ ह्यांचीं एकमेकांकडे इत्यादि म्हणजे एकाआड एकाचीं तोंडें एक दिशेला व राहिलेल्या एकाआड एकाचीं विरुद्ध दिशेला. नंतर सर्वांस आपले उजवे हात कमरेवर ठेविण्यास सांगितलें, म्हणजे आपले हातांत दुसऱ्यास हात घालतां यावा. मग पुरुषांपेक्षां संख्येनें एक जास्त इतक्या स्त्रिया भोंवतालीं एकी पुढें एक उभ्या केल्या. नंतर पियानोच्या तालांत स्त्रिया पळूं लागल्या व पियानो थांबल्याबरोबर प्रत्येकीनें पुरुषाच्या हातांत हात घातला; परंतु एक स्त्री जास्त असल्यामुळें रिकामी राहिली तिला खालीं बसविलें व एका पुरुषासही ओळींतून बाजूस बसविलें. म्हणजे आतां सुद्धां पुरुषांपेक्षां स्त्रियांची संख्या एकानें जास्त झाली. पुन्हां पियानो सुरू झाला, स्त्रिया पळूं

लागल्या, पियानो थांबला, स्त्रियांनीं पुरुषांच्या हातांत हात घातले. एक रिकामी राहिली, तिला व एका पुरुषास खालीं बसविलें. असें होतां होतां एक पुरुष व दोन स्त्रिया राहिल्या; त्या त्याच्या भोंवतालीं फिरूं लागल्या व त्यांतल्या एकीनें त्याचा हात बाजा थांबतांच पकडला व तिचा जय झाला. ह्या मागून स्त्रियांस मध्यें उभें केलें व पुरुष भोंवतीं पळूं लागले, त्या वेळीं पुरुषांची संख्या स्त्रियांहून एकानें जास्त होती.

ह्यानंतरचा खेळ झाला त्यांत स्त्री-पुरुष हा भेद नव्हता. एकानें राज्य घेतलें व बाकीची मंडळी त्याच्या भोंवतालीं त्याकडे तोंड करून एकामागें एक अशा दोहों दोहोंच्या जोडया करून उभी राहिली. एका ठिकाणीं मात्र तिघे उभे राहिले. ज्यावर राज्य असेल त्यानें ह्या तिघांपैकीं पाठीमागचा असेल त्यास शिवलें असतां ह्याचें राज्य त्याच्यावर जातें. मग ह्यानें एका जोडीच्या पुढें उभें राहावयाचें; म्हणजे त्या ओळींत तीन होतात. त्यांपैकीं तिसऱ्यावर ज्यावर राज्य आलें असेल त्यानें शिवायचें व स्वतः एका जोडी पुढें जाऊन उभें राहावयाचें. परंतु ह्या तिसऱ्यानें अंग चुकविलें व तो एका जोडी पुढें जाऊन उभा राहिला म्हणजे तो भयांतून सुटला. ह्या जोडीपैकीं मागच्या मनुष्यानें आपला नंबर तिसरा झाला हें ध्यानांत आणून सावध राहिलें पाहिजे व चटकन् एका जोडीच्या पुढें जाऊन उभें राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ह्या डावास शेवट नाहीं, कंटाळा आला म्हणजे सोडून द्यावयाचा.

ह्यानंतर कांहीं बारीक सारीक खेळ झाले, त्यांतला एक सांगतों. कांहीं मंडळी ओळीनें खुर्च्यांवर बसली व त्यांस फनी क्लब ( गमत्या समाज ) असें नांव दिलें, व बाकीच्या मंडळींस दिवाणखान्याबाहेर जाण्यास सांगितलें व एकएकास परीक्षेसाठीं बोलावून आणलें. प्रथम परीक्षा देण्याची पाळी मजरच आली. मला त्या क्लबापुढें खुर्चीवर बसविण्यांत आलें व सांगितलें ा मंडळींच्या कृतीवरून खुणेचा शब्द ओळखल्यास सामील करूं.

मी जसा बसलों त्याप्रमाणें बरोबर इतर मंडळी हात पाय ठेऊन बसली. प्रथम मीं 'आनंद, गम्मत' वगैरे शब्द सांगितलें. परंतु मी जें बोले तसें सर्व इतर एकदम बोलत व मी करीं त्याप्रमाणें इतर करीत. क्षणभर मला राग आला, परंतु रागावून काय उपयोग? इतक्यांत मला कल्पना येऊन मी म्हटलें 'इमिटेशन' (अनुकरण). इतरांनींही म्हटलें 'इमिटेशन' व एक बाई म्हणाली. 'आतां जवळ आलांत.' मग मी म्हटलें 'मिमिक्री' (नक्कल, कुचेष्टायुक्त अनुकरण) त्याबरोबर सर्वांनीं टाळ्या पिटून परीक्षा पास झाल्याचें कळविलें व मला त्यांच्या शेजारीं स्थान दिलें. नंतर एका इंग्रज गृहस्थास बोलाविलें. तो 'इमिटेशन' पर्यंत आला. व पुढें लवकर येण्याचा रंग दिसेना तेव्हां, त्यास शब्द सांगून सामील केला. नंतर एक उत्तर हिंदुस्थानांतील गृहस्थ आले, त्यांना ही मंडळी आपली नक्कल करितात हें कळल्याबरोबर त्यांनीं विलक्षण चेष्टा करण्यास प्रारंभ केला. खुर्चीसकट एक गिरकी मारली, पाय खूप ताणले, तोंडानें कांहीं तरी बडबड केली, हात वांकेड तिकेड केले व खुर्चीसकट मागें पुढें उडया मारल्या, ह्यामुळें त्यांचें अनुकरण करणें अशक्य झालें; बायकांनीं त्यांची नक्कल करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण व्यर्थ! शेवटीं त्यास शब्द सांगून सामील करून घेतलें. हें सगळें होईपर्यंत बाहेरच्या सर्व मंडळींस ताटकळत उभें राहावें लागलें, त्यामुळें खेळ लवकरच संपला. शेवटीं सर्वांनीं गर्भ्याप्रमाणें पियानोच्या तालावर एकमेकांच्या हातांत हात घालून फेर धरला व ख्रिस्टमसच्या रात्रींचा कार्यक्रम संपला.

माझ्या समजुतीप्रमाणें हा सण जितक्या हैसेनें व थाटानें साजरा होतो तितक्या हैसेनें येथें झाला नाहीं. त्याचें कारण तरणीं बांड गोरीं पोरें व पोरीं येथें थोडीं होतीं. बरींच माणसें पोक्त वयाचीं होतीं. मी वर लिहि- लेली हकिकत इंग्रजी नाताळोत्सवाची दर्शक ह्मणून लिहिलेली नसून माझा एके ठिकाणचा अनुभव म्हणून लिहित आहें. आपलेकडे मंगळागौरीचे

उत्सवाचे वेळेस कांही घरीं खूप मजा येते व कांहीं घरीं कशी तरी मंगळा-गौर जागविण्यांत येतें झालें. हें नवविवाहित मुलींच्या संख्येवर अवलंबून असतें. तेंच तत्त्व येथें लागू आहे. मंगळागौरींचे वेळचे आपले खेळ जुने झाले आहेत. त्यांत कांहीं नवीनपणा येईल तर बरें होईल.

सगळ्यांत एक महत्त्वाची गोष्ट सांगावयाची म्हणजे ह्या सगळ्या उत्सवांत धर्माचें अंग मुळींच दिसलें नाहीं. काय थोडे लोक चर्चमध्यें गेले असतील तर असतील. बाकी हा दिवस पवित्र आहे अशी कोणाच्या मनांत कल्पना आली असेलसें मला वाटत नाहीं.

---

## ईस्टबोर्न–हेस्टिंग्स, नाताळ १९१२

बोर्नमथ व ब्रायटन हीं समुद्रकांठचीं गांवें गेल्या नाताळमध्यें व ईस्टर मध्यें पाहिलीं असल्यामुळें यंदा ईस्टबोर्न एथें जाण्याचा विचार केला. पूर्वीं पत्रें पाठवून एक दोन ठिकाणीं चौकशी केली होती; परंतु तेथील व्यवस्था बरोबर न दिसल्यामुळें स्वतः जाऊन व्यवस्था करावी असें ठरविलें. त्याप्रमाणें ता. २४ रोजीं व्हिक्टोरिआ स्टेशनवरून निघून २॥ तासांत ईस्टबोर्न येथें पोंचलों. परंतु हवा फार खराब होती. पडशी क्लोकरूममध्यें टाकून गांवांत चौकशी करावयास निघालों. अपार्टमेन्टस् किंवा बेड–सिटिंगरूमपेक्षां नाताळची गम्मत पहाण्यास बोर्डींग–हाऊसच चांगलें म्हणून जेथें जेथें बोर्डींग-हाऊस दिसलें तेथें चौकशी केली. गोऱ्या लोकांपेक्षां एक दोन गोष्टी मला विशेष लागत असल्यामुळें त्याच्यासाठीं मला अधिक चौकशी करावी लागे. त्या म्हणजे रोज सकाळीं स्नान व वनस्पत्याहारी जेवण. ती सोय एके ठिकाणीं झाली. तेथील बाईनें विचारलें, तुम्हांस जेवणास काय पाहिजे ? मी म्हटलें भात व " करी " म्हणजे पातळ भाजी, इतर दुसरी एखादी भाजी व दुधाचें

एक पुडिंग (पाव हा सांगावा लागत नाहीं तो वाटेल तितका मिळतो). हे पदार्थ येथें देतां येतील असें ती म्हणाली. राहण्याची खोली पाहिली ती बरीशी दिसली व भाडेंही बेतांत होतें म्हणून तेथेंच तळ द्यावयाचा असें ठरविलें. मग स्टेशनवर जाऊन पडशी आणली.

परत आल्यावर ड्राइंगरूम ऊर्फ दिवाणखान्यांत विस्तव केलेला होता (ही शेगडी भिंतींत असते) त्याजवळ बसलों. तेथेंच एक उतारवयाचें जोडपें बसलेलें होतें. मी ज्या मुलीजवळ नामपत्रिका दिलेली होती तिच्या वरून तिनें त्यांचा माझा परीचय करून दिल्यावर संभाषणास सुरवात झाली. बाहेर असलेल्या खराब हवेच्या नांवानें खडे फोडल्यावर इतर विषय निघाले. मी हिंदुस्थानी आहें हें सवडीप्रमाणें कळविण्यास मी कधीं चुकत नाहीं. कारण माझ्या समजुतीनें ही एक अभिमानाची गोष्ट आहे. दिल्लीच्या अत्याचाराची† गोष्ट निघून त्या प्रकाराबद्दल खेद व तिरस्कारपूर्वक उग्दार काढून इतर कांहीं रिकामटेकड्या गोष्टी बोललों तों चहाची वेळ झाली. चहास तीन चारच मंडळी होती. हें पाहून येथें नाताळची मजा येणार नाहीं असें वाटून खेद झाला. चहा झाल्यानंतर समुद्रकांठीं हिंडावयास गेलों, परंतु दोन चार दिवस वादळ चालू होतें आणि वारा व पाऊस यांचा तडाका चालू होता. त्यामुळें चालण्याचा फारसा हट्ट न धरतां अडोशाचीं विरामस्थानें समुद्राभिमुख ठिकठिकाणीं होतीं त्यांतील एकाचा आश्रय केला. विशेष थंडी नव्हती तरी 'हवा सर्द' असल्यामुळें 'सीरमें दर्द' उत्पन्न होण्याच्या भीतीनें परत आलों. इतर लोकही क्वचित दिसले. रात्रीं ९ वाजतां जेवण झालें.

बुधवार ता० २५ नाताळाचा दिवस, तरी पाऊस हलेना. ब्रेकफास्ट झाल्यावर इतर मंडळी चर्चमध्यें प्रार्थनेला गेली व मीही हिंदुस्थानांत शुक्रवारच्या मेलनें पाठविण्याचीं पत्रें लिहीत बसलों. कांहीं वेळानें मंडळी

---

† व्हॉइसरॉय साहेबावर बॅांब टाकला होता त्याबद्दलची.

परत येऊन गप्पागोष्टी, हवेच्या नांवानें बोटें मोडणें इत्यादि शिष्टाचार झाल्यावर दुसऱ्या एका दिवाणखान्यांत जेवण मांडलें होतें तेथें गेलों. ह्या वेळीं एकंदरींत बरीच मंडळी जमली होती. दोन लांब टेबलें एकास एक जोडून दुप्पट लांबीची जागा जेवण्यास केली होती. मधून टेबलांवर कांचेच्या कुंड्यांत हॉलीच्या फांद्या ठेविल्या होत्या. (हॉलीच्या फांद्या नाताळाच्या सणांत शुभ चिन्ह म्हणून समजलें जातें.) छताला कागदाचे नक्षिदार वेल लावलेले होते. अशा थाटानें आम्हीं जेवावयास बसलों होतों. माझें शाकाहारी जेवण काळजीपूर्वक तयार केलेलें असून तीन चार प्रकारचे पदार्थ आले होते. मीं दारू घेत नसल्यामुळें उतार वयाच्या गृहस्थाच्या सूचनेवरून कॉफीच्या पेल्याच्या योगानें आम्ही सर्वांनीं घरच्या मालकिणीचें आरोग्यचिंतन केलें. जेवण चालू असतांना कोणीं कूट प्रश्न विचारीत होते, कोणी विनोदी गोष्टी सांगत होते, तर कोणी पुढें असणाऱ्या पदार्थांची स्तुति करीत होते. जेवण यथास्थित झाल्यावर वामकुक्षी वगैरे करावयास मंडळी इकडे तिकडे गेली. मीही शतपावलीनिमित्त बाहेर जाऊन आलों. नंतर मंडळी पत्ते खेळावयास बसली. व्हिस्टचा डाव सुरू केला. व्हिस्ट आपल्या सातहाती प्रमाणेंच खेळावयाचें. परंतु पत्ते वांटण्याचें काम पाळीनेंच करावयाचें. ही पाळी आपल्यांत उजवीकडून फिरते पण त्यांच्यांत डावी कडून फिरते. प्रत्येक डावांत एकापक्षाचे सहापेक्षां जितके जास्त हात होतील तितके तितके त्या पक्षाचे नांवानें कागदावर टिपून ठेवावयाचे. पांच मार्कांची गेम व दोन गेमांचें रबर होतें. हुकुमासाठीं वाटणाऱ्याच्या उजव्या हातच्या माणसानें डाव काढून येईल तो हुकूम, पण वांटण्यासाठीं डाव पुन्हां कांटावयाचा. कांहीं वेळ खेळल्यावर चहाची वेळ झाली. चहा झाल्यावर मग ख्रिस्टमसच्या खेळांस जेवणाच्या दिवाणखान्यांत सुरवात झाली. इतर खोल्यांत तक्तपोशीवर जाजम असतें, परंतु दिवाणखान्यांत तसें घातलें नव्हतें.

प्रथम एक बाई पियनोवर बसून वाजवूं लागली, दुसरा एक गृहस्थ तिच्या शेजारीं जाऊन गाऊं लागला व इतर मंडळीं पालुपदाचे वेळेस कोरस करूं लागली. अशा रीतीनें तेथें असलेल्या मंडळींपैकीं गायनवादनपरायण तरुणांनीं इतर जनांचें रंजन केल्यावर इतर खेळांस सुरवात झाली. गाणें व वाजविण्यासाठीं मलाही आग्रह करण्यांत आला. मी त्या कामांत एरव्हीं मागें घेतलें असतें असें नाहीं, एक दोन पदें त्यांच्या कानावर ठोकलींही असतीं; पण नाताळचा दिवस एकच व त्या दिवशीं होतां होई तों त्यांचे खेळ पाहण्याचा निश्चय केला असल्यामुळें विनयाचा वर्षाव करून सुटका करून घेतली. ह्या समयाला तेथें अठरा एकोणीस मंडळी जमली होती. पैकीं त्या कुटुंबांतीलच नऊ मंडळी होती. एकंदर पुरुषांपेक्षां संख्येनें स्त्रिया किंचित् जास्त होत्या. नृत्यकुशल मंडळींनीं कांहीं वेळ पियानोच्या तालावर नृत्य केल्यानंतर सर्व मंडळी दोन पक्षांत विभागली गेली. ते दोन पक्ष समोरासमोर उभे राहिले. मग एका पक्षाचे मंडळींनीं हातांत हात घालून तालांत पावलें टाकीत कांहीं वाक्य सुरावर म्हणत दुसऱ्या पक्षाकडे जावयाचें. जें वाक्य म्हणावयाचें त्याचा अर्थ असा. "तुमचे कडील अमुक मनुष्य आम्हांस न्यावयाचा आहे." इतकें म्हटल्यावर त्या पक्षानें परत जावयाचें. दुसरा पक्ष तसाच तालांत पुढें येतांना म्हणतो "त्याला न्यावयास तुम्ही कोण पाठवितां ?" मग पहिला पक्ष पुढें जातांना म्हणतो "आम्ही अमक्यास पाठवितों" मग दोन्ही पक्ष मागें राहून ज्यांचीं नांवें घेतलेलीं असतात तीं दोन मनुष्यें पुढें येतात. मध्यें एक खूण ठेऊन त्याचेवर हातांत हात अडकवावयाचा व ओढावयाचें. ज्याचा जोर कमी पडून तो खुणे पलीकडे जातो त्यानें दुसऱ्या पक्षाकडे जावयाचें. मग आव्हान करण्याची पाळी दुसऱ्या पक्षाकडे जाते. अशा रीतीनें एका पक्षाकडे माणसें अगदीं कमी राहीपर्यंत खेळ चालतो.

ह्याचे पुढील खेळ म्हणजे सर्व पुरुष सरळ ओळींत मध्यें उभे राहून त्याभोंवतीं स्त्रियांनीं पळावयाचें व बाजा थांबल्यावर प्रत्येक स्त्रीनें एका पुरुषाच्या

हातांत हात घालावयाचा. एक जण जास्ती उरते तिनें डावांतून बाहेर बसावयाचें व एका पुरुषासही बाहेर काढावयाचें. मग पुन्हा स्त्रियांनीं पळावयाचें. अशा रीतीनें शेवटीं एक स्त्री उरते तिचा जय. हाच डाव स्त्रियांस मध्यें उभें करून पुरुषांनीं भोंवतालीं पळून खेळावयाचा.

असे अनेक खेळ झाले ते क्रमानें देत आहें. एक स्त्री व एक पुरुष अशा जोड्यांची रांग करून एक मोठें वर्तुळ केलें. त्यांत स्त्रिया आंतील बाजूस होत्या व एक स्त्री जास्त होती. तिला राज्य देऊन मध्यें उभें केलें. बाजा वाजूं लागल्याबरोबर सर्वांनीं तालांत पळावयाचें व बाजा थांबल्याबरोबर प्रत्येक स्त्रीनें आपला हात काढून घेऊन पुढच्या जोडींतील पुरुषाच्या हातांत घालावयाचा. ह्या धांदलींत जिच्यावर राज्य असेल तिनें कोणा पुरुषाचा हात रिकामा असेल तर त्यांत आपला हात घालावा म्हणजे दुसरी कोणती स्त्री रिकामी राहते तिच्यावर राज्य. कांहीं वेळ असें चालल्यावर पुरुष आंतले बाजूस होतात व एका पुरुषास राज्य देतात.

ह्यानंतर आंधळी कोशिंबीर झाली. डोळे बांधलेल्या मनुष्यास इतर सर्व धक्के मारून कोट ओढून त्रास देतात. त्यानें कोणास धरिल्यास मग धरलेल्या माणसास चांचपून पाहावयाचें व नांव सांगावयाचें. तीनदां सांगून नांव चुकल्यास राज्य न जातां खेळ पुन्हा सुरू होतो. नांव सांगितल्यास धरलेल्या माणसास राज्य मिळतें. मग झिम्यासारखा एक खेळ होऊन बैठ्या खेळांस सुरवात झाली.

पार्सन्स कॅट—मराठींत समजण्यासाठीं मी ह्याला 'पाटलाचें शिंगरूं' असें नांव देतों. प्रथम एकानें राज्य घ्यावयाचें व आपल्या हातरुमालाचा चेंडू करून चटकन् कोणा एकाच्या अंगावर टाकावयाचा व टाकतां टाकतां म्हणावयाचें "पाटलाचे शिंगराचें नांव वा–१, २, ३, ४, ५, ६, ७, ८, ९, १०." हे दहा अंक मोजण्याचे अवधींत ज्याच्या अंगावर चेंडू टाकला

असेल त्यानें वा ह्या अक्षरानें सुरुवात होणारा कोणचाही शब्द सांगावयाचा (मग तें नामच असलें पाहिजे असें नाहीं). न सांगितल्यास त्यावर राज्य गेलें.

कांहीं मंडळी खुर्च्यांवर बसली व एक खुर्ची रिकामी ठेविली. प्रत्येक खुर्चीमागें एकेक मनुष्य उभें राहिलें. रिकाम्या खुर्चीच्या मागें उभे राहिलेल्या मनुष्यावर राज्य. त्यानें इतर एखाद्या खुर्चीवरील मनुष्याकडे पाहून डावा डोळा मिचकावयाचा, त्याबरोबर त्यानें उठून रिकाम्या खुर्चीवर जाऊं लागावयाचें. तितक्यांत ह्या उठणाऱ्या मनुष्याचे मागील उभ्या मनुष्यानें त्याच्या खांद्यावर हात ठेविल्यास ह्यानें पूर्वीच्या खुर्चीवरच बसावयाचें, नाहीं तर ही नवी खुर्ची रिकामी होऊन हात ठेवण्यास चुकलेल्या मनुष्यावर राज्य येतें. पोक्त बायकांना सुद्धां डोळे मिचकावितांना पाहून गम्मत वाटली.

बँडचा खेळः—बँडमध्यें प्रत्येकाचें वाद्य निराळें असतें. असलीं वाद्यें काल्पनिक रीतीनें सगळ्यांनीं हातांत घेऊन बसावयाचें व तें वाद्य आपण वाजवितों आहों असा अभिनय करावयाचा. हीं वाद्यें आधीं ठरलीं, त्यांत मी ट्रायांगल (त्रिकोण) घेतला, इतरांनीं हातबाजा, ढोल, भोंगाणा, बांसरी, अलगुज, वायोलिन्, चेलो इत्यादि वाद्यें घेतलीं. एकानें राज्य घेऊन तो कंडक्टर झाला. हा मध्यें उभा राहून हाताचे बोटानें कंडक्टिंग करूं लागला, त्याबरोबर सर्वांनीं आपआपलीं वाद्यें सुरूं केलीं. मी डावा हात ट्रायांगल धरल्याप्रमाणें वरतीं धरला व तो वाजवीत असल्याप्रमाणें उजव्या हाताचें बोट हालवूं लागलों. खेळ असा कीं कंडक्टर मधेंच आपलें काम सोडून दुसऱ्या कोणाच्या वाद्याचा अभिनय करूं लागे. ज्याच्या वाद्याचा हा अभिनय असेल त्याच्या तें लक्षांत येऊन त्यानें कंडक्टरप्रमाणें हात करूं लागावयाचें. असें केलें म्हणजे कंडक्टर आपलें काम पुन्हा सुरूं करतो व वाद्यवाला आपलें वाद्य वाजवूं लागतो. परंतु एखाद्या वाद्यवाल्याचे लक्षांत कंडक्टरची कृति न आल्यास तो शासनास पात्र होतो व फोरफीट (जप्त)

करण्यास जवळची एखादी वस्तु देतो. अशा रीतीनें बराच वेळ खेळ होऊन सात आठ वस्तु जप्त झाल्या. मग बँड थांबवून कोर्ट बसलें. एका मनुष्याला शासन करणारा न्यायाधीश केला. हें काम घरमालकिणीचे जांवई-बोवांवरच आलें. कंडक्टर त्यांचे पुढेंच पण त्यांच्याकडे पाठ करून बसला. त्याचे जवळ जप्त झालेल्या वस्तु होत्या त्या न्यायाधिशास दिसण्याजोग्या नव्हत्या. त्यांपैकीं एकेक वस्तु हातांत घेऊन ती ज्याची असेल तो पुरुष आहे अगर स्त्री आहे एवढें सांगावयाचें. न्यायाधीश लहरीप्रमाणें गमतीदार शिक्षा सांगे व ती आनंदानें भोगिली पाहिजे. ह्या शिक्षा अशा कीं, दिवाणखान्या-भोंवतीं नाचून येणें, एका दारानें दिवाणखान्याच्या बाहेर जाऊन दुसऱ्या दारानें परत येणें, टेबलावर उभें राहून नाचणें, नवऱ्याचें नांव घेणें, शेजार-च्या बाईचें चुंबन घेणें इत्यादि. कर्मधर्मसंयोगानें ही शेवटली शिक्षा मज-वरच आली व माझ्या शेजारची बाई ही न्यायाधिशाची बायकोच निघाली. मी मग आपली शिक्षा बदलून घेतली.†

पत्त्यांचे दोन जोड आणून एक बाई भोग्या होऊन मध्यें बसली. तिनें आपणांजवळ एक जोड घेतला व दुसरा जोड प्रत्येकास चार चार पांच पांच असा इतर मंडळींत वांटून दिला. बसलेल्या मंडळींनीं ओळीनें एकच प्रश्न विचारावयाचा. नंबर एकनें विचारलें "ह्या मंडळींत सर्वांत कुरुप कोण आहे?" मग भोग्या आपल्या पत्त्याच्या जोडांतील एक पान काढतो. समजा तो बदाम छक्का आहे. इतर मंडळींत कोणाजवळ बदाम छक्का असेल त्यानें तो दाखवावयाचा म्हणजे तो इसम प्रश्नाचें उत्तर होतो. ज्या

---

† एखाद्या पुरुषानें एखाद्या बाईचें चुंबन घेण्यामध्यें आपणांमध्यें जसा अश्लीलपणा समजतात तसा त्यांच्यांत समजत नाहींत, तरी पण जवळचें नातें, विशेष परिचय किंवा उघड विनोद ह्यांशिवाय असें चुंबन कोणी घेत नाहींत.

बाईजवळ बदाम छक्का निघाला ती सर्वांत कुरूप ठरली. दुसऱ्यानें प्रश्न टाकला, " आरशांत फार पाहण्याची हौस कोणास आहे ? " ह्याचें उत्तर दुसरी एक बाई निघाली. अशा रीतीनें बावन्न प्रश्न विचारून डाव संपला.

पुढील खेळांत एक मनुष्य राज्य घेऊन खोलीच्या बाहेर गेला व बाकीच्यांनीं खोलींतील एक लहान वस्तु ओळखण्यासाठीं ठरविली. बाहेर गेलेल्या माणसानें परत येऊन तो पदार्थ सांपडण्यासाठीं पाळीपाळीनें प्रत्येकास एक एक प्रश्न विचारावयाचा परंतु त्याचें उत्तर फक्त हो किंवा नाहीं एवढेंच मिळावयाचें. पदार्थ ओळखते वेळीं शेवटचें उत्तर ज्याचे तोंडून निघालें असेल त्याचेवर राज्य यावयाचे प्रश्न अशा प्रकारचे असतात " वस्तु प्राणी वर्गापैकीं आहे कां ? " (चामडें किंवा हाडकाचा पदार्थ असला तर ह्या प्रश्नाला हो म्हटलें पाहिजे ), लांकूड असल्यास वनस्पति वर्ग म्हणून तशा प्रश्नाला हो म्हटलें पाहिजे.

हे खेळ झाल्यावर थोडा वेळ नाच झाला. मला नाच येत नव्हता. म्हणून मी नुसता पहात बसलों. थोडा वेळ नाच पाहून मी निजावयास गेलों.

दुसरे दिवशीं एक पॅन्टोमाईम पाहाण्यास गेलों. पॅन्टोमाईम म्हणजे अश्लीलपणा नसलेला तमाशा. गोष्ट म्हणून कांहीं तरी एक असावयाची पण इतर भरताडही बरेंच असावयाचें. स्थल, काल इत्यादि संगतीची विशेष अपेक्षा नसते. विलक्षण झगझगीत देखावे, नाच, गाणें व पाचकळपणाचा विनोद दाखविण्यासाठीं कांहीं तरी प्रसंग आणलेले. क्वचित् प्रसंग नसूनही विनोद आणलेला. ह्या विनोदांत प्रचलित चर्चात्मक विषयांवर एखाद दुसरी कोटी असावयाची. त्या वेळेस प्रचलित विषय म्हणजे तेथें झालेला रेल्वेचा संप व लॉईड जॉर्जनें बसविलेले नवीन कर हे होते. पॅन्टोमाईममध्यें एकः जहाजाचा कॅप्टन एका खलाशाला म्हणतो " यू आर ड्रंक. " तो उत्तर

देतो "नॉट अॅकॉर्डिंग् टु लॉ" हा शब्दप्रयोग रेल्वेच्या संपांत प्रसिद्ध झाला होता. तसेंच एक पात्र दुसऱ्यास म्हणतें "तू प्रेम करावयास लाग." दुसरा विचारतो "प्रेम म्हणजे काय ?" पहिला म्हणतो "ज्यावर लॉईड जॉर्ज कर बसवूं शकत नाहीं असा एकच पदार्थ." दोन सुतारांमधील संभाषण:—"तूं कोठें चाललास ?" "लंडनला चाललों." "कशाला ?" "मी कॅबिनेट बनवावयास चाललों आहें." कॅबिनेट शब्दाचे दोन अर्थ आहेत, लांकडी पेटी व प्रधानमंडळ. प्रधानमंडळ मोडण्याची ते वेळीं भूमका होती.

तिसरे दिवशीं हवा मोकळी होऊन ऊन पडलें असल्यामुळें प्रॉमेनाडवर म्हणजे समुद्रकांठावरील रुंद अशा पदपथावर सहल करण्यास गेलों. हा प्रॉमेनॉड एकंदर तीन मैल लांब होता. हांके हांकेचे अंतरावर आच्छादित आसनें असून मधून मधून लांब लांब बांकेंही होतीं. ह्या वेळीं तेथें फार शोभा दिसत होती. चित्रविचित्रपरिधानभूषित तरुण स्त्रीपुरुष, दुड दुड चालणारीं मुलें, हातगाड्यांत दायांनीं चालविलेलीं अर्भकें, व्हिक्टोरिआ सारखा टप असलेल्या परंतु माणसांनीं हातांनीं ढकललेल्या लहान गाड्यांमधून म्हातारीं किंवा दुखणेकरी माणसें, सगळीं आज दिनकरार्पित ऐश्वर्य भोगण्यासाठींच येथें आलेलीं होतीं. वाळवंटावर मुलें वाळूचे किल्ले करीत होतीं. प्रॉमेनाडला लागूनच मोठा गाडीरस्ता असून पलीकडील घरांत तळमजल्यावर रमणीय पण्यवस्तुमंडित दुकानें असून माड्यांवर परस्थांसाठीं वसतिगृहें, हॉटेलें वगैरे होतीं. एकच न्यून होतें तें असें कीं घरांना रंग मिळमिळीत असून रचनेंत वैचित्र्य व नक्षीकाम नव्हतें.

प्रॉमेनाडला मधून मधून पीयर असतात. पीयर हा समुद्रांत भुशिरासारखा नेलेला एक रुंद लांकडी धक्का असून त्यावर नाटकगृह, बँडस्टँड वगैरे असतात. मधून मधून तिकिट लावून इतर कांहीं करमणुकीचे प्रकार,

व्याख्यानें वगैरे होतात. ह्या दिवशीं बारा वाजतां पीअरवर "बायासिकल डाईव्ह" होणार होती ती पाहण्यास गेलों. पीयरच्या टोकांशीं उतरत्या फळ्या लावल्या होत्या; त्यांवर एक मनुष्य सायकलवर बसून आला व सायकल फळ्यांवरून सुटल्याबरोबर सायकल सोडून त्यानें डोक्याकडून पाण्यांत बुडी मारली. सायकलला दोरी बांधली असल्यामुळें ती पाण्यांतून ओढून घेतां आली. उडी मारण्याची जागा पाण्यापेक्षां तीस चाळीस फूट उंच होती.

येथील ट्रॅम कंपनीची अशी एक सोय आहे कीं शहराभोवतीं सुमारें नऊ मैलाचा फेरा तिनें जवळपासच्या खेडेगांवांतून घेतला आहे; त्याला सरक्युलर रूट म्हणतात. हा फेरा घेऊन ट्रॅम एका तासांत परत येते. ट्रॅमच्या वरील मजल्यावरून शेतें, वाड्या, गांवें, वगैरेंचा देखावा फार मनोहर भासला. हा फेरा घेऊन आल्यावर संध्याकाळीं ५ चे गाडीनें निघून लंडनला परत आलों. गाडींत बसलों त्या वेळीं चांदण्या स्वच्छ दिसत होत्या.



# सुंठकेसर नटुकलें.

( १९२३ सालच्या मार्च महिन्याच्या शारदा मासिकाच्या अंकांत हा लेख प्रसिद्ध झाला होता. नटुकलें हा शब्द 'नाटक' शद्वाचें पिटुकलें म्हणून समजावा. सुंठकेसर ह्या नांवाची व्युत्पत्ति अशी कीं ह्याचे सुरवातीचे सुमारास सुंठ शद्ब आलेला असून अखेरचे सुमारास केसर शद्ब आलेला आहे. )

[ ज्या पात्रांच्या स्वभावदर्शनाची जरूरी नाहीं, त्यांचीं नांवें फक्त आंकड्यांनीं दर्शविलीं आहेत. ]

( अंक पहिला व शेवटचा. )

प्रवेश पहिला, स्थळ—गोपाळरावांचें घर.

( गोपाळरावांच्या पत्नी गोपिकाबाई व २ बाई बोलत बसल्या आहेत. )

२ बाई:—कां आज पुराणाला नाहीं कां यायचं ? कांहीं तयारी दिसत नाहीं ती ?

गोपिकाबाई:—आज नाहीं यायला व्हायचं ! मघांशीं गांवांहून यायचं झालं तेव्हांपासून सारखं डोकं दुखतं आहे. तूप, जायफळ चोळलं, दालचिनीचा अर्क लावला, झालंच म्हटलं तर सुंठीचा लेप दिला. तेव्हां आतां कुठें डोळा लागला आहे. जागं व्हायचं झालं तर पुनः कदाचित् सुंठीचा लेप द्यावा लागेल. तेव्हां बाई, आज कांहीं मला येतां येत नाहीं.

२ बाई—जोगेश्वरी आईचा अंगारा आणून लावा म्हणजे बरं वाटेल, आणखी दर्शनय् झाल्यासारखं होईल अनायासं.

गोपिकाबाईः--नको बाई. इतका वेळ तळमळ चालली होती, नुकतं कुठं पडायचं झालं आहे आन् डोळा लागला आहे, तर डोकं उतरल्याशिवाय येतां येत नाहीं. तुम्हीच येतांना अंगारा आणून द्या.

२ बाईः—बरं तर मी येतांना अंगारा घेऊन येतें हं ( कुंकू लावून जातात. )

प्रवेश २ रा, स्थळ–रस्ता.

[ २ बाईना ३ बाई भेटतात. ]

३ बाईः—कसं काय ? बरं आहे ना ? आज उशीरसा झाला देवदर्शनाला ?

२ बाईः—मधें जरा टेकलें होतें गोपिकाबाईच्या घरीं. त्यांच्या यजमानांची प्रकृति बिघडली आहे म्हणून थोडा वेळ थांबलें होतें.

३ बाईः—काय झालं आहे, त्यांच्या यजमानांना ?

२ बाईः—काय झालं आहे कोणास ठाऊक ! पण डोकं ठणकतं आहे. नुकतेच गांवांहून येऊन पडले आहेत. आणखी जरा डोळा लागला आहे.

३ बाईः—अगबाई ! खरंच कां ? आतां उद्यां बिद्यां जाईन समाचाराला. बरं, येतें. जातात.

प्रवेश तिसरा, स्थळ–देवळाचें दार.

[ ३ बाई व ४ बाईची गांठ पडते. ]

४ बाईः—कांहीं नवी जुनी खबर ?

३ बाईः—कांहीं विशेष नाहीं; पण २ बाई आतां भेटल्या होत्या. त्या सांगत होत्या कीं, गोपिकाबाईच्या यजमानांची तब्बेत बिघडली आहे. कुठें गांवांहून आले अन् वाटेंत पडले. डोळ्याला लागलं आहे, अन् डोक्यालाहि टेंगूळ आलें आहे; पण पुराणाला सुरुवात झाली सुद्धां. चला जाऊं.

प्रवेश ४ था, स्थळः—पुराण झाल्यावर देवळांतच.

[ ४ बाई व ५ बाई. ]

५ बाईः—आज पुराणांत द्रौपदीवस्त्रहरण सांगितलें हें भर दरबारांत कसं झालं असेल हो ? इतके कां सगळे लोक मेले नेभळट होते ? अन् धृतराष्ट्र तरी मुकाट्यानं कसा बसला कोणास ठाऊक !

४ बाईः—अहो तो बोलून चालून आंधळाच ? तरी बरी आठवण झाली, मघाशीं त्या ह्या म्हणत होत्या कीं, गोपिकाबाईचे यजमान कुठेंसे पडले अन् त्यांच्या डोळ्याला लागलं ! अगदीं हलुं देत नाहीं त्यांना !

५ बाईः—खरंच कां ? कुठें ठेंचबीच लागली असेल ! कुठेसे पडले ते ?

४ बाईः—तें कांहीं कळलं नाहीं ! पण म्हशीबिशीनें धक्का दिला असेल.

५ बाईः—असेल बाई ? अलीकडे हे गवळी लोक अगदीं उद्दाम झाले आहेत. गुरांना मुळीं आंवरीत नाहींत. ( बायकांची जाण्याची गर्दी होते त्या गर्दीत वेगळ्या होतात. )

प्रवेश ५ वा, स्थळः—देवळापुढील रस्ता.

[ ५ बाई व ६ बाई. ]

६ बाईः—कांहो थबकल्याशा ? घरींच जातां आहां ना ?

५ बाई—हीं गुरं जात होतीं म्हणून थांबलें. एखाद्या गुरानं धक्काबिक्का दिला म्हणजे पंचाईत. गोपिकाबाईच्या यजमानांना नाहीं एका म्हशीनें शिंग मारलें, तें त्यांचे दोन्ही डोळे गेले आणखी प्राणांत अवस्था झाली आहे.

६ बाईः—अगबाई खरंच कां ? औषध विवषध कांहीं चालूं ? कोणी मोठा डॉक्टर बोलावला असेल.

५ बाई—असेल बाई ! ते नेहमीं त्या गोऱ्या डॉक्टरला बोलावतात, त्यानं डोळे काढले सुद्धां असतील. बरें तुम्हाला समोर जायचं आहे नाहीं ! येतें आतां.

प्रवेश ६ वा, स्थळ—६ बाईचें घर.

[ ६ बाई व ७ बाई. ]

७ बाई:—काय बाई हवा पडली आहे. अशा हवेंत रोगराई सुद्धां वाढायची. तसं म्हटलं तर सकाळपासून दोन रामबोलो दारावरून गेलेले ऐकले. आणखी आमच्या बाळ्यानें एक ब्राह्मणाचें गेलेलें पाहिलें.

६ बाई:—कोणाचं बरं होतं तें ?

७ बाई:—कोणांसं ठाऊक बाई ! पण त्याच्याबरोबर अंतोपंत कृतांते होते म्हणून बाळ्या म्हणत होता.

६ बाई:—कृतांते कां, म्हणजे त्यांची भावजय ती आमच्या मागील दारच्या साळूबाईची नणंद ! साळूबाई नाहीं कां तुम्हांला ठाऊक ? अहो त्यांच्या भावला गोपिकाबाईची भाची दिली आहे ती. तरीच बरं कां ! अंतोपंत बरोबर होते तेव्हां गोपिकाबाईच्या यजमानाचं कांहीं तरी बरं वाईट झालेलं दिसतं आहे.

७ बाई:—कशावरून, ते कांहीं आजारी होते कीं काय ?

६ बाई:—तुम्हांला नाहीं कां माहीत ! अहो, ते अत्यवस्थ होते. एक गोरा डॉक्टर आला होता. अन् त्यानं त्यांचे डोळे काढले होते.

७ बाई:—अगबाई खरंच कां ? फार वाईट झालं बाई. मनुष्य कसा चांगला होता हो ! गोपिकाबाईच्या अंगावर दागिने बिगिने अगदीं भरपूर असत. बरं तुमची बगडी जागी झाली वाटतं; येतें आतां. (जातात).

प्रवेश ७, स्थळ—रस्ता. (कुत्रें तडफडतें आहे.)

[७ बाई व ८ बाई.]

८ बाई:—काय बाई पाहतां ? त्या कुत्र्याला कोणी तरी गोळी घातलेली दिसते आहे. आमच्या आळीलासुद्धां एक गोरा साहेब आला होता त्यानं एका कुत्र्याला गोळी घातली अन् तें तडफडून मेलं.

७ बाई:—हे गोरे साहेब काय करतील कोणास ठाऊक ! परवांच नाहीं कां एका गोऱ्यानं गोपिकाबाईच्या यजमानांचे डोळे फोडले आणि त्यामुळें ते आज आटपलेसुद्धां !

८ बाई:—अगबाई, खरंच कां ? अन् बायकापोरांना कांहीं राहिलं कां ? कर्ज मात्र असायचं नाहीं तर.

७ बाई:—असेल बाई, मनुष्य फार खर्चिक होता. अन् खटमल शेट सावकारांच्याकडे त्याचं जाणं येणं होतं असं ऐकलं होतं.

८ बाई:—असो. ह्या सावकारांनीं शेवटल्या दुखण्यांत नडवलं नसलं म्हणजे झालं.

७ बाई—अहो, सावकारांचं कांहीं सांगूं नका ! एकदां एका सावकारानं म्हणे प्रेतापाशीं धरणं घेतलं अन् मग आणखी सावकार आले. त्यांच्या धिंगामस्तींत प्रेत तिरडीवरून खालीं घसरलं.

८ बाई—अगबाई, ऐकावं तें एकेक नवलच ! बरं, तुम्हांला कोणी हाक मारतं आहे वाटतं. मी येतें आतां.

प्रवेश ८ वा, स्थळ:– ८ बाईचें घर.

[ ८ बाई व ९ बाई. ]

९ बाई:—कसं काय ! बरं आहे ना ? फार दिवसांत दिसलां नाहीं ! तेव्हां म्हटलं एकदां गांठ घ्यावी.

८ बाई:—मग नेहमीं कां येत नाहीं ! आतांशा मी जरा लवकर देवाला जाऊन येतें. अगबाई ! तुमच्या लुगड्यावर झुरळ आहे वाटतं.

९ बाई;—अगबाई ! [घाबरून पदर झाडते. झुरळ निघून जातें]. मी बाई झुरळाला फार भितें. पण काशीकाकूंचा बंड्या झुरळाच्या मिशा धरून त्याचे पंख तोडतो, मला पहावतसुद्धां नाहीं.

८ बाईः—ह्यावरून मला आठवण झाली. गोपिकाबाईंचे यजमान वारले म्हणे अन् त्यांना नेणार होते तर त्यांच्या सावकारांनीं येऊन त्यांना तिरडीवरून ओढून काढलं म्हणतात !

९ बाई—काय म्हणतां तरी काय ? अशानं मेलेलं माणूस जिवंत व्हायचं !

८ बाई—होईल बाई ! त्याचा नेम नाहीं. प्रेतं उठल्याचीं उदाहरणं कांहीं थोडीं नाहींत ! एकदां एक प्रेत उठलं आणखी सावकारांना मारीत सुटलं असं मी ऐकलं. सावकार पुढें आणखी प्रेत मागें असें नदीपर्यंत गेलें म्हणून माझी आई सांगत असे. त्या मेलेल्या माणसाची बायको मधें सांपडली तेव्हां तर तिच्या डोक्यांत सोटा बसला म्हणे.

९ बाईः—असेल बाई, नाहीं कोणी म्हणावं ! कोणी कांहीं म्हणो; पण माझी खात्री आहे कीं भुताच्या गोष्टी कांहीं खोटया नाहींत. आमच्या मामेसासूबाई सांगत असत (खालून हांक ऐकूं येते) अगबाई, तुमचीं मुलं आलीं वाटतं शाळेंतून, मी येतें आतां.

प्रवेश ९ वा, स्थळ–नदीचा घांट.

[बायका लुगडीं धूत आहेत.]

१० बाईः—किती बाई त्या चंडिकाबाई आपल्या सुनेला छळतात ! ती मेली तर भूत होऊन बसेल त्यांच्या बोकांडीस.

९ बाईः—बरी आठवण झाली. काल म्हणे, गोपिकाबाईंचे यजमान वारले अन् त्यांना स्मशानांत न्यायला लागली मंडळी. तर तें प्रेत उठलें आण तिरडीसकट धांवायला लागलं. आणखी म्हणे पाहिल्याप्रथम त्यानें गोपिकाबाईंच्या कपाळांत सोटा घालून त्यांचा कपाळमोक्ष केला.

१० बाईः—खरंच का ? कधींची गोष्ट ही ? अहो, नुकत्याच मी त्यांना पाहिल्या होत्या ! माझ्याबरोबर चिंगी होती तिलासुद्धां आठवत असेल.

मी घाईघाईनें चाललें होतें चिंगीचे मास्तर यायचे होते म्हणून. त्या मास्तरांना सुतक आहे म्हणून ते लवकर येऊन जातात. त्यांच्या चुलत चुलत चुलत्याचा मुलगा वारला फेंफऱ्यानें म्हणे. एकाएकीं भुतचेष्टेसारखं रस्त्यांतच फेंफरं आलं!

९ बाई:—असं एकाएकीं मेलं तर माणुस हटकून भूत व्हायचं. आमच्या वन्संच्या जावेची मावस बहीण मागच्या संक्रातीला आली होती ती सांगत होती कीं, तिच्या चुलतीच्या गांवीं एका बाईची आई गाडीचा धक्का लागून मेली तर ती भूत होऊन हिंडत असे, पण अगदीं जिवंतपणीं होती तशी हुबेहूब दिसत असे. आणखी कोणी माणूस दिसलं कीं त्याला हांका मारून जवळ आलें म्हणजे त्याला पकडून खात असे.

१० बाई:—मग गोपिकाबाईसुद्धां भूत झाल्या असतील कांहो?

९ बाई:—झाल्या असतील तर काय? (आपल्या लेकीकडे पाहून) नाहीं ग, वृश्चिके?

वृश्चिका (एका सुधारकाची बायको):—(स्वगत) आतां ह्यांची जरा चेष्टा करूं या. (उघड) अग, झाल्या असतील म्हणून काय म्हणतेस आई! मी सकाळीं बारा ज्योतिर्लिंगावरून येत होतें तर त्यांना मीं प्रत्यक्ष पाहिलें. एका बाईच्या कडेवरून मूल घेऊन त्या रस्त्यांत बसून त्याला फाडफाडून खात होत्या!

९ बाई:—चल! चावट कुठली!

वृश्चिका:—अग खोटं नाहीं! (रस्त्याकडे पाहून) त्या बघ त्याच येताहेत. आणखी त्यांच्या हातांतही लाल लाल कांहींसं दिसत आहे.

(गोपिकाबाई आपल्या मुलाची रंगपंचमीचा रंग उडालेली बंडी व यजमानांची तांबडी कानटोपी धुवावयासाठीं कळशीवर टाकून घेऊन येतात.)

वृश्चिकाः—अगबाई, आलंग आलं भूत! पळा! पळा!! (पळण्याचें मिष करते.)

इतर बायकाः—अग आई ग! (असें म्हणून पळत सुटतात. एक आवडी म्हणून मुलगी रस्त्यावर खेळते आहे.)

आवडीची आईः—अगबाई आवडी कुठें आहे? (गोपिकाबाई आवडीच्या जवळ येतात त्याबरोबर तिची आई किंकाळी मारून बेशुद्ध पडते.)

गोपिकाबाईः— अगबाइ त्याना झालं तरी काय? (त्या बाईजवळ जाऊन वांकून पहातात. बाईला पडतांना लागून रक्त आलं तें थांबवण्याचा प्रयत्न करतात.)

वृश्चिकाः—(*थांबून स्वगत) आतां पुरे गंमत. (मागें वळून पहाते तों गोपिकाबाईचे हात रक्तानं भरलेले आहेत! त्याबरोबर खरोखरच घाबरून "धांवा! धांवा" म्हणून ओरडत पळत सुटते.)

११ बाई (रस्त्यानं जाणारी)—अहो काय आहे तरी काय?

वृश्चिकाः—अहो तें पहा, लाल! लाल!!

११ बाईः—काय आग कीं काय? ("आग! आग" म्हणून ओरडत पळत सुटतात.)

१ बुवाः—[प्रवेश करून] अहो कुठें लागली आग?

(वृश्चिका घाटाकडे हात करून पळत सुटते.)

१ बुवाः—[घाटाजवळ दलीचंद मारवाड्याचे दुमजली घराकडे पाहून] धूर दिसतो आहे खरा. आग! आग!! [ओरडत पळूं लागतो.]

२ बुवाः—अहो कुठें आग लागली?

१ बुवाः—दलीचंद मारवाड्याच्या घराला. [दलीचंद मारवाडी माडीवरून एका माणसाला कांहीं कामासाठीं हांका मारतो.]




तिरडीसकट प्रेत पळत सुटलें !

२ बुवा:--अरे बापरे, माडीवर माणसें अडकलीं वाटतें ? आग ! आग ! ! [ म्हणून ओरडत पळत सुटतात. ]

गोपाळराव:—[ गोपिकाबाईंचे यजमान ] [प्रवेश करून ] अहो कुठें आग लागली आहे ?

२ बुवा:—दलीचंद मारवाड्याच्या घराला ! माडीवर माणसें अडकलीं आहेत तीं आतां होरपळून जातील !

गोपाळराव:--असं ! मी आतां शिडी घेऊन येतों [ पडदा पडतो. ]

प्रवेश १० वा, स्थळ—नदीघांट

( बायका पळताहेत. गोपाळराव पाठीवर शिडी घेऊन येतात. )

बायका [ पाहून ]:—अगबाई ! तिरडीसकट प्रेत पळत सुटलें आहे वाटतें. भूत ! भूत ! !

गोपाळराव:--आग ! आग ! !

[ हजारों बायका भूत ! भूत ! ! म्हणून ओरडतात; हजारों पुरुष आग ! आग ! ! म्हणून ओरडतात. ]

नटुकल्याचा ह्या पुढील भाग लिहिण्यास सवड नाहीं. कारण जेवणाची वेळ झाली असल्यामुळें पोटांत आग ! आग ! अशी ओरड झाली आहे व नटुकलें लिहिण्याच्या नादांत जें जेवण भविष्यकाळांत आहे त्याचा वर्तमानकाळ न झाल्यास स्वयंपाकघरांतून भूत ! भूत ! ! काळ होऊन जायचा. फक्त उरलेल्या भागाचा संक्षिप्त सारांश म्हणुन पुढें देत आहें.

ही गडबड पाहून पोलीस पाटील जो धांवत सुटला त्यानें मामलेदाराकडे जाऊन दंगा झाल्याची वर्दी दिली. मामलेदारानें ताबडतोब कलेक्टरला लुटालूट झाल्याचा रिपोर्ट दिला. कलेक्टरनें गव्हर्नरला जाळपोळ झाल्याची तार दिली. गव्हर्नरनें व्हाईसरायला बंड झाल्याचा टेलिग्राम दिला, व्हॉईसरॉयनें मुख्य प्रधानाला केसर बादशहानें हिंदुस्थानावर स्वारी केल्याचा केबलग्राम दिला

व मुख्य प्रधानानें साम्राज्यांतून सर्व ठिकाणचें सैन्य घांटाकडे रवाना केलें. ईजिप्तमधून ड्रगून्स आले, कानडांतून लान्सर्स आले, ऑस्ट्रेलियांतून हुजार्स आले, आफ्रिकेंतून ग्रेनेडियर्स आले, न्यूझीलंडमधून फ्युझिलियर्स आले व खुद्द लंडनमधील बकिंगहॅम पॅलेसमधून इंपीरियल योमन्री आली. त्या सगळ्यांनीं मिळून त्या बेशुद्ध पडलेल्या आवडीच्या आईला सावध करून वृश्चिकाबाईच्या सोबतीनें घरीं पाठवलें व केसर बादशहाला ठार मारल्याच्या तारा रूटरनें सर्व जगभर केल्या. नंतर "लंडन नदीघाट रॉयल एअरोप्लेन सर्व्हिस" मार्फत एका चार्टर्ड एअरो पॅलेसमधून खुद्द बादशहा येऊन हजर झाले. त्याबरोबर वृश्चिकाबाईसह सर्व नंबरच्या बाया ( गोपिकाबाई आणि आवडीसुद्धां ) व सर्व नंबरचे बुवा ( गोपाळराव व मारवाडीसुद्धां ) ह्यांनीं बॅंडबाजाचीं वाद्यें घेऊन राष्ट्रगीत वाजविलें. म्हणा " गॉड सेव्ह धी किंग "

कंसांत पडदा पडतो.



# रुक्कुठार.

( रा. रा. स. ना. ठोसर व मी असें दोघांनीं मिळून लिहिलेलें "नाट्यकलारुक्कुठार" अथवा "रा. श्री. कृ. कोलटकर यांच्या 'गुप्तमंजूष' नाटकावर संभाषणात्मक विनोदी टीका" नांवाचें पुस्तक १९०८ सालीं प्रसिद्ध झालें. हें दोघांनीं मिळून लिहिलें ह्मणजे लेखणीला दोघांनीं एकदम उजवे हातांत धरून लिहिलें असें नाहीं, तर कांहीं भाग एकानें व कांहीं दुसऱ्यानें असा लिहून एकमेकांनीं सुधारणा सुचविल्या. जो भाग मुख्यत्वें मीं लिहिलेला आहे, त्यांपैकीं दोन प्रवेशांवरील टीका दिली आहे. मूळ नाटकांतील उतारे मोठ्या टाइपांत घातले आहेत. )

## अंक २ रा, प्रवेश ३ रा.

( **प्रवेशाचा सारांश**--नंदिनीची विरहावस्था. तिच्या समाचाराला आलेल्या वंचकाचीं विलासाच्या विरहावस्थेबद्दल कुचेष्टा. )

बाबू०—( वाचतात ) 'कुचेष्टिनाः-कोण आहे तें ? कोण ? सुमंतकन्या सुनंदाबाई, सेनापतिकन्या असिलताबाई; न्यायाधीशकन्या तुलिकाबाई ? राजवैद्यकन्या सुभद्राबाई ? ज्योतिषीबुवांच्या लाडक्या ताराबाई ? '

हें संपतें तों मार्मिकरावांनीं मंत्र ह्मणावयाला सुरुवात केली. ' सुमंतकन्यां सुनंदादां चाणक्यगोत्रां स्वधानमस्तर्पयामि स्वधानमस्तर्पयामि । न्यायाधीशकन्यां तुलिकादां रामशास्त्रीगोत्रां स्वधानमस्तर्पयामि स्वधानमस्तर्पयामि । राजवैद्यकन्यां सुभद्रादां वाग्भटगोत्रां स्व. तर्प. स्व. तर्प. । सेनापतिकन्यां असिलतादां शिकंदरगोत्रां स्वधानमस्तर्प. स्व. तर्प. । ज्योतिषीकन्यां तारादां भास्कराचार्यगोत्रां स्व. तर्प. स्व. तर्प. ।

**शिकंदर गोत्रां स्वधानमस्तर्पयामि**

आम्ही त्यांना हो हो, पुरे, म्हणतों आहों पण ते लवकर थांबलेच नाहींत. ते थांबले तों एकाच्या अंगात आलें कीं, दुसऱ्याच्या येतें त्याप्रमाणें गद्यगदाधर भूगोल ह्मणूं लागले, ' इंग्लंडची राजधानी लंडन, फ्रान्सची राजधानी पारीस, स्पेनची रा. माद्रिड, पोर्चुगलची रा. लिस्बन, बेल्जमची रा. ब्रुसेल्स, हॉलंडची रा. अँटवर्प, डेन्मार्कची रा. कोपनहेगन, स्वीडन...'

हो हो हो करतां करतां हे थांबले. इतक्यांत बाबूराव ' नासिकत्रिं-बकच्या भिक्षुकांच्या वह्यांमधील पान ' म्हणून म्हणूं लागले. 'गोमा सोमाजी, आजे धोंडभट, पणजे केरू शास्त्री, त्यांचे वडील नथूभट त्यांचे भिकंभट '.

एवढा गहजब होण्याचें कारण मला समजेना व तें मीं त्यांना विचारलें तेव्हां,

वाच०–ही काय तऱ्हा हो, कीं आपली साहेब लोकांच्या लेव्हीला का दरबारला याद लागते त्याप्रमाणें एखाद्या पात्रानें इतर पात्रांची एका मागून एक गोत्रावळी सकट यादची याद द्यायची ?

मी––मग पुढल्या भाषणांतील शब्द प्रत्येकीचे तिच्या बापाच्या धंद्या-प्रमाणें येतात ती खुबी कशी कळणार ?

वाच०–––वाटल्यास त्यांच्या भाषणांत सहज कळवावें किंवा कुचेष्टिता एकटीच त्यांना येतांना पाहून आपल्याशीं त्यांचे गुण वर्णन करते आहे असें दाखवावें.

मी–मग कोणत्या पात्राचें नांव काय हें कसें कळणार ?

वाच०–नाहीं तरी काय लोकांच्या सांगून लक्षांत रहाणार आहे ? नाहीं म्हणायला असिलतेच्या हातांत एक तलवार व ताराबाईच्या डोळ्याला एक दुर्बीण किंवा वैद्याच्या मुलीच्या डोक्यावर काष्ठौषधीचा भारा दिल्यास न कळे.

मी–मग ह्याला करावें कसें ?

वाच०-मग मार्मिक श्रोत्यांना सुद्धां मोठ्या कष्टानें समजतील अशा कोट्या दृश्य काव्यांत घालूंच नयेत. बरें पुढें वाचा.

मी०-( पद म्हणतों पृ. ५५ ) 'स्थिति सोडुनियां मरणसम सुदति झडकरि परत जगतिं.'

मार्मिक०-मग गद्यांतच कां नाहीं म्हटलें 'अशी मेल्यासारखी काय पडली आहेस ?'

मी--( पुढलें पद म्हणतों पृ. ५६) 'तरुणीसही सखे नुचिता जनीं ॥ ध्रु० ॥ ...तो अनुभूति नेणि'

प्रसाद०-नुचिता नेणि नैकवे नादरी ह्या रूपांनीं काय प्रसाद येतो हो !

अर्थभट-शेवटली ओळ पुन्हां ह्मणा पाहूं ?

मी-' बालि झोंप योग्य ती। तरुणिं जागृति स्थिति। स्वप्न वयोवर्ति। तो अनुभूति नेणि।

अर्थ०—बक्षीस ! बक्षीस ! बक्षीस ! ! ह्या शेवटल्या ओळीचा संदर्भ व अर्थ सांगेल त्यास ५००० रुपयांचें बक्षीस ! आपण तर हरलों बुवा ! !

५००० रुपयांचें बक्षीस

बाबू०-( वाचतात ) सुनंदा—मी आपल्या गाण्यांत त्रिलास शब्द आणतें.

मी-( गातों ) ' त्याजि सखी पर्यंका राजविलासा भोऽऽऽऽ'

थूः थूः थूः

मी ऐटींत भोऽऽऽ करायला फोनोग्राफच्या नळ्यासारखें आपलें तोंड उघडलें असतां अर्थभटांनीं तंबाखूची सबंध पुडीची पुडी माझ्या तोंडांत उडवली त्यामुळें पुढचें 'गिं या' मधेंच गळाठलें.

तंबाखूची पुडी तोंडांत उडविली

अर्थ०—काय! तुमचें तोंड का? मग माफ करा हं! मी जरा बधेवत् असल्यामुळें स्वप्नांत होतों आणखी मला वाटलें कीं, तुमचें पसरलेलें तोंड ही पोष्टाची पेटी आहे व मी त्यांत पत्र टाकतों आहें.

मार्मि०—ही भोंकाड पसरण्याची चाल कुठली बुवा? हें पद कुत्र्याला म्हणावयाचें आहे कां मनुष्याला?

मी—(तोंड पुशीत) कां मुंबईस गुजराथी नाटकें पाहिलीं नाहींत वाटतें? उदाहरणार्थ कामलतेंतलें एक पद म्हणतों ऐका:-

'वरमाळ माळा झाली। शरमाण बाळा चाली।
हौंस हयानी पूरण करवा, व्हाऽऽऽऽऽलि व्हाली॥'

कां गोड लागतें कीं नाहीं?

शीघ्र०—गोड कसलें आलें आहे डोंबलाचें! मीं तर ह्याला कवित्वाचा खून म्हणतों. पांच सहा मात्रा जरी कमी असल्या तरी द्यावीं अवग्रह चिन्हें दडपून अन् घ्यावी तान न् काय? येथें "भोगि उठोनी या" इतकें मावलें असतें, त्याबद्दल 'भोऽऽऽऽऽगि या' असें घातलें आहे; ह्यांत काय प्रेम आहे? येथें तर हा भोंगाणा फार वाईट लागतो.

लाल०—'राजविलासा भोगी', विलास शब्दावर कोटि नंबर तीनशें तीन.

मी—(गातों पृ. ५७).

जमक जरि स्या निषेध करी। रमण हृदयांत संचारी। गृहाचें द्वार सुबद्ध जरी। खुलें हें हृत्कपाट तरी॥

अर०—वा कल्पना तर जेहेत्ते फार गोड आहे !

गद्य०—कां हो, संचारी हें कोणत्या क्रियापदाचें रूप आहे ?

मी—संचरणें ह्याचें.

गद्य०—मग आचरणें ह्याचें काय होईल ?

मी—(झटकन्) आचारी. (सर्व हसतात.)

मार्मिक०—(पुटपुटतात) 'रमण हृदयांत आचारी.'

मी (निराश होऊन पुढें म्हणतों.)

स्त्रियेच्या मानसीं प्रीती । जयी तुंबे तटप्रांतीं । तदा वाहे अकुंठगति । अनायासें तटासि चुरी ॥

प्रसा०—चुरी ? अहाहा ! काय गोड शब्द आहे पण ! आणखी काय तर तटासि चुरी. तटाचा प्रवाहानें अनायासें चुरा होतो कां !

मार्मि०—जसे पाय चुरतात तसेंच कांहीं असेल ?

बापु०—आणखी 'तदा वाहे अकुंठगति अनायासें तटासि चुरी' ह्याचा अलंकार सोडून तात्त्विक अर्थ काय हो ?

मार्मिक०—विलायती पोरी चोरून लग्न करण्यासाठीं ग्रेट्नाग्रीनला जात असत तसें तर कांहीं नाहीं ?

ग्रेट्नाग्रीन

बाबू०—असें असेल कीं, माझ्या बापानें हट्टच धरला तर मी पळून जाईन.

अर्थ०—असें नाहीं. तर विचार करण्याची मनाई हाच तट. इथेंच प्रीति तुंबली होती.

शीघ्र०—कवींनीं अलंकारांची तर मारे अगदीं गर्दी उडवून दिली आहे. त्या बेटया विकंठानें सुद्धां इतकी बहार केली नसेल. प्रथम हृदय

म्हणजे संचार करण्याजोगी जागा; लागलीच तें हृत्कपाट झालें. नंतर स्त्रीचें

तुंबून राहिलेल्या उपमा

मन म्हणजे एक जलाशय आहे! ह्या सर्व 'जयीं' तुंबून राहिलेल्या उपमा एकमेकाला गचांडया मारीत कवींच्या हृत्कपाटाचा तट चुरून बाहेर पडत आहेत. असो, पुढें वाचा.

बाबू०-(वाचतात) ' विलासराजांचा नौकर आपली भेट घेण्याकरितां आला आहे. '

वाच०:-हा नौकर कसा काय ठरला व दाईचे चिरंजीव विलासराज कसे झाले कोणास ठाऊक ?

मी:-कां ? एक राजपुत्र एक दासीपुत्र !

वाच०-राजपुत्र कशावरून ?

मी:-कां बरें ? दाईनें आपल्या भाषणांत सांगितलें नाहीं कां ?

वाच०-कोणाला सांगितलें ?

मी:-साऱ्या प्रेक्षकांना व वाचकांना सांगितलें नाहीं कां ?

वाच०-पण नाटकांतलीं पात्रें कोणत्या वर्गात येतात ? प्रेक्षक कीं वाचक ? नाटकांतील जग हें वर्तमान जगापेक्षां निराळें असतें व तें कवीच्या आधारावर असतें. पात्रानें आत्मगत भाषण कितीही कंठशोष करून केलें तरी त्या जगाला कांहीं कळत नाहीं. तेव्हां नाटकगत जगाला विलास हा दाईचा मुलगा आहे, हेंच माहीत असणार.

इतकी ढोबळ चूक कवीच्या हातून होईल हें मला शक्यच वाटेना. डोकें खाजिवतां खाजिवतां मला एक कल्पना सुचली. मी म्हटलें ' पण विलासालाच फक्त नंदिनीबरोबर राजपुत्रासारखें शिक्षण प्राप्त झालें होतें. '

वाच०:-म्हणून भावाचा नौकर होईल कीं काय ?

मी:०-पण विलासाचा स्वभावच तसा दिलदार व वागणूक डौलदार असली तर ?

मार्मि०—आणखी सूरत बूटइष्टाकणीदार असली तर ?

वाच०—म्हणून का वंचक भावाच्या हातचा मार खाईल ? त्याला अहोजाहो म्हणेल ? त्यांतून वयामध्यें १०।१५ वर्षांचें अंतर असतें तर असो; पण पहिल्या मुलाखतीचे वेळेस विलास १४ वर्षांचा व वंचक त्याच्या भाषणावरून त्याच्या बरोबरीचाच असावा असें दिसतें.

मी—पण दाईनेंच त्याला अहोजाहो म्हणायला शिकविलें असेल तर ? शिवाय विलासाचें कसें झालें तरी राजबीज !

वाचः—...कसलें घेऊन बसला राजबीज ! मेघनाथानें धुडकावून लावलेंच कीं नाहीं ? आणखी दाईनें कांहीं म्हटलें म्हणून लोकें येथल्यासारखी भावाला नोकर उगाचि म्हणतील !

बापूः०——तें कांहीं नाहीं ! काय झालें तें मी सांगतों. नायकाच्या पात्राला एक कोटया करणारा नोकर पाहिजे अशी आली कवीच्या मेंदूला नोटीस; पण पगार देण्याला ऐपत नाहीं हेंही कळलें. तेव्हां मेंदूतून शक्कल निघाली कीं, भावाला द्या नोकर म्हणून चेपून अन् काय ! दिलें झालें दडपून ! पण त्यामुळें दोष किती उत्पन्न झाला हें नाहीं लक्षांत आलें.

मीः—( घाईनें ) पण लक्ष्मण नव्हता कां रामाची सेवा करीत ?

**रामचंद्र लक्ष्मणाची कणीक तिंबीत नव्हते**

वाच०...पण रामचंद्र त्याची कणीक तिंबीत नव्हते ! व लोकही लक्ष्मणाला हा रामाचा चाकर म्हणत नव्हते.

पुढें मी पद म्हणतोंः

कुशालि बहु नांदतो नाथ माझा । विरहिं कीं पोळतो नाथ माझा ॥ ध्रु० ॥ अबलांचें सुकुमार जरी मन । संकटिं शांति करी तरि धारण पुरुषांचें परि होय विदारण । यासि असे अपवाद तो ॥१॥

अर०---जेहेचे विदारण होणें, फाटणें हे शब्द हृदयाला लागतात, मनाला जेहेचे ते लागूं शकत नाहींत.

बाबू०:-- क्लिष्टतेच्या मानानें पाहिलें तर पद बरें साधलें आहे.

प्रसाद०:--शब्दही बरेच गोड आहेत.

रागो०:—आणि चालही सुरेख आहे.

बाबू०:—( वाचतां वाचतां पृ. ६० ) कुचेष्टिता–एवढें खरें कीं तूं ही बगलेंतली मारलीस.

गवरा०:—ही बायकांच्या तोंडची भाषा बरें कां! कोटि करायला सांपडली म्हणजे झालें, मग सुशोभित विशोभित कांहीं तेथें पाहायचें नाहीं!

मार्मि०:—आणखी बगलेंतली गोष्ट मारीत असतात! थाप नाहीं!! एवढें खरें कीं, कवींनीं मराठी भाषा बगलेंत मारून ही रचना बगलेंतली मारली!

गप्पग०:—मी खात्रीनें सांगतों कीं, मागील पानावरील विलासाच्या पुष्पणा व हत्ती उंटाची गोष्ट, हें सगळें ही बगलेची कोटि ऐकविण्याकरितां कवींनीं लोकांच्या बोकांडीस बसविलें आहे. नाहीं तर इतकीं परस्परविरोधी व विशोभित भाषणें कशाला हवीं होतीं? आतांपर्यंतच्या भाषणांवरून वंचक हा चतुर व हुशार मनुष्य दिसतो; पण आतां त्याला इकडे जंगी जंगी कोट्या करीत असतांना सुद्धां अगदीं बावळट करून टाकलें आहे. असो; पुढें वाचा.

बाबू०—( वाचतात. ) वंचक–( एकीकडे ) अरे अरे! यांची मला दया येते. याचें दुःख कमी करण्याकरितां तोंड काढली पाहिजे. ( उघड )......बाईसाहेब माझे धनी दुःख करतात तें आपणासाठीं नाहीं, तर शांता नांवाची एक सुंदर कुमारिका आहे तिच्यासाठीं!

मध्यम०---पहा, त्याला दया येते आहे पण उपाय मात्र अजाण्या-सारखा योजतो आहे. मला वाटतें कवींनीं ह्याला विदूषक बनविल्यावर जास्त

स्थ मुळींच दिलें नाहीं. जेथें बावळटपणा बरा दिसेल तेथें बावळट केला आहे, चातुर्य हवें असेल तेथें चतुर केला आहे व हें सर्व संभाळून घ्यायला म्हणून खोटें बोलणें त्याच्या अंगीं लावून दिलें आहे झालें. विलायतेंत पूर्वी राजाच्या जवळ फूल्स म्हणून विदूषक असत; पण नंदिनी व विलास, वंचकाबद्दल जसें ' खोटें बोलण्याला तरी शहाणपणा लागतो ' ( पृ. ६४ ) व ' याच्यासारख्या मंद बुद्धीच्या मनुष्याला, ( पृ. ६ ) असे जे शब्द लावताहेत तसे ते त्यांना मूर्ख समजत नसत. ( उदाहरणार्थ, Touchstone in ' As You Like It, ' the Fool in ' King Lear, ' the Court Jester in Scotts 'Quentin Durward' &c ). एकंदरींत वंचकाचें पात्रासंबंधानें कवींनीं फार घोटाळा केला आहे. असो; चालूं द्या पुढें.

बाबू०—( वाचतात ) शांतीचें रूप विचाराल तर फारच सुंदर आहे; केवळ अप्सरा! तिच्यामध्यें एकच काय ती खोड आहे, ती अंगानें जराशी काळी आहे. फार काळी नाहीं हो ! येवढेंच कीं, तिला कोळशाची उटी लावावी तेव्हां चंदनाची उटी लाविल्याचा भास होतो......तिच्या डोळ्यांतील बुबुळांमध्यें मैत्री इतकी आहे कीं, तीं नेहमीं एकमेकांस चिकटून राहतात. ......हिचे बहुतेक दांत पडले आहेत; पण एक तर ओंठ जाड असल्यामुळें हें व्यंग सहज लपून जातें. व तिचा समोरचा एकच दांत इतका मोठा आहे कीं, बाकींच्या एकतीस दातांचा त्यानें वचपा काढला आहे, जसा कांहीं हस्तिदंतच ! हें हस्तिदंती काम डोळ्यांना दिसावें म्हणून नाकाला बसकें व्हावें लागलें आहे ! व तें पाहण्याकरितां हनुवटीही कौतुकानें लांब झाली आहे....... तसेंच ती कुबडी आहे पण नम्रपणा यायकांत अवगुण आहे असें कोणी म्हणावें ? आतां इतकें सौंदर्य अंगीं

शांतीचें रूप

आल्यावर अनेक देवींनीं त्या अंगावर राहण्याकरितां कोनाडे करून ठेविले तर त्यांत तिच्याकडे काय दोष ? ”

वाच०—वाहवा ! हें वर्णन फारच उत्कृष्ट साधलें असून यांत विनोद-पर भाषणाची कमाल झाली आहे. ह्यावरून वंचकाला चतुर कोण म्हणणार नाहीं ?

बाबू०—( वाचतात पृ. ६३ ) वंचकः– तो रुप्याचा डबा बरा दिसतो आहे; आपली मर्जी असेल तर तोही मला चालेल.

गद्य०—वंचकाला आणखी एक गुण घ्या; लोभीपणा ! हा केवळ थोडीशी कुचेष्टा दाखविण्याकरितां त्याचे माथीं मारला आहे. मिळून वंचक म्हणजे अठरा धान्यांचें कडबुळें झालें आहे झालं !

**अठरा धान्यांचें कडबुळें**

बाबू०—( वाचतात पृ. ६४ ) नंदिनीः–सुनंदे तुला पुरुषांचा अजून अनुभव नाहीं म्हणून असें म्हणतेस.

बापू०—ऐका ! सुनंदेला पुरुषांचा अनुभव नाहीं व हिला मात्र पुरता आला आहे !

मार्मिक०—कां ? तिला पुरुषांसारखें शिक्षण मिळालें आहे हें विसर-लांत वाटतें ?

बापू०—म्हणून पुरुषांचा अनुभव काय आला ?

मी—प्रत्यक्ष नाहीं तरी नाटकें कादंबऱ्यांतून तिला पुरुषांच्या स्वभा-वाचा अनुभव आलाच असेल.

वाच०—अनुभवाचा परिणाम काय ? तर वंचकाच्या असंभाव्य पर-स्परविरोधी व उघड उघड खोट्या बोलण्यावर विश्वास ठेवून लहानपणापासून बरोबर वाढलेल्या मनुष्याचा गैर-विश्वास धरणें ? मग हें पुरुषवजा स्त्रीशिक्षण अथवा पुरुषत्त्व वजा करून

**पुरुषांचा अनुभव**

पुरुषशिक्षण चांगलेंच म्हणावयाचें! बरें ह्यांचा अनुभव तरी काय आहे पाहूं!

मी—( गातों ) ' मधुकरी। रत जरी। मधुकरीं। बहु परी ॥... ती प्रती त्यजोनि भृंग। पंकजांत होई दंग। जी तदीय अर्ध अंग। तीस नादरी ॥

बापू०—नादरी कशावरून हो? कोणी आपला पोट भरण्याचा उद्योग करूं नये वाटतें? दिवसरात्र आपल्या स्त्रीचा आदर करावा? तसेंच मधुकरीचें ' बहुपरी रत ' त्व कोठें दिसून येतें? व ती पंकजांत जाऊं शकत नाहीं कीं काय?

वाच०—मला वाटतें ह्या पदाकरितां नंदिनीच्या ह्या मनोहर अनुभवाला मधेंच ओढलें आहे, दुसरें कांहीं नाहीं.

मी—भुंगा रात्रीं कमळांत अडकून पडतो त्यावर ही कल्पना असेल.

वाच०—वाः! काय मनोहर कल्पना हो! विबुधजनचित्तचातकस्वातिवर्षावाप्रमाणें आल्हादकारक आहे.

मार्मिक०—कसली कल्पना घेऊन बसलांत कपाळाची! पदांतील अनुप्रास तर पहा! जिकडे तिकडे रीरीरी अन् गगग रंगून राहिले आहेत.

रींरीरी गगग रंगून राहिले आहेत

प्रसाद०—' तीस नादरी ' हा प्रयोग अगदीं वाईट लागतो.

मार्मि०—अहो नंदिनीच्या शाळेंत ' तीस नादार ' विद्यार्थी 'मधुकरी' मागून शिकत होते त्याबद्दल हें पद आहे.

शीघ्र०—तेथें ' तिज न आदरी ' असें घाला.

## प्रवेश ४ था.

( सारांश—विलासाचा विरहशोक; त्याच्या समाधानाकरितां वंचक त्याला थाप देतो कीं, नंदिनीची प्रीति शृंगीवर आहे.)

बाबू०-[विलासाचें आत्मगत भाषण वाचतात]—जिचें मंजुल भाषण सुरू होतांच सपाटयाच्या वाऱ्यानें सुद्धां मर्यादेनें वहावयाला लागावें, फोंफावणाऱ्या प्रवाहानें आपली गति विसरून जावें, त्या सुंदरीची भेट झाल्यावर थोडासा विलंब लाविल्याबद्दल बिचाऱ्या वंचकास कां बरें दोष लावावा? .... .... या वेळीं नंदिनी वंचकापाशीं मला देण्याकरितां एखादी आवडीची भेट देत असेल. ती भेट कोणती असेल बरें? विरहतापामुळें रात्रीं गळयांत घातलेला आणि सकाळीं कोमेजून गेलेला पुष्पहार?

वाच०—वाहवा! येथपर्यंत वर्णन सुरेख आहे. पण यांत एखादें पद यायला पाहिजे होतें म्हणजे छान शोभलें असतें. जेथें जरूर तेथें पदें घालीत नाहींत व 'किती तरि शोधिलि मैत्रिणि संगें भवनिं परींगे कुठेंच नससी' असलीं पदें करितात.

जरूर तेथें पद नाहीं

बाबू०-( वाचतात ) किंवा स्वतः कशिदा काढलेला रुमाल?

मार्मिक०--खरी म्हटलेंच, आधुनिक स्त्रीशिक्षण अजून कसें नाहीं आलें.

बाबू०--पुरुषासारख्या शिक्षणांत कशिदा शिकवितात काहो?

मार्मि०--विलासासारख्या बायक्या पुरुषांना शिकवीत असतील.

बाबू०-( वाचतात ) मला तर तो कोमेजून गेलेला हारच अधिक आवडेल, कारण त्याची म्लानता तिच्या प्रेमाची निरंतर साक्ष देत जाईल.

गच्चम०---म्हणजे! तिचें प्रेम म्लान झालें कीं काय?

मी—तसें नाहीं हो; तिच्या प्रेमाच्या विरहतापामुळें म्लान झालेला.

मद्यग०--नाहीं तर म्लान झाला नसता वाटतें ?

वाच०--गणपतराव, या वाक्याचा अर्थ तसा होत नाहीं; तेथें भलताच अर्थ होत आहे.

बाबू०-( वाचतात ) पण रासिकास तो जास्त आवडेल; इतकेंच नाहीं तर त्या हाराप्रमाणेंच त्या सुंदरीच्या वक्षस्थळावर पडून कोमेजून जाण्यांतच तो धन्यता मानील.

वाच०—अहाहा! काय पण रसिक! असे रसिक मिळाल्यावर कवित्वनिवेदनाची भानगडच राहणार नाहीं! असे कोण रसिक आहेत कीं, जे सुंदरीच्या वक्षःस्थलावर पडल्यानंतर कोमेजून जाण्यांत धन्यता मानतील? कवींना म्हणावयाचें होतें कीं, सुंदरीचें मुळींच दर्शन न होण्यापेक्षां तिच्या वक्षःस्थळावर पडून मग कोमेजून गेलों तरी हरकत नाहीं.

मी०—उगीच बारीक सारीक अर्थभेद काय काढीत बसतां?

वाच०—बारीक सारीक? अहो, येथें तर अगदींच अर्थाचा अनर्थ झाला आहे. एकदां एक राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष प्रास्ताविक भाषणांत इंग्रजींत म्हणाले कीं हा मान मिळाल्यानंतर लागलीच जरी मरण आलें तरी हरकत नाहीं (म्हणजे जन्माचें सार्थक झालें). त्याचेंच एकानें असें भाषांतर केलें कीं, हा मान मिळाल्यानंतर लागलीच मला मरण येईल तर बरें होईल! तशापैकींच हें आहे.

मार्मिक०—एक पुरुषासारखें शिक्षण मिळालेल्या पतिव्रता होत्या. त्यांना परगांवीं गेलेल्या आपल्या यजमानांना लिहावयाचें होतें कीं, 'आपण गेल्यापासून मला दाही दिशा शून्य भासूं लागल्या आहेत.' पण एक शब्द बेटा

दाही दिशा शून्य = दाही दिशा मोकळ्या

चुकून त्याच्या जागीं त्याच्या समानार्थक दुसरा शब्द पडला व त्यांनीं लिहिलें ‘आपण गेल्यापासून मला दाही दिशा मोकळ्या भासूं लागल्या आहेत.’

वाच०—म्हणून म्हणतों शब्द वापरतांना फार काळजी घेतली पाहिजे.

शीघ्र०—पण मीं म्हणतों कोमेजून जाण्याचें कारणच नाहीं. हार कोमेजला तो त्याच्याच्यानें विरहताप दूर झाला नाहीं म्हणून कोमेजला, पण हे वल्लभदास रमणीच्या वक्षःस्थलावर पडल्यावर कोमेजण्याचें कारण तरी काय?

वाच०—तसें नाहीं. कोमेजलें तरी पुरवलें; पण घटकाभर तरी तिच्या वक्षःस्थलावर पडण्यास मिळावें. तथापि एकंदरींत शब्दयोजना अगदींच चुकली आहे. असो, चालूं द्या पुढें.

मी०—(पद अगदीं घोळून घोळून म्हणतों)

सुंदर रमणी दर्शनमात्रें प्रिय वाटे वैरीही ॥ वाटे आलिंगावा हृदयीं गाढ अशा बाहूंहीं ॥ ध्रु० ॥ देवपणा ये नंदीलागीं शंकरसन्मुखतेनें ॥ तृणहि महाचलमस्तकिं राहे तुंग म्हणुनि गर्वानें ॥ द्वारस्थाही नृपदासाशीं जन वागति बहुमानें ॥ परिसाच्या संगानें लोहा कांचनताही येई ॥

मला खात्री होती कीं, ह्या पदावर मंडळी गार होतील म्हणून. पद संपल्यावर मी त्यांजकडे अशा मुद्रेनें पाहिलें कीं, तशी मुद्रा शुंभसेनाला सुद्धां ‘सुखी दुजा कुणीं। न अधिक मजहुनि।’ हें म्हणतांना साधली नसेल! तितक्यांत बाबूराव हलकेच म्हणतात, “कांहो, ‘वैरीही’ ह्यांतलें ‘ही’ कशासाठीं घातलें आहे?”

मी०—त्याचें कारण साधे लोक प्रिय वाटलतीच; पण वैरी सुद्धां प्रिय वाटतील.

वाच०—ह्यालाच पुढें दृष्टांत आहे तेव्हां वैरीपणा कायम पाहिजेच!

मी०—होय, खरी गोष्ट आहे.

वाच०—आतां यापुढें बिंबप्रतिबिंबभाव कसा साधला आहे पाहूं.

( मग त्यांनीं कागद पेन्सिल घेऊन लिहिलें )

| | |
|---|---|
| रमणी | वैरी |
| शंकर | नंदी |
| महाचल | तृण |
| नृप | द्वारस्थदास |
| परिस | लोह |

ह्यावरून पहा कसा सगळाच गोंधळ करून दिला आहे तो. बरें पुढें प्रत्येकांत क्रिया काय आहे ती पहा! वैरी, प्रिय वाटे; नंदीला देवपणा ये; तृण गर्वानें राहे; दासाशीं बहुमानानें वागती; लोहा कांचनता येई. म्हणजे पुढच्या दृष्टांतांत योग्यताधिक्य आहे. पण अस्ताईतल्या वाक्यांत प्रेमोत्पत्ति आहे. 'रमणीदर्शनमात्रें वैरी आलिंगावा वाटे' याला दृष्टांत 'महाचल मस्तकीं तृण गर्वानें राहे.' वाः काय कल्पना व काय रचना!! तसेंच प्रथम दर्शनमात्रें व दृष्टांतांत सन्मुखतेनें, मस्तकिं राहण्यानें, दास्यानें आणि संगानें! कां, दृष्टांत अगदीं तंतोतंत उतरले आहेत कीं नाहीं?

शीघ्रकवी—( गातात ) थोर जनांच्या सहवासें ये अल्प नरा महती ती। लघु कितिही जरि जगतीं असले मान्याचि ते बहु होती ॥ ध्रु० ॥ देवपणा ये नंदीलागीं शंकरसन्मुखतेनें। क्षुद्र तृणांकुर गिरिवरि डोले तुंग म्हणुनि गर्वानें। कांचनताही लोहा येई परिसाच्या संगानें ॥ नृपभुवनींच्या श्वानाशींही जन वागति बहुमानें ॥ सुंदररमणीदर्शनमात्रें सेवकतागुण जाती ॥ १ ॥

मी०—( निराशेनें ) ह्या पदाला सुद्धां तुम्हीं नांवें ठेवायला लागलां मग काय म्हणावें?

वाच०---तसें नाहीं; यांची कल्पना चांगली आहे व येथें प्रेमातिशय व्यक्त करण्याच्या प्रसंगीं तर ती फारच शोभते; पण नुसती कल्पना काय उपयोगी? अर्धी कच्ची होती तशी घातली विटाळ्यांत व दिली ठोकून! बरोबर बसली न बसली पाहतो कोण? असो, वाचा पुढें.

अर्धी कच्ची घातली विटाळ्यांत व दिली ठोकून

मी—(पद म्हणतों) धन्य खरा तूं वाटसि आतां मद्रमणीच्या शुभ दर्शनें ॥

मार्मिक०---हे मद्रमणी कोण? कोणी मद्रपुरस्थ मणी असतील!

मी-(लक्ष न देतां पुढें गातों) पाहूं दे तुज या नयनांनीं फेडि तयांचें पारणें ॥ ध्रु० ॥ स्फटिक गृहिं जणुं स्थापिली नयनीं मूर्ति तिची पाहूं दे ॥ पुनीत तीच्या श्वासामोदें तनुतें भेटविं खेद ने ॥ १ ॥

वाच०—शाबास! ह्यांतील कल्पना किती मनोहर आहे व ह्या प्रसंगीं किती शोभते! पण नयनाला स्फटिकगृहाची उपमा कांहीं शोभत नाहीं.

बापू०—वंचकाचे डोळे घारे असले तर?

मार्मि०—मग खालीं एक नाटक कंपन्यांना सूचना द्यावयाची होती कीं वंचकानें आपले डोळे पांढरे करावे म्हणून!

ललितबुवा०— हा पहा आणखी एक सधन--विधन--संयोग 'दर्शनें' 'पारणें' 'खेद ने.'

रागोपंत०—काय हो, ह्याची चाल काय दिली आहे?

मी०– 'पुष्पपराग सुगंधित शीतल.'

प्रसादराय०—ही चाल किती गोड आहे! मूळच्या पदांतले शब्द पहा व ह्यांतले पहा. 'पुष्पपराग सुगंधित शीतल अति मंद चरे वनवायु हा!' हें किती गोड लागतें. नाहीं तर येथील शब्द पहा 'धन्य खरा तूं वाटसि आतां मद्रमणीच्या शुभदर्शनें.'

मार्मि०—भलतेंच ! इतके सोपे शब्द घातल्यावर मग संस्कृत शिकण्याचा व आपल्यांच्या डिक्शनरीचा फायदा काय?

बाबू०—( पुढें वाचतात पृ. ६६ ) विलासः—'त्यांतून त्याच्या सारख्या मंद बुद्धीच्या मनुष्याला हें सगळें रचून कसें सांगतां येईल.?'

वाच०—ऐका! वंचकासारखा फर्स्टक्लास कोट्या करणारा माणूस मंद बुद्धीचा आणि ही त्याची पारख त्याच्या लहानपणापासून बरोबर वागलेल्या सहोदरानें ऊर्फ धन्यानें केली! आतां येथें मंद बुद्धी वंचकाची म्हणायची, कीं विलासाची म्हणावयाची, कीं कवींचीच म्हणायची?

या नंतर सर्व प्रवेश होईपर्यंत कोणाची कांहीं टीका झाली नाहीं; पण प्रवेश संपल्यावर.

वाच०—हा व मागील प्रवेश दोन्ही मला निरर्थक दिसतात. ह्यांतील मुख्य भाग म्हणजे नंदिनीच्या सख्यांच्या व वंचकाच्या कोट्या, वंचकानें दोघांचा केलेला गैरसमज व नंदिनी व विलास यांची विरहावस्था. पैकीं नंदिनीच्या सख्या उगीच ओढून ताणून आणल्या आहेत. त्यांच्यावांचून खुशाल चाललें असतें, इतकेंच नाहीं तर त्यांच्यामुळें थोडीबहुत अडचणच झाली आहे. इतक्यांपाशीं नंदिनीला आपलें हितगुजही मोकळ्या मनानें सांगतां येत नाहीं व त्यांनाही हिचें समाधान करतां येत नाहीं.

मार्मि०—त्यांना सुशिक्षण मिळालें नसेल!

वाच०—बरें त्या विरहावस्थेचें वर्णन म्हणजे तिचा आत्मगत शोक हा तरी कांहीं सरस किंवा हृदयद्रावक असायचा होता? येथील विप्रलंभ शृंगार म्हणजे एक पद 'रुचे निद्रा सुखाची ती' व दोन चार वाक्यें एवढाच. पुढें शोकाची जागा मत्सरानें घेतली. ह्यांत कवींनीं काय साधलें कोणास ठाऊक? या मत्सराचा चांगला किंवा वाईट कांहींच परिणाम संविधानका-

वर घडत नाहीं कीं कांहीं घोटाळा होत नाहीं. पुढें एकदां गैरसमज दूर करण्याचा मात्र त्रास! मूकनायकांतील सरोजिनीचा विरहशोक पद्य 'अवचित गेलें किंकरकरिं ' ' होय संसार तरु ' व त्यापेक्षां ' उगिच कां कांता गांजितां दासी दीना .' तसेंच वीरतनयांत शालिनीचा ' निशिदिनिं मना ' ' मम मनासीं नसेंच कांहीं ' ' या जगताच्या ठायीं । न सौख्य उरलें पाहीं ' इत्यादि. पण वीरतनय व मूकनायक नाटकांत व ह्या नाटकांत हा फरक आहे कीं, तेथील शोकरस शुद्ध व निर्मळ आसल्यामुळें त्याचा इष्ट परिणाम श्रोत्यांच्या मनावर घडतो; पण ह्या नाटकांत शोकरस व हास्यरस ह्यांचें अजब मिश्रण केल्यामुळें भाकरीशीं लाडू तोंडीं लावल्याप्रमाणें धड ह्याचीही चव नाहीं आणि धड त्याचीही नाहीं असें झालें. खरें म्हटलें तर हा वंचक उगीच लुडबुड करतो आहे. ह्याचें नाटकांत यत्किंचित्‌ही काम नाहीं. नायक व नायिका यांना शोक करायला, हितगुज सांगायला वगैरे एखादी सखी व मित्र लागतात त्याप्रमाणें कुचेष्टिता व वंचक आहेत म्हणावें तर तेंही जुळत नाहीं. कुचेष्टिता फक्त तर्पण करणें व डब्यांत विंचू घालणें एवढ्यापुरती आणली आहे व वंचक तर विलासाच्या शोकरसांत आपला आचरटपणा व फजितरस आणून सर्व घाण करून टाकतो. एवंच, हे दोन प्रवेश अगदीं असून नसल्यासारखे आहेत.

भाकरीशीं लाडू तोंडीं लावणें

---

( खुलासा:—वरील चर्चामंडळांतील पात्रांची माहिती थोडी देणें अवश्य आहे. बाबूराव हे मूळ नाटकांतील गद्यभाग वाचतात व 'मी' म्हण-विणारें पात्र गाऊन दाखवितें आणि नाटककार ऊर्फ कवी यांची तरफदारी करितें. दाखविलेले दोष काढून टाकून दुरुस्त केलेलें पद म्हणण्याचें काम शीघ्रकवी करितात. गद्याबद्दल गद्यगदाधर, संगीताबद्दल ललितबुवा, पदांबद्दल प्रसादराय, अर्थाबद्दल अर्थभट, विद्वत्तेबद्दल वाचस्पति, कोट्यांबद्दल मार्मिकराव इत्यादि चर्चा करणारीं पात्रें आहेत. )

# चक्रंचक्री.

——:o:——

(१९२३ सालच्या मे महिन्याच्या शारदा मासिकाच्या अंकांत हा मजकूर आलेला आहे. पात्रांना व्यावहारिक नांवें देण्याऐवजीं खाद्य पदार्थांचीं नांवें दिलीं आहेत.)

" अग फोडणे ! तुझे डोळे लाल कशानं दिसताहेत ? आणखी हें ग काय ! कपाळाला शाईचा ठिपका कां लावलास ?" काफी काकू ह्मणाल्या.

" ह्मणजे !" फोडणी ह्मणाली. " मी आतांच काजळ घालून कुंकू लावून आलें ना ? शाईचा ठिपका कसला तो ?"

" अग बाऽऽइ" भाजीमामी ह्मणाल्या, " माझ्या आलं लक्षांत ! डोळ्यांत कुंकू घातलं आहे आणखी कपाळाला काजळ लावलं आहेन् काय ?" फोडणीनं आरशांत पाहिल्याबरोबर ती ओशाळली. " कनी, आपल्या नादांत डब्यांची जागा बदलली होती तें माझ्या लक्षांतच आलं नाहीं." असं कांहीं तरी ती पुटपुटली.

" पण नादांत तरी कसल्या होतीस ? आणखी तें पदाराखालीं पांढरं काय ग दिसतं आहे ?" काफी काकू म्हणाल्या.

ताबडतोब डांगरू म्हणाला " मघाशीं वडातात्यानें एक पत्र आणून दिलें आणखी म्हणाला, 'फोडणाताइ, तिकडचं पत्र दिसतंय ! हो नाग ताई ?"

" चल ! चहाटळ मेला कुठला." फोडणाबाई डोक्याला काटकोनभर गति देतांना आपल्या सफरचंदी गालांतून फुसकारल्या.

निमिषार्धांत ही हकीकत घरांतल्या सर्व माणसांमध्यें फैलावली. दुपारच्या वामकुक्षीनंतर घरांतील सर्व मंडळी बायकांसुद्धां एकत्र जमून थोडा

वेळ पत्त्याचा डाव होऊन गप्पासप्पा होण्याची भातसाहेबांच्या घरीं वहिवाट असे. मे महिन्याच्या सुट्टीमुळें भातसाहेबांच्या येथें चहाकाका, मसालामामा, ल्लुणकादादा, पापडबापू, वगैरे मंडळी यांच्या अर्धांगी काफीकाकू, भाजी-मामी, आमटीअक्का, चिकोडीआत्या, आपले मुलगे बत्ताश्या, फुटाण्या, जर्दाळू, पेढू व मुली खारकी, रेवडी, बर्फी, काबली, वगैरेसह रहाण्यास आल्या होत्या. शिवाय घरचीं माणसें म्हणजे मालकीण पोळीबाई, मुलगे वडातात्या व डांगरू, मुली फोडणी व चटणी, आणखी एक सून कढीवहिनी हीं होतीच. बिझिकचा डाव सुरू झाला. इतक्यांत रस्त्यावर एक भिक्षेकरी "बाई मी वेडी झालें" हें प्रासादिक पद म्हणत चालला होता. त्यावरून सकाळच्या हकीकतीची रसभरित पुनरावृत्ति झाली. तितक्यांत असें झालें कीं, मसालामामांनीं सहा पानांचा डाव झालेला उचलून टाकावयाचे ऐवजीं चिकोडी-आत्यांच्या पुढें ठेवलेलीं डबल सिक्केन्सासाठीं ठेवलेलीं पानेंच उचलून टाकलीं आणि पापडबापू पांच डाव पानें घ्यावयाचें विसरल्यामुळें पानें कमी भरलीं; तेव्हां त्यांना पांच डाव पान टाकण्याची माफी करण्यांत आली. फोडणीताई सकाळच्या प्रकारच्या पुनरुच्चारानें जी 'नर्व्हस' झाली ती स्वतःच्या मार्कर ऐवजीं विरुद्ध पक्षाच्या मार्करवरच मार्क लावून बसली; आणखी ही गोष्ट चहाकाकांनीं नजरेस आणली तेव्हां विरुद्ध पक्षानें डबल सिक्केन्स दाखविला, त्याचे मार्क तिनें आपल्याच मार्करवर मांडून टाकले. ह्या गोंधळामुळें डाव लवकरच थांबला व सर्वसाधारण संभाषणास सुरुवात झाली.

भातसाहेब म्हणाले " आमच्या आफिसांत एक पुरणसिंग म्हणून पंजाबी होता. तो रोज मधल्या वेळच्या फराळासाठीं पुऱ्या भरून डबा आणीत असे. एक दिवस एका माणसानें त्यांतील पुऱ्या खाऊन डबा

रिकामा करून ठेवला. कर्मधर्मसंयोगानें त्या दिवशीं पुरणसिंगाला मधल्या वेळेला फुरसत न झाल्यानें एक तासानंतर त्यानें तो उघडला आणि पहातो तों मोकळाच ! तेव्हां तो म्हणाला, " काय मी विसरभोळा आहें हो ! मघाशीं मीं फराळ करून सुद्धां टाकला, पण माझ्या लक्ष्यांतच नाहीं ! "

आमटीअक्का म्हणाल्या, " माझ्या शिक्रणवन्संना एकदां वरातीचें जागरण झालं होतं म्हणून दुसऱ्या दिवशीं त्यांची दुपारची झोंप संध्याकाळ-पर्यंत लांबली. त्या जाग्या झाल्याबरोबर सकाळ झाली म्हणून परसाकडणं, तोंड धुणें करून पाणी उपसून घेऊन अंग धुतल्या. पण दांडीवरचं सोळ्यां-तील लुगडं ओढावयाला लागल्या तर ओलं चिंब ? इतक्यांत यजमान घरीं आले. मग त्यांच्याकडून बासनांतलं लुगडं काढून घेऊन नेसल्या.

जर्दाळू :—मग त्यांनीं लागलीच प्रदोष सोडला असेल नाहीं ?

पापडबापूः—एकदां आमच्या कचेरींत नवीन क्लार्क म्हणून लाग-लेल्या शिराभय्याला कोणी सांगितलें कीं, साहेबाच्या पोराचा पापा घेतला म्हणजे साहेब बढती देतो. त्यांना एकदां साहेबाच्या कंपाउंडांत जाण्याचा प्रसंग आला होता, तेव्हां आय्याच्या कडेवर पोर होतें त्याचा पापा घेण्याचा प्रयत्न केला. पण पोर झालें बाजूला व भय्यांनीं अय्याचेंच चुंबन घेतलें ! साहेब हंसूं लागले, तेव्हां भय्यांना वाटलें साहेब खुष आहे म्हणून ! ते बसले बढतीची वाट पहात.

फुटाण्याः—मग त्यांना चूक केव्हां कळली ?

मसालामामाः—एक वर्षानें साहेबाची साक्ष ठेवून भय्यांवर अय्यानें स्वतःच्या तान्ह्या पोराच्या पोटगीबदल फिर्याद केली. तेव्हां आपली चूक भय्याच्या लक्षांत आली ! '

चिकोडीआत्याः—“ इश्श ! असल्या घाणेरड्या गोष्टी नको गडे ! ”

वडातात्या ह्मणाला, “ बरं मी आतां चांगली गोष्ट सांगतों. आमचे गणिताचे प्रोफेसर पिठलूभाऊ एकदां मंडईत गेले होते, आणखी त्यांनीं भाजी काय भाव म्हणून विचारलें. माळीण ह्मणाली तीन पैशा शेर. त्यांची कल्पना काय कीं, ती पैशाला तीन शेर ह्मणाली, आणि व्यवहारज्ञतेचें लक्षण काय, तर पाडून मागणें ! ह्मणून प्रोफेसर म्हणाले, “ चारांनीं देतेस का ?” ती बाई आश्चर्यानें ह्मणाली, “ रावसाहेब, मी तीन पैशा ह्मणालें ना ? ” प्रोफेसरसाहेब झोकांत म्हणतात, “ चार पैशा देतेस कां ? नाहीं तर मी जातों ! ” माळणीनें शेजारच्या माळणीकडे पाहिलें तर तिनें डोळा मिचकावला, तेव्हां माळीण ह्मणाली “ बरं घ्या, दादा ” असं म्हणून तिनें प्रोफेसरांच्या पाटीवालीच्या पाटींत भाजी घातली, आणखी प्रोफेसर चार पैसे देऊन चालूं लागले.

फुटाण्याः—मग त्यांची चूक त्यांना केव्हां समजली ?

मसालामामा— इतर सर्व माळ्यांनीं व माळणींनीं त्यांना बोलावण्यासाठीं आरडून गोंगाट केला व त्यामुळें शिपाई धांवत आला. एक माळीण म्हणाली, “दुसऱ्यांना दोन पैशांनीं मिरची लावली. तुम्हांला एकच आण्यानं लावतें, या ” त्याबरोबर पिठलूभाऊ पळत सुटले व त्याच्या मागोमाग पाटीवाली पळत सुटली. प्रोफेसरांचा ओंचा सुटून धोतर पायांत अडकून त्यांनीं रस्त्यांतच लोटांगण घातलें व त्यांना अडखळून पाटीवालीहि पतन पावली ! कां, कशी आहे गोष्ट ?

बताश्या, “ आधीं प्रोफेसरांचा ओंचा खोवून त्यांना उभे करून घरीं पोंचवा, म्हणजे गोष्ट चांगली होईल. ”

काफीकाकू—गेल्या वर्षी आमच्या घरीं डॉक्टर धिरडे आले होते. आमच्या भाकरूला आला होता ताप, तर त्यांनीं त्याची नाडी पाहिली.

आणखी घड्याळ त्याच्या खाकेंत देऊन थर्मामिटर हातांत धरून दोन मिनटं होण्याची वाट पहात बसले.

फुटाण्या—मग त्यांना चूक कळली केव्हां ?

मसालामामाः—घड्याळ तापानें फणफणून डब्बल वेगानें जेव्हां १२० पर्यंत गेलें आणखी थर्मामिटरचे बारा वाजले, तेव्हां चूक समजली.

झुणकादादाः—मी एकदां 'डॉक्टर चुरमुरे यांच्या दवाखान्यांत औषधाला गेलों होतों. कंपाउंडरनें औषध तयार करून तें त्यांच्या टेबलावर ठेवलं आणखी फी सांगितली. त्याबरोबर डॉक्टरनीं फी रोग्याच्या हातावर ठेवली आणखी औषध स्वतःच पिऊन टाकलं !

फुटाण्याः—मग चूक समजली केव्हां ?

मसालामामाः—रोगी तावडतोब बरा होऊन पुन्हां औषध मागायला आला, तेव्हां त्यांना समजलं कीं रोग्याच्या पोटांत औषध न जातां त्याच्या खिशांत पैसे मात्र गेले म्हणून !

भाजी मामीः—एकदां एका बाईनं सकाळीं उठून उशी पाळण्यांत घातली आणखी मूल वळकटींत गुंडाळून वळकटी उभी केली.

फुटाण्याः—मग चूक कळली केव्हां ?

मसालामामाः—जेव्हां दूध पाजलं तरी उशी रडेना, तेव्हां नवरा धांवत आला आणखी वळकटींतून मुताचे ओघळ सुरू झालेले त्याला दिसले. त्यानें उशी घेऊन फेंकून दिली, तेव्हां बाईला कळलं.

चहाकाकाः—एकदां आमच्या शेजारच्या जिलबीबाई ह्या बृहन्महिला सोशल--क्लबांत बासुंदीबाईच्या व्याख्यानाला गेल्या होत्या. त्या वेळीं त्यांचा हातरुमाल खालीं पडला. त्याच्या ऐवजीं त्यांनीं शेजारच्या बाईचा शालजोडीचा

पदर आपल्या कमरेला खोंचला. आणखी व्याख्यान संपल्यावर चालूं लागल्या.

फुटाण्याः—मग चूक केव्हां लक्ष्यांत आली ?

मसालामामाः—शेजारच्या बाईला शालजोडी ऐवजीं हातरुमाल पुरेना म्हणून तिनें आपल्या यजमानांना हातरुमाल परत करून दुसरी शालजोडी घेऊन यायला सांगितलं, तेव्हां समजलं.

चिकोडीकाकूः—इश्श बाई! असली काय गोष्ट ती ?

वडातात्याः—बरं आतां मी चांगली गोष्ट सांगतों हं! आमच्या अफिसांतले रावसाहेब गव्हले म्हणून होते त्यांना पेन्सिल करावयाची होती. म्हणून चाकू उघडून पेनसल तासायला लागले. पण चाकू उघडण्याच्या गडबडीत पेनसिल पडून गेली होती ते त्यांना समजलें नाहीं. त्यामुळें ते आपले बोटच ताशीत सुटले.

फुटाण्याः—मग चूक समजली केव्हां ?

मसालामामाः—जवळ जवळ सगळें बोट तासून झालें तरी शिसें सांपडेना, तेव्हां लक्षांत आलें !

खारक्याः—आमच्या शाळेंतल्या आंबोळीबाईना एकदां मक्याचें कणीस भाजायचें होतें म्हणून त्यांनीं विस्तव चांगला केला अन् कणीस भाजायला बसल्या, पण इतक्यांत कणीस सोललेलं होतं ते पाचोळयाच्या आड गेलं तें कांहीं बाईच्या ध्यानांत आलें नाहीं. त्यांनीं आपला हातच विस्तवावर धरला आणखी चांगला खमंग भाजून काढला.

फुटाण्याः—मग चूक केव्हां लक्षांत आली ?

मसालामामाः—त्यांनीं कणसाचा तुकडा म्हणून हाताचा तुकडा मैत्रीण मेतकुटाबाईना दिला; पण त्याचें दाणे त्यांच्या दातांनीं निघेनात, तेव्हां त्यांच्या लक्षांत आलें.

बत्ताशाः—आमच्या अनरसेमास्तरनां एकदां पल्लाभर धान्य मापायचं होतं, म्हणून त्यांच्या बायकोनें आधोली आणून दिली. इतक्यांत त्यांचा मुलगा रायत्या म्हणून होता तो रांगत येऊन आधोली शेजारीं बसला. मास्तरांनीं मोजायला आधोली घ्यायच्या ऐवजीं आपला मुलगाच घेतला आणखी सुटले माप टाकीत.

फुटाण्याः—मग चूक केव्हां ध्यानांत आली ?

मसालामामाः—मापं टाकलीं तरी रास कमी होईना. इकडे आधोली गरंगळत स्वयंपाकघरांत गेली. आणखी मिसेस खसखसाबाई अनरसे यांना घेऊन आली. त्यांनीं जेव्हां पोराला हातचें हिसकून घेऊन सपाटून कान पिरगळला, तेव्हां लक्षांत आलें.

काबली:—आमच्या हेडमिस्ट्रेस शेवयाबाई म्हणून होत्या. त्यांच्या शाळेंत डेप्युटी येऊन गेले, त्यांचा शेरा चांगला असेल कां वाईट असेल ह्या विचाराच्या नादांत त्यांनीं आपले दागिने काढून ठेवले होते, ते केराच्या पेटींत नेऊन टाकले; आणखी केर सांचला होता, तो दागिन्याच्या पेटींत घालून पेटी बंद करून ठेवून दिली.

फुटाण्याः—मग चूक केव्हां आढळून आली ?

मसालामामाः—त्या दागिन्यांच्या बाबतींत दोघा महारणींत मारामारी होऊन एकीचा खून झाला व त्या खटल्यांत शेवयाबाईंना साक्षीला बोलावलं तेव्हां त्यांना चूक आढळून आली.

जर्दाळूः—आमच्या मामांच्या कोर्टांत एकदां बॅरिस्टर बटाटागर म्हणून एक पारशी केस चालवायला आला होता; त्याच्या अशीलानं बेसनशेट सावकारानं आपल्याला दुखापत केल्याबद्दलची फिर्याद केली होती. त्या बॅरिस्टरनें पांचशें रुपये रोज घेऊन एक आठवडाभर भाषण करून असें



कुत्र्याला खुर्चीवर बसवून आपण कुत्र्याचे जागीं उभा राहिला.

सिद्ध करून दाखविलें कीं, त्याच्या अशीलानें द्रव्यलोभानें बेसनशेट सावकाराचा खून केला.

फुटाण्याः—मग चूक केव्हां लक्ष्यांत आली ?

मसालामामाः—सेशनजज्जानें जजमेंटमधें काम चांगलें चालविल्याबद्दल बेसनशेटांचें अभिनंदन करून बॅरिस्टर बटाटागरला फांशीची शिक्षा दिली. आणखी विमा कंपनीनें बॅरिस्टराच्या विम्याच्या पॉलिसीची रक्कम सेशन जज्जाच्या बायकोकडे पाठविली तेव्हां लक्ष्यांत आली.

बर्फीः—आमच्या शेजारच्या तारफेणीबाईना पत्र लवकर मिळण्याची घाई होती म्हणून त्या आपलें पत्र आणण्यासाठीं स्वतः पोष्टांत गेल्या, आणखी आपलीं पत्रें मागूं लागल्या. पोष्टमननें त्यांचें नांव विचारलें; पण तें कांहीं केल्या त्यांना आठवेना. म्हणून खिशांतल्या पत्रांवर तरी नांव सांपडेल म्हणून त्यांनीं खिशांत पाहिलें. तों खिशांत त्यांच्या मैत्रिणीनें नाटकाचा पास दिला होता तो सांपडला; त्यांवर त्या मैत्रिणीचेंच नांव लिहिलें होतें तेंच त्यांनीं पोष्टमास्तरला सांगितलें. पोस्टमास्तरनें पत्रें दिलीं तीं घेऊन त्यावर पत्ता दिला होता त्या पत्त्यावर त्या गेल्या आणखी आपलेंच घर समजून स्वयंपाक करून मैत्रिणीच्या यजमानाला वाढायला लागल्या.

फुटाण्याः—मग चूक केव्हां कळून आली ?

मसालामामाः—मैत्रिणीला माहेराहून येण्यास उशीर झाला होता, ती परत आली. तिनें रीडायरेक्ट करून तारफेणीबाईना परत पोष्टांत पाठविल्या व पोष्टानें त्यांच्या कपाळावर छाप मारून त्यांना त्यांच्या यजमानांच्या घरीं पोंचतें केलें तेव्हां चूक समजली.

पेढूः—आमच्या मेव्हण्यांच्या ऑफिसांत एक मिस्टर पुडिंग म्हणून ख्रिस्ताव आहे. तो एकदां नेहमींप्रमाणें कुत्र्याला घेऊन फिरायला गेला होता.

परत आल्यावर कुत्र्याला आपल्या खुर्चीवर बसवून आपण कुत्र्याचा पट्टा गळयांत घालून कुत्र्याच्या जागीं हातापायांवर उभा राहिला.

फुटाण्याः--मग चूक केव्हां लक्षांत आली?

ममालामामाः--टेबलाशीं बसून जेवण झाल्यावर कुत्रा जेव्हां दारू पिईना आणि नवीन प्रकारचें भुंकणें ऐकून आसपासचे कुत्रे मिस्टर पुडिंगच्या भोंवतालीं जमा झाले व त्यांच्या मागोमाग त्या कुत्र्यांचे मालकहि आले तेव्हां मिसेस पुडिंगनें मिस्टर पुडिंगच्या गळयाभोंवतालचा पट्टा काढला व चूक लक्ष्यांत आली.

रेवडीः—आमच्या करंजीमावशी वाळकेश्वराच्या बंगल्यांत रहात होत्या, त्या वेळीं त्यांची अशी वहिवाट असे कीं, कुठें पार्टीला जाऊन आलं कीं आपले कपडे, दागिने वगैरे काढून एका मोठया पेटींत ठेवून कुलूप लावून आपण इझीचेअरमध्यें पडून विश्रांति घ्यायची. एकदां त्या पार्टीहून आल्या-बरोबर त्यांनीं आपले कपडे दागिने वगैरे काढून इझिचेअरवर ठेवले व आपण जाऊन पेटींत बसल्या, आणखी पेटींचे झांकण लावून घेतलें.

फुटाण्याः—मग आपली चूक त्यांना कशी उमगली!

मसालामामाः—त्यांच्या यजमानांना वाटलं कीं त्यांनीं आत्महत्या केली; म्हणून त्यांनीं त्यांची उत्तरक्रिया करून केसरींतल्या गृह्यसंस्कारांत जाहि-रात देऊन पुण्याचें तिकिट काढलें. आणखी मावशीचे कपडे व दागिने पेटींत भरण्यासाठीं पेटी उघडली; तों आंतून शब्द ऐकूं आला "इश्श मेलं! पेटीचा कोयंडाच कुठें सांपडत नाहीं." तेव्हां त्यांना चूक उमगली.

डांगरूः--खानबहादुर कबाबअली म्हणून चीफ इंजिनीयर आहेत, त्यांची अशी वहिवाट कीं हिंडायला जातांना चिरूट ओढीत असायचें. घरीं आल्याबरोबर दारांत बूट काढून टाकायचे आणि आपल्या तिसऱ्या मजल्या-

वरल्या खोलींत जाऊन खिडकींतून चिरुटाचें बोटुक फेंकून देऊन आपण बिछान्यावर पडायचें. एक दिवस ते वर गेले ते त्यांनीं चिरुटाचें जळतें बोटूक बिछान्यावर ठेवलें व आपण खिडकींतून उडी टाकली.

फुटाण्याः—मग त्यांना चूक कळली केव्हां ?

मसालामामाः—खालीं पाण्याचा हौद होता त्यांत ते पडले, तेव्हां आपण विझालों असें समजून स्वस्थ राहिले. इकडे जळत्या चिरुटानें बिछान्याला आग लागली, ती विझविण्यासाठीं नोकर पाण्याच्या हौदाकडे धांवले, त्यांनीं खानबहादुरांना बाहेर काढलें तेव्हां चूक त्यांच्या लक्षांत आली.

कढीवहिनीः—आमच्या कुर्डईजिजीच्या लेकीचें लग्न होतें. प्रथम श्रीमंतपूजनाच्या दिवशीं त्यांनीं ज्येष्ठ जावयाच्या पायावर पाण्याऐवजीं तूप घातलें. नंतर देवकाच्या वेळेस भटजींच्या हातास हात लावला, आंबोणामध्यें चहाच्या ऐवजीं शेणखळा पाठवून दिला, रुखवतास मांड्याच्याऐवजीं मुलाचीं पुस्तकेंच पाठवून दिलीं, आणखी लग्नाच्या वेळेला आपणच मळवट फांसून अष्टपुत्री नेसून गौरीहरापुढें जाऊन बसल्या.

फुटाण्याः—मग चूक केव्हां त्यांना समजली ?

मसालामामाः—पंक्तीमध्यें आडव्या पाटावर त्या बसल्या तेव्हां त्यांच्या तोंडांत घांस देतेवेळीं त्यांच्या जांवयानें जेव्हां त्यांच्या मुलीचें नांव घेतलें तेव्हां त्यांच्या चूक लक्ष्यांत आली.

भातसाहेबः—ही पहा आतां हिंडायला जायची वेळ झाली. तर आतां एकच आख्यान होऊन आपलें चक्री पुराण संपवूं या.

चटणीः—कॅव्हलरीमध्यें पुलाव फस्तदीन म्हणून एक शिलेदार होते. त्यांनीं एक दिवस घोड्यावर खोगीर घालावयाच्या ऐवजीं स्वतःच्याच पाठी-

वर खोगीर घातलें व तोंडांत लगाम धरला. आणखी पुनः स्वतःच आपल्या पाठीवरल्या खोगिरावर स्वार होण्यासाठीं उड्या मारमारून थकले.

फुटाण्याः--मग चूक केव्हां समजली ?

मसालामामाः--मग घोड्यानें लगाम धरून खेंचला तेव्हां त्याच्यापुढें हे चालूं लागले. तिकडून आला त्यांचा ऑफिसर. घोड्यानें त्याला सलास केला नाहीं म्हणून त्यानें लॉकपमध्यें पाठविलें. तेव्हां चूक लक्ष्यांत आली.

इति श्रीचक्रीपुराणे श्रीखंडे दशमी अध्यायः।

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

हरये नमः। हरये नमः। हरये नमः ॥

